# आ शी र्वा द

याज्ञवल्क्य ' हे भारतीय तत्वज्ञानाचे ' पितृ-तीर्थ ' आहे.

अहं ब्रह्मास्मि ' या वैदिक महावाक्याचे द्रष्टे शुक्ल यजुर्वेदाचे व शतपथ ब्राह्मणाचे प्रणेते, आणि यज्ञसंस्थेचे संशोधक याज्ञवल्क्य, यांच्या तत्त्व-स्थण्डिलावर भारतीय वैदिक संस्कृति सु-स्थिरलेली आहे.

माझे परम स्नेही विद्वद्रत्न कोलगडे यांनी वैदिक भारतीय संस्कृतीचे विवेचक असे अकरा ग्रंथ लिहिले आहेत. एकाग्रतेने विशाल वैदिक वाङ्मयाचे तुलनात्मक विमर्षण करणारे हे भाष्यकार म्हणजे एका अर्थाने महाराष्ट्राचे ' मोक्षमुल्लर' होत. वैदिक विचारसृष्टीचा पार्श्व देऊन बुद्ध, महंमद, झरतुष्ट्र, जीझस, यांच्या चरित्राचीहि त्यांनी पुनर्रचना केली आहे.

याज्ञवल्क्याचे हें चरित्र वाचल्यावर मला वाटले की, हा एकच ग्रंथ वैदिक संस्कृतीचे रहस्यार्थ विशद करण्यास पुरेसा आहे.

विद्वद्रत्न कोलगडे हे मोठ्या निष्ठेने व तेजस्वितेने आपला आशय प्रकट करतात. त्यांची भाषाशैली ठसठशीत व परिणामकारक आहे.

याज्ञवल्क्याच्या तत्त्वशास्त्रातला मेरुमणि म्हणजे आत्मतत्त्व. आत्मतत्त्वाचे संशोधक म्हणूनच त्यांना भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासात अग्रस्थान आहे. अर्थात् त्यांच्यापूर्वी ऋग्वेदकालीन द्रष्ट्यांनीहि आत्मतत्त्वाचा साक्षात्कार, उच्चार, विचार व प्रचार केला आहे. परंतु याज्ञवल्क्यांनी आत्मतत्त्वाला तत्त्व-शास्त्रीय सन्दर्भात प्रतिष्ठित केले.

' अन्तर्यामी ' हे आत्मतत्त्वाचे स्वरूपत्व विशद करण्यात याज्ञवल्क्याच्या प्रतिभेचे अलौकिकत्व आहे. आत्मतत्त्वाचा प्रत्यय कसा येतो ? आत्मतत्त्वाची ओळख कशी करून घ्यावयाची ? याज्ञवल्क्य सांगतात की, आत्मतत्त्व ही नेत्राचे नेत्र, श्रवणाचे श्रवण व मनाचे मनन करणारी आदिशक्ति आहे. सर्व इन्द्रियांना आत्मतत्त्वामुळेच शक्ति उपलब्ध होत असते.

' आन्तर्यामी ' म्हणजे आन्तराचे, आतर इन्द्रियाचे, ज्ञानेंद्रियाचे नियमन करणारा आत्मा.

आत्मतत्त्वाचे इतके सुबोध स्पष्टीकरण याज्ञवल्क्यानींच प्रथम केलें. शतपथ ( १४, ६, ७ )

मैत्रेयीला केलेल्या आत्मतत्त्वाच्या उपदेशात (बृहदारण्यक)—

आत्म्यासाठी – आत्मकामासाठी, पति–पत्नी परस्पराना प्रिय होतात असे म्हटले आहे सामान्यतः याचा अर्थ, सर्व प्रेम स्वार्थपरायण आहे, असा केला जातो, परन्तु याज्ञवल्क्याचा आशय अधिक गभीर व आध्यात्मशास्त्रांतील संदर्भांत समजावून घेतला पाहिजे. बृहदारण्यक उपनिषदातील ( अध्याय ४, ब्राह्मण ५ ) 'आत्मनस्तु कामाय सर्व–प्रियत्व,' या सुप्रसिद्ध पदाचा अर्थ पाहू या. आत्मतत्त्व हें विभु, म्हणजे सर्वत्र एकत्वाने स्वयसिद्ध असे तत्त्व असल्यामुळे, आत्मतत्त्व पारयाचे, सदेह जीवाचे एकमेकासाठी साहजिक आकर्षण असते. असा ' प्रियत्वाचा ' आध्यात्मिक धर्म आहे दोन व्यक्तीतले प्रेम म्हणजे शरीरतर, त्याच्यामध्ये असलेल्या आत्मतत्त्व एकत्वाची साक्ष होय. दोनहि देहात व जीवात एकच आत्मतत्त्व असते. म्हणून प्रेमाची शक्यता निर्माण होते. वित्तादि जड वस्तूच्या ठिकाणी प्रेम असतें, त्याचे कारणहि हें ' विभु ' आत्मतत्त्व होय ' प्रियत्व ' हा आत्म्याच्या एकत्व–प्रतीतीचा आविर्भाव आहे, असे सागणारे आद्य श्रीशकराचार्य हे याज्ञवल्क्याच्या या तात्त्विक भूमिकेवाच आधार घेत असावेत प्रेम व आत्मा याचा अर्थान्वय विशद करणारे, त्याचा जन्यजनक मर्म डोळविणारे याज्ञवल्क्य हे आद्य द्रष्टे आहेत

आदित्य, चद्र व अग्नि अस्तमित झाले, तरीहि पुरुषाला आत्मज्योति उपलब्ध असते, असें याज्ञवल्क्य प्रतिपादतात ( बृहदारण्यक अ. ५, ब्रा. ३, म २–६ )

आत्मा हे सर्व तेजाचे अधिष्ठान सर्व व्यक्तींचे, जातीचे व अस्तित्वाचें मूलाधार तत्त्व आहे, हा त्याचा सिद्धात अत्यन्त सु–सूक्ष्म व इतका विशालतम व्याप्तीचा आहे की, त्याला अव्याप्ति व अतिव्याप्ति हे प्रकार कुठेंहि व केव्हाहि सभवतच नाहीत. सर्वतः सिद्ध असे हे महामत्य आहे

'तत्तु समन्वयात् ।' हें ब्रह्मसूत्र लिहून बादरायणांनी समन्वय-प्रक्रियेची शास्त्रीय उप-योजना केली श्रीशंकराचार्यांच्या शारीरिक भाष्यावल्या चतु-सूत्रीतलें हें चवथें कलश सूत्र होय.

पण आचार्यांच्याहि पूर्वी समन्वय-प्रक्रियेचे प्रतिष्ठापक म्हणून याज्ञवल्क्याचें नाव घ्यावें लागेल

प्रमाण-भेद, अंश-भेद मान्य करूनहि विविधतेंत असलेली एकात्मता पटविणें हें समन्वय-प्रक्रियेचें लक्षण होय

बृहदारण्यकाच्या (अ ४) जनकानें सुचविलेल्या सहा आध्यात्मिक उपपत्तींचा याज्ञवल्क्यांनी जो समन्वय सिद्धविला आहे, त्यावरून त्यांच्या अलौकिक समन्वायक प्रतिभेची कल्पना येते

प्रश्नोपनिषदातहि पिप्पलाद महर्षींनी सहा मानसशास्त्रीय दृष्टिकोनांचा असाच समन्वय सिद्ध केलेला आहे पिप्पलाद हे याज्ञवल्क्याचे भगिनीपुत्र व लाडके शिष्य होते. याज्ञवल्क्यांनी प्रस्थापिलेली ही समन्वय-प्रक्रिया पुढें आद्य श्रीशंकराचार्यांनी अत्यन्त यशस्वितेनें व तेजस्वितेनें निर्वाहिली आहे.

प्रियत्व-प्रापक व ज्योतिस्वरूप अशा आत्मतत्त्वाचे आद्य द्रष्टे म्हणून श्री याज्ञवल्क्य हे जागतिक तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत अमर आहेत समन्वय-प्रक्रियेची प्रतिष्ठापना हें त्यांचें महत्त्वाचें कार्य दार्शनिक व वैज्ञानिक विचिकित्सेला किती उपकारक ठरलें आहे याची साक्ष श्रीशंकराचार्यांचें शारीर भाष्यच देत आहे.

असो, हा उद्बोधक ग्रंथ लिहून श्री. कोरगडे यांनी उच्च वाङ्मयांत फार मौलिक भर घातली म्हणून आम्ही त्यांचें सप्रेम अभिनंदन करतो.

पुणे, दि. २४।४।१९६०. धुं. गो. विनोद

# प्र स्ता व ना

१ अत्यत चिकित्सक वृत्तीच्या सशोधकानीही हे मान्य केले आहे की, अखिल विश्वात प्राचीनतम वाङमय कोणते असेल तर ते म्हणजे ऋग्वेद ! ऋग्वेदातील सोममडलात व इतरत्र सूचित झालेली यज्ञविद्या तसच त्यातील नासदीयादि सूक्तात प्रकट झालेले तत्वज्ञान याचा सुन्दर परिपोष व विकास इतर सहिता व ब्राह्मण ग्रथात झालेला आहे ब्राह्मण ग्रथाची शेवटली वाडें अथवा प्रकरणे म्हणजेच उपनिषदें अर्थात मन्त्रब्राह्मणात्मक असा जो 'वेद' त्याचा (सिद्धान्त रूप) 'अत' या नात्याने उपनिषदें म्हणजे मूर्तिमत 'वेदात' होय या वेदाताने जागतिक तत्त्वज्ञानाचे गौरीशकर गाठले आहे असा निर्वाळा प्राचीन, अर्वाचीन, पौर्वात्य व पाश्चात्य अशा सर्व विद्वानानी एकमुखाने दिला आहे मन्त्रब्राह्मणात्मक वेद वाङमयात शतपथ ब्राह्मण हे विस्ताराने व त्यातील विषय प्रतिपादनाच्या दृष्टीने जसे सर्वांत महत्त्वाचे मानले जाते तद्वत याज्ञवल्क्याची गणना वैदिक वाङमयातील अत्यत श्रेष्ठ तत्त्वदर्शी ऋषीत होते अलौकिक मत्रसामर्थ्य, यागाभ्यास कडक तपश्चर्येने प्रसन्न करून घेतलेल्या सूर्यदेवतेपासून प्राप्त झालेले तेज, जनकादि राजाच्या यज्ञात प्रकट केलेले अपूर्व यज्ञकर्मकौशल्य, शुक्लयजुर्वेदाची आखणी व उभारणी व ब्रह्मनिष्ठ जनक राजाच्या वादसभात केलेला अस्खलित तत्त्वबोध इत्यादि अद्भुत घटनानी भरलेले चरित्र म्हणजेच याज्ञवल्क्य–चरित्र होय

२ अशा महापुरुषाचे चरित्र तादात्म्य व समरस बुद्धीनें लिहिण्याकरिता माझें एक मित्र श्री कोलगडे याच्यासारखा वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध असा लेखक पुढे यावा हा एक सुयोग होय डॉक्टर जॉन्सन याना जसा बॉस्वेल हा चरित्रकार मिळाला त्याप्रमाणे श्री याज्ञवल्क्य ऋषीना (अनेक शतकानतर का होईना) श्री कोलगडे हे सुयोग्य चरित्रकार मिळाले आहेत असे म्हणण्यात फारशी अतिशयोक्ति होणार नाही

३ श्रीयुत कोरगडे यानी हे चरित्र, शुक्लयजुर्वेद–संहिता, शतपथ ब्राह्मण, महाभारत, भागवत–वायु–विष्णु–मत्स्य– स्कंद इत्यादि पुराणाचा आधार घेऊन संशोधनपूर्वक लिहिले आहे. "पिण्डे पिण्डे मतिर्भिन्ना" (तथा मनमपि भिन्नम्) या न्यायाने काही मुद्दे वादग्रस्त राहाणारच व त्याबाबत सर्व विद्वान सहमत होणे शक्य नाही हे मान्य केले तरी लेखकानें संशोधनपूर्वक माडलेल्या सिद्धाताचे महत्त्व कमी होत नाही उदाहरणार्थ पाडववशज पारिक्षित जनमेजय ब्रह्मरातसुत वाजसनेय याज्ञवल्क्य व जनक वंशातील शेवटचा 'कृति' जनक याचे समकालीनत्व ठरविण्याकरिता जी प्रमाणे लेखकाने परिश्रमपूर्वक माडली आहेत त्याचा नि पक्षपाती मनानें विचार झालाच पाहिजे.

४. निव्वळ संशोधनात्मक ग्रथ लोकप्रिय होऊ शकत नाहीत परंतु प्रस्तुत 'योगीश्वर याज्ञवल्क्य' या ग्रथाची तर ही तिसरी आवृत्ति आहे य लोकप्रियतेचे मर्म याज्ञवल्क्य–जीवनवृत्तात सुरस व काव्यमय भाषेत चित्रित करण्याची ग्रथकर्त्याचे वय ऐशीच्या घरास आलेले असून सुद्धा त्याच्या लिखाणात वेदाभ्यासजडत्व आलेले नाही हे पाहून "कविच (न च लिङ्गम) न (च) वय असे नवीन सुभाषित बनवावेसे वाटते उदाहरणार्थ, पुनर्जन्ममहत्त्व, प्राचीन शिक्षणपद्धति ब्रह्मचर्य, मत्रसामर्थ्य इत्यादि विषयाच्या वर्णनात व शतपथ ब्राह्मणातील 'पुरूरवस–उर्वशी वगैरे कथाचा गोषवारा देण्यात स्वतच्या ओघवती काव्यमय भाषेचा परिचय वाचकाना करून दिलेला आहे तसेच 'मैत्रिणीचे (कात्यायनी व मैत्रेयी याचे) हितगुज' व 'कात्यायनीचे अपूर्व दिव्य' या सारख्या प्रकरणातील सवाद नाटयसवादासारखे खटकेबाज व परिणामकारक ठरलें आहेत

५ उपरिनिर्दिष्ट सर्वगुण असूनही याज्ञवल्क्यचरित्रात त्याच्या तत्त्वज्ञानाचा मौलिक ठेवा जर वाचकाना मिळाला नाही तर ती एक मोठी उणीव ठरली असती परंतु ग्रथकर्त्यांनं सवादात्मक पद्धतीने त्या तत्त्वज्ञाना तील मुख्य सिद्धात विशद करून दाखविले असल्यामुळें तो आक्षेप य चरित्रावर येऊ शकत नाही 'लइ ईस ताड लागले' इत्यादि प्रकरणातील जनकराजाच्या सभेंत अश्वल, आर्तभाग जरत्कारव, गार्गी, वाचक्नवी

उद्दालक आरुणि शाकल्य इत्यादि महान् तत्त्वज्ञान्याबरोबर याज्ञवल्क्यांनी विविध वेदांत विषयावर केलेली स्फूर्तिदायक चर्चा, त्याचप्रमाणे 'मैत्रेयीला आत्मोपदेश' व 'जनक-याज्ञवल्क्य संवाद' या प्रकरणांत आत्मविद्येतील 'आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति' इत्यादि गहन सिद्धांतांचे केलेले स्पष्टीकरण हें सर्व विवेचन वाचकास उद्बोधक व मनोरंजक वाटते

६ याज्ञवल्क्याचे चरित्र म्हणजे एका महान् कर्मयोग्याचे चरित्र होय त्याच्या गृहस्थाश्रमाचे वर्णन करतांना तीन ऋणे फेडण्याची आवश्यकता 'वर्णाश्रम धर्मपरिपालन' इत्यादि विषयाचा उहापोह चरित्रकारने ओघाओघाने केलेला आहे 'कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादय' या गीतावचनांत 'जनक व ( तत्समान ) इतर' याचा आदर्श कर्मयोगी असा उल्लेख केलेला आहे या 'इतरामध्यें' जनकसमकालीन याज्ञवल्क्याचीही गणना आदर्श कर्मयोग्यामध्यें अभिप्रेत असावी असं 'योगीश्वर याज्ञवल्क्य' हा ग्रंथ वाचल्यानंतर वाटल्याशिवाय राहणार नाही लोकसंग्रहाच्या दृष्टीनें हा एक लाभच समजला पाहिजे

अशाच तऱ्हेचे आणखी ग्रंथ लिहून मराठी वाङ्मयांत बहुमोल भर घालण्याचे कार्य ग्रंथकर्त्याकडून घडत राहो अशी आशा व्यक्त करून ही प्रस्तावना आटोपता घेतो

मुंबई, दि ५ मार्च, १९६०. विनायक महादेव आपटे

[ सागर विश्वविद्यालय, संस्कृत विभागाध्यक्षपद, निवृत्त ]



# –संदर्भ ग्रंथ–


१ शुक्लयजुर्वेद (उवट महीधर भाष्य, निर्णयसागर प्रेस)
२ शतपथ ब्राह्मण (सायणभाष्य)
३ महाभारत (भांडारकर प्रत, पुणे)
४ वायुपुराण ५ मत्स्यपुराण ६ विष्णुपुराण ७ भागवतपुराण
८ स्कंधपुराण ९ योगतत्त्वोपनिषद् १० मैत्रेयी व कात्यायनी ( मराठी ग्रंथ )

या शिवाय विविध निबंध, लेख व व्याख्यानें वगैरे.

# आ त्म नि वे द न

योगीश्वर याज्ञवल्क्य या ग्रंथाची ही तिसरी आवृत्ति महाराष्ट्रास सादर करण्याचा सुयोग आला याबद्दल आम्हास साभिमान आनंद वाटतो पहिली आवृत्ति (पृष्ठ १३२)हा ग्रंथ इ. स. १९३६ साली, व नंतर त्याची पुनरावृत्ति इ. स. १९४६ मध्ये काढण्यात आली. आता हो सुधारून वाढविलेली तिसरी आवृत्ति (पृ. ३३२) आमच्या वाचकास सादर करण्यात येत आहे. यात प्रगाढ संशोधन, सूक्ष्म निरीक्षण, सुसंगत विचारसरणी, शास्त्रीय उपपत्ति, ऐतिहासिक आधार यातील सूक्ष्म धागेदोरे एकत्र जुळवून त्यापासून प्रस्तुत चरित्र ग्रंथाचे महावस्त्र महाप्रयासाने विणून तयार केले आहे. ही आमची विचारसरणी व शास्त्रशुद्ध मांडणी सर्वांनाच पटेल व मानवेल अशी आमची समजूत नाही पण ती अनैतिहासिक व अशास्त्रीय आहे असे साधार सिद्ध केल्याशिवाय आमच्या चरित्र ग्रंथाला मुळीच कमीपणा येत नाही.

प्रस्तुत ग्रंथाच्या अंतरंग व बहिरंगाबद्दल वैदिक वाङमयात नावाजलेले सुप्रसिद्ध डॉ. वि. म. आपटे, मुंबई व न्यायरत्न डॉ. धुं. गो. विनोद, पुणे यांनी 'प्रस्तावने'त व 'आशीर्वादा'त सविस्तर *निरीक्षण करून मार्मिकतेने समालोचन केले असल्यामुळे त्या* विषयी अधिक लिहिण्याची आवश्यकता आता राहिली नाही

सकृद्दर्शनी आभार मानावयाचे झाले तर तो अग्रपूजेचा मान आमचे गुणग्राही डॉ. नानासाहेब पुरंदरे याजकडेच जातो हे सांगणे आम्हास प्राप्त आहे त्यांच्या सदयते व सहानुभूतीमुळेच

आमच्या 'योगीश्वर प्रकाशनास' बाळसेदार स्वरूप येण्यास फार मोठी मदत झालेली आहे. उघडच सांगावयाचे म्हणजे प्रस्तुत ग्रंथ हा त्यांच्या सहृदयाचे व औदार्याचे पूर्तिमंत प्रतिक आहे, एवढे सांगितले म्हणजे त्याविषयी अधिक लिहिणे न लगे तेव्हा डॉ. नानासाहेबांचे कृतज्ञतापूर्वक आम्ही आभार मानतो त्याचप्रमाणे इतर सत्कृतिप्रेमी सद्‌गृहस्थांनी आम्हास वेळोवेळी प्रकाशन कार्यास उदार आश्रय देऊन आम्हास प्रोत्साहन व मौलिक मदत केल्याबद्दल त्यांचेहि कृतज्ञबुद्धीने आभार मानणे हे ओघानेच प्राप्त होते म्हणून त्यांचेहि आम्ही येथ अंतःकरणपूर्वक आभार मानतो. त्याचप्रमाणे आपला अमूल्य वेळ खर्चून डॉ वि म. आपटे व न्यायरत्न डॉ धु गो. विनोद या विद्वद्वयांनी आमच्या विनंतीस मान देऊन प्रस्तुत ग्रंथाचे परीक्षण करून 'प्रस्तावना' व 'आशीर्वाद' लिहून दिल्याबद्दल त्यांचेहि आभार येथे नमूद केल्याशिवाय आम्हास पुढे जावबत नाही. त्यानंतर आमचे परम मित्र प्रा. मो ल. चद्राने, पुणे यांनी प्रुफे तपासणीच्या कामात फार मोठी मदत केल्यामुळे त्यांचेहि कृतज्ञतापूर्वक आभार मानतो सरतेशेवटी पुण्याच्या अनसूया मुद्रणालयाचे मालक व चालक श्री. पा. र. अविके यांनी झटून ग्रंथछपाई चांगली करून दिल्याबद्दल त्यांचेहि आभार मानून हे आत्मनिवेदन पुरे करतो

७५३ सदाशिव पेठ, पुणे<br>दिनांक २८–४–१९६०.

रा गो कोलगडे,<br>ग्रंथकर्ता.



# अनुक्रम



श्रीमद्

# योगीश्वर याज्ञवल्क्य



## तारा चमकला

तो फाल्गुन शुद्ध पंचमीचा दिवस होता. त्या दिवशी ब्रह्मरातांचें घर म्हणजे आनंदानें व उत्सवानें फुलून व खुलून गेलें होतें. तेथें एक दिव्य तारा नुकताच चमकूं लागला होता केवढा आनंद तो नि केवढा भाग्याचा दिवस होता. पुत्रदर्शन म्हणजे वैदिक आर्यांना एक मोठा आनंदाचा महायोग वाटे. ब्रह्मरातांचा आनंद आता त्रिभुवनांत मावतां मावेना. महर्षींना पुत्रदर्शन झालें आणि वैदिक भास्कराला जन्म देणारी माय माउली –सती सुनंदा देवी धन्य झाली सनातन धर्माचा श्रेष्ठ प्रवक्ता जन्मास आला आणि वैदिक धर्माचें दिव्य तेज शाश्वत झालें. असें हें अमोलिक दिव्यरत्न म्हणजे प्रस्तुत ग्रंथाचे चरित्र-नायक याज्ञवल्क्य होत.

ब्रह्मरातांचा थोडासा मागील इतिहास सांगणें येथें जरूर असल्यामुळें, त्याविषयीं दोन शब्द लिहिणें अवश्य आहे.

ब्रह्मराताचे घराणे म्हणजे मोठें प्रसिद्ध, शुचिर्भूत, सपन्न आणि तसेच मोठे विद्यासपन्न असे होते खुद्द ब्रह्मरात हे मोठे तपस्वी असून वेदविद्येत अत्यत नावाजलेले होते त्यास देवरात असेहि म्हणत प्रख्यात वैशपायनाचे ते मेहुणे असून राजाचा त्यास मोठा उदार आश्रय होता ते आचरणाने अत्यत शुद्ध व सरळ असून मनाने मोठे पापभीरु व उदार होते अन्नदान करण्यात त्याचा हात सदा पुढें असल्यामुळे, त्याना ' वाजसनि ' म्हणजे ' अन्नदाता ' हे टोपण नावहि प्राप्त झालेले होते

परमेश्वराची लीला अशी काही अगाध व विचित्र आहे की, राजा असो वा रक असो, प्रत्येकामागे तो काही ना काही तरी गोष्टीची विवचना वा हुरहुर लावून ठेवीत असतो प्रपचात असा मनुष्यच सापडावयाचा नाही की जो सर्व बाजनी सपन्न व सर्वतोपरी सुखी आहे ' जगी सर्वसुखी असा कोण आहे ' ही समर्थोक्ति अगदी सत्य–त्रिवारसत्य–आहे फार लाब नको, ही ब्रह्मराताचीच गोष्ट घ्या तसे पाहिले तर त्याची गृहस्थिति सर्व बाजूनी सुसपन्न होती सर्व गोष्टी अनुकूल होत्या आणि योगक्षेमहि सुरळीत व सुसूत्र चालला होता हे सर्व खरे असले तरी त्याच्या त्या सोन्यासारख्या सुदर ससारात एका गोष्टीची-फक्त एकाच एका गोष्टीची मोठी उणीव होती घरात कुलदीपक नव्हता पुत्ररत्नाचा तेथें पूर्ण अभाव होता यामुळे ब्रह्मरात मनातून जरा उदास झालेले दिसत

' पुत्र नसला म्हणून काय झाले, त्याला एवढे उदास होण्याचे कारण काय ? ' असा प्रश्न आधुनिक वाचक विचारतील पण त्याचे समर्पक उत्तर द्यावयाचे तर प्राचीन कालच्या वैदिक आर्यांच्या मनोवृत्तीचा थोडासा अभ्यास केला पाहिजे त्याशिवाय वाचकास

त्याची यथार्थ कल्पना घेणार नाही. पहिली गोष्ट सांगावयाची म्हणजे अशी कीं, जो वैदिक धर्मात जन्मला, त्याच्यामागें जन्मतःच तीन ऋणे लागलेली असतात. एक देवऋण, दुसरें ऋषिऋण व तिसरें पितृऋण. यापैकी पितृऋणातून मुक्त होण्याचा मार्ग म्हणजे शास्त्रोक्त विवाह करून पत्नीच्या ठायी पुत्रसंतति निर्माण करणें. हें केल्याशिवाय मनुष्य हा पितृऋणातून मुक्त झाला असें म्हणतां येत नाही. आणि वरील तीनहि ऋणांतून मुक्त झाल्याशिवाय त्याचा मानवजन्म कृतकृत्य झाला असें मानण्यात येत नाही. अर्थात् जो देव-ऋषि-पितृऋणांतून मुक्त झाला नाहीं त्याला सद्गति नाही– म्हणजे स्वर्गलाभ नाही, असें वैदिक धर्माचे निक्षून सांगणे आहे. इतकेच नव्हें, तर निपुत्रिकाच्या घरचें अन्नसुद्धां अभिजात आर्याला वर्ज्य आहे. म्हणून वैदिक आर्यांनी 'मा शूने अग्ने निषदाम नृणाम्'– हे अग्ने, निपुत्रिकाच्या घरी राहण्याचा आमच्यावर प्रसंग न येवो. अशी अग्निनारायणापुढें मोठया कळकळीने प्रार्थना केली आहे ( ऋ. ७-१-११ ). त्याचप्रमाणें त्यांनी पुनः एके ठिकाणी 'माऽवीरतायै रीरिधः' – हे अग्निदेवा आम्हांस निपुत्रिकाच्या स्वाधीन करू नकोस, अशी करुणा भाकली आहे (ऋ.३-१६-५). यावरून निपुत्रिक असणे, ही गोष्ट वैदिक आर्यास मोठी लाजिरवाणी असून काळजाशी झोंबणारी व डिवचणारी होती. याविषयीं अधिक निर्वाळा देण्याचें कारण नाही. सारांश, सांगण्याचा मतितार्थ हा की, पोटी पुत्रसंतान नसल्यामुळें ब्रह्मरात काय, त्याची पत्नी सुनंदा काय, दोघेहि मनातून फार बेचैन झालेली होती.

शिवाय दुसरी एक गोष्ट अगत्यपूर्वक सांगावयाची म्हटली म्हणजे वैदिक आर्य हे स्वभावतः आक्रमणशील व त्याबरोबरच

प्रसरणशील वृत्तीचे होते. आणि म्हणूनच वशवृद्धि व वशविस्तार त्याना आवश्यक वाटला तसे वाटणे स्वाभाविक होते त्याशिवाय समाज प्रसरणशील होणे हे सहसा शक्यच नाही आणि हे तत्त्व – हे प्रभावी तत्त्व त्यानी ऋग्वेदकाळीच पूर्ण जाणल्यामुळे, आपणास वीरपुत्र देण्याविषयी त्याच्या प्रार्थना ऋग्वेदात पदोपदी दृष्टोत्पत्तीस येतात प्रत्येक कुटुबामागे निदान दहा पुत्र तरी असावेत असे सबल अनुमान 'दशास्या पुत्रमाधेहि' या विवाहसमयी घोषित केल्या जाणाऱ्या मत्रोच्चारावरून किंवा निदान आठ पुत्र तरी असावेत असे अनुमान ' अष्टपुत्रा सौभाग्यवती भव ' या सुवासिनीस वडीलधाऱ्यानी द्यावयाच्या मगल आशीर्वादावरून काढता ये येते त्याची वशप्रियता केवढी दाडगी होती याची कल्पना यापुढील यजुर्वेदातील मत्रावरून वाचकाना सहज करता येण्यासारखी आहे तो मत्र म्हणजे हा—' *काण्डात्काण्डात्प्ररोहन्ति परुष परुषस्परि । एवानो दूर्वे प्रतनु सहस्रेण, शतेन च ॥* ' ( शु य १३ २० ) – हे दुर्वे, प्रत्येक काडापासून व प्रत्येक पेरापासून तू जशी अकुरित होतेस व पसरत जातेस तद्वत् आमचा वशहि तू हजारो पटीनी वाढेल असे कर जवळजवळ याच अर्थाची भावना ऋग्वेदातहि उमटलेली दिसून येते ' प्रजावान्न पशुमाँ अस्तु गातु '– देवहो ! आमचे घर मुलाबाळानी व गाईघोड्यानी गजबजून जाईल असे करा यावरून वैदिक आर्य हा केवढा वशविस्तारप्रेमी होता हे आता स्पष्ट झाले आहे

हे सर्व येथे सागितले याचे कारण इतकेच की, निपुत्रिक असणे हे धर्मदृष्टचा काय अगर समाजदृष्टचा काय एक मोठे कौटुबिक व्यग समजले जात होते समाजात अशा मनुष्याला

लाभावी तशी प्रतिष्ठा लाभत नसे प्रतिष्ठित लोक त्याच्या घरचे अन्न टाळण्याचा प्रयत्न करीत अर्थात् निपुत्रिकाचा जन्म अशा दृष्टीने एका परी दु खी कष्टीच असतो, असेच का म्हणा ना खरोखर निपुत्रिकाचे जिणे वैदिकाच्या दृष्टीने जवळजवळ निष्फळ व म्हणून निरर्थकच म्हटले पाहिजे घरात त्रैलोक्याचे वैभव जरी नटलेले असले तरी तेथे पुत्ररत्नाचा मधुर प्रकाश उजळलेला नसला तर तो कुबेराचा सुदर राजवाडाहि स्मशानाची रुक्ष छाया धारण करतो निदान त्या निपुत्रिकाला तसा भास तरी होत असतो, हे काही खोटे नाही ब्रह्मराताचे घर झाले तरी आता असेच शुष्क व शून्य दिसत होते !

ब्रह्मराताची सुशील पत्नी झाली तरी आता ती ब्रह्मराताप्रमाणेच उदास व चिंतातुर दिसत होती दुर्दैवी बिचारी, करणार काय ? जिच्या नशिबी पुत्रमुख पाहण्याचे सद्भाग्य लिहिलेले नव्हते, तिच्यासारखी दु खी व दुर्दैवी स्त्री तिची तीच होती स्त्रीहृदय त्यासाठी सारखे झुरत असते, कशाची म्हणून तिला हौस नसते, उत्साह नसतो मन विपण्ण बनते व जग उदास भासते जिच्या नशिबी मांडीवर गोंडस राजहस खेळण्याचे भाग्य लिहिलेले नाही, तिच्यासारखी दुर्दैवी स्त्री आणखी कोण आहे ? ईशकृपेने घरात सर्व काही अनुकूल असून, ही एकच बाब त्या ब्रह्मराताच्या पत्नीला—त्या सुनदा देवीला—मोठी बोचक व तापदायक होऊन राहावी हे तिचे दुर्दैव होते पण ईशसकेतापुढे कोण धावला आहे ? आणि कोणाचे काय चालणार आहे ? ' ठेविले अनते तैसेचि रहावे ' ही सतोक्ति गोड मानून घेऊन त्यातच समाधान मानणे याशिवाय अशा हतभाग्य स्त्रीला दुसरा तरणोपायच नाही ! आणि ते वचन डोळ्यापुढ ठेवूनच ती बिचारी कशी

वशी दिवस कंठीत होती, हे सागण्याची आता आवश्यकता राहिली नाही

विचारी सुनदा, दुर्दैवीच होती अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' या मगल आशीर्वादाचा तो चालता-बोलता काळ होता त्या मगल आशीर्वादानेच आर्यस्त्रियाच्या अगावर आनदाने वोटभर मास चढत असे 'सततिनियमनाचे' खूळ डोक्यात घेऊन, त्याचा पोवाडा गाण्यात स्वर्ग मानणाऱ्या महिला वर्गाला त्याचे महत्त्व व त्यातील आनद समजणे हे शक्य नाही. स्त्रीजन्माला उजळा देणारा व स्त्रीहृदयाला भरती आणणारा असा जो आशीर्वाद, त्याचे महत्त्व फक्त वैदिक सस्कृतीत वाढलेल्या त्या आर्यस्त्रियानाच माहीत असे 'अष्टपुत्रा' व 'सौभाग्यवती' हे शब्द ऐकून वुजणाऱ्या उफराटी हृदयाच्या आधुनिक वहकलेल्या महिलाना तो आशीर्वाद विषाप्रमाणे बावडा व कडवट वाटला, तर त्यात आश्चर्य मानण्याचे कारण नाही पाशवी विषयसुखास हपापलेल्या देहतर्पणरत विषयमूढाना सततीचा अडथळा व कटाळा वाटावा, हे ठीकच आहे पण सुदैवाने भरतखडात त्या रोगाची त्रिपारी साथ त्या वेळी पसरलेली नव्हती म्हणून काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत वैदिक आर्यांची एकजात वसाहत कायम राहिली, हे रहस्य आज वाचकाना सागणे आवश्यक आहे

तेव्हा आता येथे सागावयाचा मुद्दा म्हणजे तो हा की,वैदिक आर्य सततिनियमनाचा पोवाडा गाणारे केवळ देहसुखप्रेमी नरपशु नसून वशविस्ताराचे मोठे अभिमानी व कैवारी होते दापत्यजीवनात त्याची दृष्टि ऐहिक व पारमार्थिक अशी उभयविध होती 'धर्मप्रजारत्यर्थोहि विवाह' हा त्याचा दाम्पत्यजीवनाचा दिव्य आदर्श होता. म्हणून सततीशिवाय दाम्पत्यजीवन सार्थकी लागले असे ते मानीत नसत. धर्मसाधन, प्रजोत्पादन व रतिसुखलाभ ही

सूत्रत्रयी वैदिक विवाहाचे– दाम्पत्यजीवनाचे मुख्य ध्येय असल्यामुळे व प्रजोत्पादन हे दोन्हीस जोडणारे असल्यामुळें त्यासाठी ते फार दक्ष व उत्सुक असत ही वाण ब्रह्मराताच्या प्रपचात भासत असल्यामुळे ब्रह्मरात काय किंवा त्याची पत्नी सुनदा देवी काय, कोणी झाले तरी दु खीकष्टीच होते, हे लपवू म्हणता लपण्यासारखे नव्हते।सतति नसलेले घर म्हणजे फूल नसलेली बाग अगर चद्र नसलेली रात्र असा आम्हा भारतीयाचा ठाम सिद्धात आहे।

वैदिक आर्यांचा काळ म्हणजे तो श्रद्धेचा पुण्य काळ होता त्या वेळी श्रद्धेच्या जोरावर त्यानी काय वाटेल तें केले व काय हवे ते मिळविले श्रद्धाशून्य बुद्धिजीवी लोकाना हे खरें वाटावयाचे नाही पण भारतीय इतिहास मात्र तसें निश्चित सागतो।जेव्हा मानवी प्रयत्न फसतात अगर निष्फळ ठरतात तेव्हा दैवी उपायाचे-अपौरुषेय मार्गाचे-अवलबन करुन प्राचीन भारतीय लोक आपली मनीषा तृप्त करुन घेत हे इतिहासज्ञास नव्याने सागावे असे नाही। आणि तो दैवी उपाय म्हणजे यज्ञोपासना होय वैदिक आर्यांची दिव्य कामधेनु ती हीच होती ही यज्ञनारायणाची अनन्य उपासना होती ब्रह्मरातानी आता हाच मार्ग स्वीकारला पुत्रप्राप्तीसाठी त्यानी आता यज्ञनारायणाची आराधना चालविली आणि चमत्कार हा की, पुढे काही दिवसानी या त्याच्या उपासनेंस सुन्दर यशहि आले सुनदादेवी गरोदर झाली आणि नवमास सपल्यावर प्रारभी म्हटल्याप्रमाणे फाल्गुन शुद्ध पचमीस ब्रह्मरातास पुत्र-दर्शन झाले. मग त्याचा आनद काय सागावा ! प्रत्यक्ष ब्रह्मदेवच त्याच्या उदरी जन्मास आले होते (स्कद १–६०–४२)



# बालपण

ब्रह्मरात व सुनदा या दापत्यास फार दिवसानी आणि मोठ्या नवसाने झालेले बाळ आणि त्यात याज्ञवल्क्यासारख तेजस्वी नि सुदर रत्न झाल्यावर कोण नाही आनदाने नाचणार ? सुनदा-देवीच्या त्या सुखानदास आता त्रैलोक्य देखील अगदी ठगणेच झाले होते तो आनद उत्साह नि सभ्रम याचा कल्लोळ उसळला होता आणि का नये उसळ ? आकाशातील शेकडो मैलावरच्या चद्राला पाहून पृथ्वीवरील रत्नाकर जर आनदाने उचबळं लागतो तर नवमास तपश्चर्या करून, असह्य प्रसववेदना सहन करून, प्रसाद रूपाने प्राप्त करून घेतलेल्या गोजिरवाण्या राजहसाला माडीवर घेऊन लडिवाळपणे खेळविताना कोणती माउली आपले भान विसरणार नाही ? या हसतमुख बालचद्राकडे पाहून आनद साग-रात पोहत असता कोणती माउली स्वर्गसुखालाहि लाथाडून देणार नाही ब्रह्मराताचे घर म्हणजे आता प्रत्यक्ष स्वर्गच बनले होते.

त्या नूतन चद्राला शुक्ल पक्ष लागला आणि तो दिवसे दिवस वाढत व खुलत चालला त गोजिरवाणे बालक आता हसू लागले, बसू लागले, रागू लागले, बोल लागले व हळू हळू चालू व नाचूहि लागले सुनदादेवीला मोठा आनद झाला त्याला उचलून घेता, चुबिता, हासविता खेळविता, बोलविता (मातेच्या हृदयात जो प्रेमाचा पूर उचबळत असतो, त्याच यथार्थ वर्णन कोण करील ? ते माननीय मातृपद प्राप्त करून घ्यावे, तेव्हाच त्या दिव्य ब्रह्मानदाचा मधुर अनुभव प्रत्यक्ष अनुभवास येईल.)

जसजसे ते बाळ वाढू लागले व हसू-खेळू लागले, तसतसे त्या लहानशा याज्ञवल्क्याची गोडस व गुलजार चिमुकली मूर्ति पाहून ब्रह्मरातांचे हृदय आनंदाने उचंबळून येई, जाता येता त्याला पटकन् उचलून घेऊन, त्या हसऱ्या मधुर गालाचा गोड पापा घेऊन, निमिषार्धच का होईना, त्या निर्वचनीय ब्रह्मानंदात ते अगदी तल्लीन होत असत गोडस नि गोजिरवाणे तें बाळ प्रत्यक्ष मनमोहन मूर्तीच होती ब्रह्मरात केव्हा त्याच्याशी बोबडे बोलत तर केव्हा नसते चाळे करून त्याला हसवीत केव्हा त्याच्याशी खेळून त्याला रमवीत तर केव्हा हातानं धरून थै थै नाचवीत केव्हा राग भरल्याचा बहाणा करून क्षणभर रडवीत व केव्हा आपण रडल्यासारखे करून त्याला हसवीत केव्हा त्याला वरच्यावरच झेलत तर केव्हा त्याला डुलवून रमवीत असे एक का दोन, अनेक तऱ्हेन त्याला रमवून, हसवून, खेळवून आपल्या मनाची हौस ते यथेच्छ पुरवून घेत त्याचा गृहस्थाश्रम आता धन्य झालेला होता

याप्रमाणे त्या प्रेमळ आईबापाच्या चोचल्यात व प्रेमात वाढता वाढता ते बाळ आता सात वर्षांचे झाले त्याचा खेळ, ती आनंदी वृत्ति, मधुर चेहरा, ते सुंदर बोल आणि ते मनोहर हास्य पाहून कोणीहि त्याचे कौतुकच करी शेजारी-पाजारी देखील ती त्याची खेळकर वृत्ति व हसरा चेहरा पाहून सदा त्याच्या भजनी लागलेले असत मग आइबापाच्या कोडकौतुकाबद्दल किती जरी सांगितले तरी ते कमीच पडणार आहे पुत्रवात्सल्याचा गोड अनुभव आईबापास घरोघर असतोच असतो तो नुसत्या शब्दांनी सांगून कळणार नाही

यांप्रमाणे सातवे वर्षहि संपून गेले आणि आठवे लागले. ब्रह्मरातानी योग्य मुहूर्त पाहून त्या मुलाचा व्रतबंध केला आणि त्यास गायत्रीमंत्राचा उपदेश दिला आता याज्ञवल्क्याचे बालपण संपून, अध्ययनकाल लागला तत्कालीन पद्धतीप्रमाणे ब्रह्मरातानी त्यास वेदाध्ययनास म्हणून त्याचे मातुल जे वैशंपायन त्याचेकडे नेऊन ठेविले (भारत, १२–३२३–१७ ते १९)

याज्ञवल्क्याला ब्रह्मराति असेहि म्हणत ब्रह्मराताचा पुत्र तो ब्रह्मराति ब्रह्मराताला वाजसनि हे टोपण नावहि होते त्या वाजसनीचा पुत्र म्हणून त्यास वाजसनेय असेहि म्हणत. त्या वेळी व्यक्ति ओळखावयाची म्हणजे मूळ नावापुढे पैतृक नाव घालून ओळखीत असत जसे उद्दालक आरुणि, राम दाशरथि, व्यास पाराशर्य, जनमेजय पारिक्षित, हिरण्यनाभ कौसल्य इत्यादि त्या वेळी आडनावाची प्रथा नव्हती त्याऐवजी केव्हा केव्हा गोत्रनाम घालीत

वैदिक वाङमयात याज्ञवल्क्याचा उल्लेख आढळून येतो यामुळे लोकांच्या समजुतीत घोटाळा झालेला असून केव्हा केव्हा मोठे मोठे विद्वान् देखील त्याला बळी पडले आहेत मागचा पुढचा विचार न करता, फक्त नामसादृश्यामुळे स्वतःची फसगत करून घेऊन, याज्ञवल्क्य वाजसनेय याच्या चरित्राविषयी अगर काळाविषयी संशोधनपूर्वक व सखोल अभ्यास न करता, एखाद्या दुसऱ्या पुराण-ग्रंथाचा तुटपुंजा आधार घेऊन प्रस्तुत ग्रंथाविषयी नसते शितोडे उडविण्याचा उपद्व्याप करणारे काही विद्वान् आम्हाला ठाऊक आहेत त्याना आमची एवढीच विनंति आहे की, आम्ही जी विचारसरणी या ग्रंथात सूत्रबद्ध जुळविली आहे, ती साधार प्रथम खोडून काढून, मग तुम्हास काय म्हणावयाचे आहे ते म्हणा,

तसे न करता उगीच दुसऱ्यावर चिखल उडविणे हे विद्वान् म्हण-विणाऱ्यास शोभणार नाही! इतकी सौम्य व नम्र सूचना देऊन आम्ही आमच्या प्रस्तुत विषयाकडे वळतो

वैदिक वाङ्मयात अनेक याज्ञवल्क्याचा उल्लेख आढळतो पैकी धर्मराजाच्या राजसूय यज्ञात एक याज्ञवल्क्य अध्वर्यूच्या अधिकारावर होते ( भा स ३६-३४ ) परा-शर-सत्यवती विवाहात दुसरे एक याज्ञवल्क्य पुरोहितपदावर आरूढ झालेले होते वाष्कलाच्या शिष्यगणात एक याज्ञवल्क्य आढळतातच शिवाय याज्ञवल्क्य वाजसनेय हे चौथे याज्ञ-वल्क्य होत म्हणजे पुराण-ग्रंथात एकापेक्षा अधिक याज्ञवल्क्याचा उल्लेख आढळतो तरी याज्ञवल्क्य या नावाने अमरकीर्ति पावून जगप्रसिद्ध झालेले याज्ञवल्क्य म्हणजे हे वाजसनेय याज्ञवल्क्य होत आज लोकमान्य टिळक म्हणजे बाळ गंगाधर टिळक असा जसा बोध होतो, तद्वत् योगीश्वर याज्ञवल्क्य म्हणजे ब्रह्मराताचे चिरंजीव वाजसनेय याज्ञवल्क्य असा अर्थ ध्वनित होतो हे कौशिक गोत्री असून, विश्वामित्र-वंशज असावेत



खडकडीत तपश्चर्या करून मोठ्या कौशल्याने तयार केलेल्या पवित्र ज्ञानमंदिरातील सुंदर शारदादेवीची मनोहर मूर्ति पाहून हे सुधारलेले जग आजदेखील आश्चर्याने तोंडात बोट घालीत आहे! मग त्यांना निरक्षरतेच्या सबबीवर निर्बुद्धतेचा शिक्का मारण्याचे पाप कोण चांडाळ करील ? त्या निरक्षरच पण सूज्ञ व सुबुद्ध सरस्वती-भक्तांनी एकनिष्ठ उपासना करून, त्या दिव्य शारदा-देवीची पवित्र मूर्ति नाना विद्यालंकारांनी नटवून व सजवून इतकी रमणीय व शोभिवंत केली आहे की, तिच्या शृंगारसाजास शोभणारा असा एखादा नवा अलंकार तयार करण्याचे भाग्य आज जगातील थोड्या पंडितास लाभले आहे म्हणून या विसाव्या शतकाला प्राचीन शिक्षणाची टिंगल व टवाळी करण्याचा अधिकार प्राप्त होत नाही।

वैशंपायनाचा तो आश्रम म्हणजे त्या वेळचे ते यजुर्वेदाचे महाविद्यापीठच होते द्वैपायन व्यासांनी मूळ व संमिश्र वेदराशीतून विषयवारीने मंत्र निवडून त्यांच्या संहिता करून, त्यांपैकी यजुर्वेद संहिता वैशंपायनाकडे दिली असल्यामुळे यजुर्वेदाच्या मुख्य विद्या-पीठाचा मान वैशंपायनाच्या आश्रमास मिळालेला होता त्यांच्या अध्यक्षतेखाली हे विद्यापीठ नुकतेच अस्तित्वात आले होते त्याचप्रमाणे ऋग्वेदाचे मुख्य पीठ पैल ऋषीकडे सामवेदाचे जैमिनीकडे व अथर्ववेदाचे सुमंतूकडे सोपवून बादरायणाचार्यांनी आपली लेखणी इतिहास पुराणाकडे वळविली होती ( विष्णु पु अं ३, अ ४, ७–९ ) याप्रमाणे आर्यावर्तात चार वेदांची चार मुख्य विद्यापीठे नुकतीच स्थापन होऊन तेथ नवीन पद्धतीचा अभ्यासक्रम अमलात आलेला होता आणि या विद्यापीठात त्या वेळच्या शिरस्त्याप्रमाणे शिक्षण घेण्यास शेंकडो विद्यार्थी एकत्र

जमले होते. त्यांपैकी वैशंपायनाच्या आश्रमांत विद्याग्रहणार्थ म्हणून याज्ञवल्क्य हा उपनयन होताच येऊन दाखल झाला

( विष्णु पु. ३–५–१ व २ )

याज्ञवल्क्य म्हणजे कांही सामान्य मूर्ति नव्हती. वय लहानच पण मुद्रा अतिशय गंभीर होती ते लकलकणारे पाणीदार डोळे आणि तो रेखीव व तेजस्वी चेहरा पाहिला म्हणजे कोणालाहि त्याच्या भावी भाग्योदयाची सहज साक्ष पटल्याशिवाय राहात नसे. त्याच्या बोलण्यात, चालण्यात, पाहण्यात, व एकदरीत त्याच्या वर्तनात व चर्येत अशी काही एक जादू होती की, तिजमुळे जो तो त्याच्यावर प्रेमवृष्टि करी व लोहचुंबकाप्रमाणे आकर्षिला जात असे. त्या लहान वयातच त्यांच्या कुशाग्र बुद्धीची तेजस्वी लकेर मधून मधून चमकून जाऊन, त्यापासून तेथील लहान थोराना त्याचा मोठा अचंबा आणि अभिमान वाटे स्मरणशक्ति काय, ग्रहणशक्ति काय, पठणशक्ति काय सगळेंच काही विलक्षण असे एकदा कानाने ऐकून तोंडाने म्हटले की, रुजलेच जाऊन बुद्धीत. आणि मनाने घेतले की उतरलेच ते कृतीत. त्याचा बाणेदार व निश्चयी स्वभाव आणि अध्ययननिष्ठा पाहून, कोणीहि त्याची वाहवा व कौतुकच करीत असत.।

•वेदिक धर्मात मनुष्याचा जागतिक जीवनाचा प्रारभ ब्रह्मचर्याश्रमापासून होतो. हा आश्रम म्हणजे पुरुषार्थाचा मूळ व मुख्य पाया आहे. मूळ पाया म्हटले याचे कारण असे की, सुख, संपत्ति, विद्या, बल, आयुष्य, आरोग्य ही सर्व या आश्रमावरच अवलबून आहेत. येथे पेरावें तसे पुढे उगवतें, आणि कष्टावे तसे लाभतें. म्हणून हा आश्रम सर्व पुरुषार्थाचा मूळ आधार असून, मनुष्याच्या आयुष्यक्रमांतील तो एक अत्यंत महत्त्वाचा असा भाग आहे.' शता-

युवे पुरुष 'या मंत्राला सार्थत्व देणारी अशी जर कोणती किमया असेल तर तो हा ब्रह्मचर्याश्रमच होय ! येथच व्रतनिष्ठ राहून विद्या शिकावयाची आणि येथेंच यमनियमाचे पालन करून वत्रारोग्य कमवावयाचे, तरच भावी जीवन सुखमय होऊन, ते पुरुषार्थोत्कर्षास कारणीभूत होईल ब्रह्मचर्य या शब्दात फार मोठी शक्ति नि फार मोठा अर्थ गर्भित असून त्याचा आम्हा भारतीयास आज पूर्ण विसर पडला आहे ही मोठया दुर्दैवाची गोष्ट होय ब्रह्म म्हणजे वेदविद्या ( 'ब्रह्म हि मंत्र ' ) आणि ब्रह्म म्हणजे बल ( 'ब्रह्म हि बलम् ' ) असा ब्रह्म शब्द्चा द्विविध अर्थ असून ब्रह्मचर्य या शब्दाची व्याख्या आहे ती अशी — 'ब्रह्म वेदस्तच्चरण ब्रह्मचर्यम् ' (गदाधर)-ब्रह्म म्हणजे वेद, त्याचा, अभ्यास, ते ब्रह्मचर्य.अर्थात् शास्त्रोक्त वेदाभ्यास करणे यास ब्रह्मचर्य असे म्हणतात 'ब्रह्म कर्म चरतीति एव शीलो ब्रह्मचारी'— विद्या व बल प्राप्त्यर्थ कर्म करण्याची ज्याची प्रवृत्ति तो ब्रह्मचारी अशीहि ब्रह्मचारी शब्दाची व्याख्या आहे। एकंदरीत सांगावयाचे तात्पर्य हे की, ब्रह्मचर्य आश्रमात – म्हणजे विद्यार्थी दशेत – मनुष्याने शक्य तेवढी विद्या व बल प्राप्त करून घेण्याचा आटोकाट प्रयत्न करावा

वेदकाली इतर विद्या होत्या पण वेदविद्येला सर्वात महत्त्वाचे स्थान होते, म्हणून वेदविद्येचा प्राधान्याने उल्लेख करण्यात आलेला आहे आयुर्विद्या, धनुर्विद्या, ज्योतिर्विद्या, स्थापत्यविद्या इत्यादि अनेक विद्या त्या वेळी होत्या पण त्या मुख्य विद्या नसून आनुषंगिक विद्या मानल्या जात असत त्या वेळी विद्या शिकावयाची म्हणजे काही सोपी गोष्ट नव्हती पुस्तक-पाटीचा त्या वेळी अवतार झाला नसल्यामुळे प्रत्यक्ष गुरुजवळ राहूनच ती संपादन

करावयाची असे म्हणजे गुरुदेवतेसमोर बैठक घालून गुरुमुखाकडे एकाग्रमन लावून, सावधानचित्ताने गुरुमुखातून वाहणारी ज्ञानगंगा वाणीद्वारा अंतःकरणात काळजीपूर्वक साठवून ठेवावयाची पण हे काम बोलण्याइतके सोपे नाही ऋग्वेदासारखा प्रचंड ग्रंथ तोंडाने घोकून बुद्धीत उमटविण्याची गोष्ट सामान्य नव्हती दहा हजार मंत्राच्या या महाग्रंथाएवढा प्रचंड ग्रंथ जगात दुसरा नाही! असला महाग्रंथ चिमुकल्या मेंदूत भरून ठेवणे हे सामान्य लोकाचे काम नव्हे फार लांब कशाला, आज सुधारलेल्या पद्धतीने उच्च शिक्षण घेणाऱ्या महाविद्यालयातील चांगले प्रौढ विद्यार्थीच घ्या. त्यांना कोणत्याहि पुस्तकातील सरळ शंभर ओळी तरी तोंडाने घडघड पाठ म्हणता येतील अशी हमी देण्यास कोणी प्राध्यापक तयार आहे काय ? आजच्या विद्यार्थ्याचे सगळे ज्ञान काय ते पुस्तकात असते. परीक्षेपुरते चार दोन महिने डोक्यात काय राहील तेवढेच. परीक्षा एकदाची होऊन गेली म्हणजे त्याचा मेंदू पुन कोरा करकरीत नि कोरडा ठणठणीतच असतो आजच्या विद्यार्थ्याला एखादा प्रश्न विचारला तर पुस्तकासाठी कपाटाकडे त्याला धूम ठोकावी लागेल त्याशिवाय त्यास काही सुचायचेच नाही पण तेच प्राचीन विद्यार्थ्याकडे पाहा तुम्ही त्यांना केव्हाहि मध्यरात्री झोपेतून उठवून कोणताहि मंत्र म्हणावयास सांगा. तो तावडतोब म्हणत असे त्याची जागती विद्या कोणीकडे आणि आमचे आजचे हे ठिसूळ क्षणभंगुर पुस्तकी ज्ञान कोणीकडे ! ! ऋग्वेदासारखे प्रचंड ग्रंथ जिव्हाग्री घेऊन त्यांना थयथय नाचविणे ही काही लहानसहान गोष्ट नाही एक ऋग्वेदच काय, तसले चारहि वेद प्राचीन विद्यार्थी जिभेवर झेलून ते सहज लीलेने

खेळवीत असत एवढी त्याची ही पठणशक्ति आणि विशाल ग्रहणसामर्थ्य होते. त्याचा दीर्घोद्योग नि खडतर तपश्चर्येला तर जगात तोड नाही

आम्ही हे काहीतरीच लिहितो असे मात्र वाचकानी समजू नये. आज या गोष्टी आश्चर्यवत् वाटतात पण प्राचीन काळी मात्र तशी वस्तुस्थिति होती आणि या गोष्टीला या ग्रथाचे चरित्र-नायकच प्रत्यक्ष साक्ष आहेत सर्व वेद त्याच्या जिव्हाग्री होते. हे तपानुष्ठान असामान्यच होय. 'दीर्घसत्र वा एप उपैति। यो ब्रह्मचर्य चरति ॥'– 'जो, ब्रह्मचर्याचे अनुष्ठान करतो तो महायज्ञाचेच अनुष्ठान करतो, असे पुढे त्यानी शतपथात लिहून ठेवून तत्कालीन विद्यार्थ्यांचा मोठा गौरव केला आहे, तो काही उगीच नव्हे प्राचीन वैदिक विद्यार्थ्यांचा आदर्श आजपर्यंत पृथ्वीच्या पाठीवर इतरत्र कोठेहि पाहावयास मिळलेला नाही· आणि म्हणून त्याच्या दीर्घ व दिव्य तपश्चर्येचे आणि अलोट विद्यावैभवाचे कौतुक करावे तितके थोडेच आहे

तशात याज्ञवल्क्याचा काळ म्हणजे वैदिक वाङ्मयात व इतिहासात अत्यत धडामोडीचा, मोठया चळवळीचा, जिवत व प्रभावी असा होता त्या वेळी प्रसिद्ध भारतीय युद्ध सपून सुमारे पन्नास पाऊणगे वर्षे झाली असतील. भगवान श्रीकृष्ण नुक-तेच अतर्धान पावलेले, पुण्यश्लोक धर्मराजाची आठवण अजून लोकात ताजी टवटवीत असलेली, सम्राट जनमेजयाच्या सर्प-सत्राचा आता कोठे समारोप झालेला, यज्ञसस्थेला प्रौढ व श्रेष्ठ स्वरूप प्राप्त होऊन, ती भव्य व विशाल दिसू लागलेली, अध्यात्मशास्त्राला खोल व सूक्ष्म विचाराचा उजळा मिळून,

विचारी लोकाची विवेकबुद्धि आस्ते आस्ते मोक्षप्रवण होत चाललेली, अशा सुमारास आर्यावर्तात जिकडे तिकडे धर्म व ज्ञान याचा उत्कर्ष व विकास होऊन, भारतीयाचा हा तेजस्वी इतिहास सर्व जगभर दुमदुमून राहिलेला होता

अशा प्रभावसपन्न काळात याज्ञवल्क्याच्या समकालीन असणारे अनेक थोर व विद्वान ऋषी व कर्मवीर पुण्यश्लोक राजे आकाशातील तेजस्वी नक्षत्राप्रमाणे तेथ तेथे चमकत होते यजुर्वेद विद्यापीठाचे कुलगुरु व महाभारताचे प्रवक्ते वैशपायन, अध्यात्मविद्येचे प्रमुख व प्रसिद्ध आचार्य उद्दालक आरुणि, ऋग्वेदाचे पदपाठ लावणारे शाकल्यमुनि, योगशास्त्राचे महामहोपाध्याय हिरण्यनाभ, साख्यशास्त्राचे प्रणेते कपिलमुनि, सामवेदाचे आद्य प्रचारक जैमिनी, पातिव्रत्याचा पुरस्कार करून विवाहसस्थेला दिव्य उजळा देणारे श्वेतकेतु, प्रत्यक्ष यमाजवळ जाऊन त्याच्यापासून स्वर्गीय अमरविद्या मृत्युलोकात आणणारे ज्ञानवीर नाचिकेत, प्रसिद्ध तत्त्ववक्ते व सत्यवक्ते सत्यकाम जाबाल, सम्राट् जनमेजय, पुण्यश्लोक विदेही जनक, राजा अजातशत्रु, राजा अश्वपति, राजा प्रतर्दन अशी एकापेक्षा एक दिव्य, शूर व सुन्दर भारतरत्न त्या वेळी जागजागी विखुरली असून त्याच्या दिव्य व मनोहर प्रकाशाने ही पवित्र भूमि अधिकच रमणीय दिसत होती ते युग असे भाग्यशाली भारतमातेच्या स्पृहणीय व वैभवाचे होत

अशा ज्ञानवैभवसपन्न युगात याज्ञवल्क्य चडवडीत ब्रह्मचर्य पाळून शारदादेवीच्या एकनिष्ठ उपासनेत अहोरात्र रगून व गढून गेले होते वैशपायनाच्या आश्रमात राहून यजुर्वेदाचे त्यानी यथासाग व शास्त्रशुद्ध अध्ययन केले या आश्रमात त्यानी जवळ जवळ एक तप म्हणजे बारा वर्षे घालविली. पण एका यजुर्वेदा-

वरच त्याची बौद्धिक तहान भागण्यासारखी नव्हती. तत्कालीन विद्वानांत मागेपुढें अग्रपूजेचा मान पटकावण्याची त्याची हौस व उमेद होती मग एका यजुर्वेदावर ते कसे घडून येणार ? म्हणून से आता तेथून निघून मंत्रसिद्धीचे शिक्षण घेण्यासाठी म्हणून त्या विद्येचे प्रसिद्ध आचार्य जे मंत्रविद्याविशारद उद्दालक आरुणि त्याच्याजवळ येऊन राहिले



# उद्दालक आरुणीचा आश्रम

या पुण्यभू भारतवर्षात प्राचीन काळी ज्या महान् महान् व अविस्मरणीय विभूति चमकून गेल्या, त्यात उद्दालक महर्षि यांची प्रामुख्याने गणना होते हे उद्दालक सुप्रसिद्ध अरुणि ऋषींचे पुत्र असून, वेदविद्येत अत्यंत निष्णात व यज्ञकर्मात मोठे प्रवीण असे अधिकारी आचार्य होते त्यांचा यजुर्वेदाचा अभ्यास सूक्ष्म व खोल असून मंत्रविद्येत व अध्यात्मशास्त्रात त्यांचा हात धरणारा असा त्या वेळी दुसरा कोणीच नव्हता हे आयोद धौम्य यांचे शिष्य असून, वेद व उपमन्यु यांचे सहाध्यायी होते ( भारत आदिपर्व अ ३ )

ते पांचाल देशाचे राहणारे असून ज्ञानार्जनार्थ अनेक ठिकाणी प्रवास करून त्यांनी आपल्या ज्ञानात अपूर्व भर घातली होती शिवाय उत्तरेत मद्र देशात जाऊन तेथील पतंजल काप्य नावाच्या विद्वान गुरूजवळ जाऊन, त्यांच्याकडूनहि त्यांनी विद्या संपादन केली होती साऱ्या उत्तर हिंदुस्थानात संचार करून जेथें जेथे म्हणून नावाजलेली विद्यापीठ होती, तेथे तेथे जाऊन त्यांनी विद्या संपादन केलेली होती त्यांचे सांगण्यासारखे मुख्य वैशिष्ट्य म्हणजे तें हे की, मंत्र व अध्यात्म विद्येत त्यांचा अधिकार फार मोठा होता त्यांचा मुलगा जो श्वेतकेतु त्याला 'तत्त्वमसि' चे महावाक्य पटवून देणारे महात्मे म्हणजे हे उद्दालकच होत छांदोग्यावर दृष्टि फिरविली म्हणजे त्यांच्या योग्यतेची व अधिकाराची चांगली साक्ष पटते

अशा प्रयात गुरूजवळ याज्ञवल्क्य हे आता मन्त्रविद्येचे गूढ ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी म्हणून येऊन राहिले त्याबरोबरच अध्यात्मविद्येचा अभ्यास करण्याचाहि त्यानी निश्चय केला त्याची स्मरणशक्ति आणि ग्रहणशक्ति मोठी तीक्ष्ण व सूक्ष्म असल्यामुळे नुसते डोळ्यानी पाहून व कानानी ऐकूनच ती गोष्ट त्याच्या बुद्धीत शिरून तेथे रुजून वसत असे त्याची जिज्ञासा मोठी दाडगी असल्यामुळें इतर विद्यार्थ्यांबरोबर शुष्क गप्पागोष्टीत फुकट काळ न घालविता फावल्या वेळी गुरूच्या आसपास घुटमळत राहून आल्यागेल्या विद्वानाचे व उद्दालकाचे संभाषण आड उभें राहून लक्षपूर्वक ऐकून घेऊन त्यातील ग्राह्यांश मनात नीट जपून ठेवण्याचा त्यानी येथे आल्यावर परिपाठ ठेवला होता यामुळे त्याच्या ज्ञानात इतर शिष्यापेक्षा अधिक भर पडत जाऊन, त्या मानाने त्याचे विद्यार्थी मडळात वजन वाढीस लागले चारचौघात त्याचा बोलबाला चालू होऊन, पुढें तो उद्दालकाचे विद्वान चिरजीव श्वेतकेतु याच्या कानावर जाऊन पोचला. याचा परिणाम असा झाला की, पुढें त्या दोघाचा परिचय व सलोखा वाढून त्याचे थोड्याच दिवसात स्नेहभावात रुपातर झाले श्वेतकेतु हे वयाने याज्ञवल्क्यापेक्षा थोडें मोठे होते. तरी दोघाचा स्वभाव, विचार व वर्तन एकमेकास जुळते असल्यामुळे त्याच्यात लवकरच स्नेह जमून आला

उद्दालक आचार्य याचा त्या वेळी अध्यात्म विद्येतला अधिकार फार मोठा असल्यामुळे नेहमी देशातील नामांकित पडित कोणी ना कोणीतरी याच्या भेटीस येत. त्या वेळी त्याच्या-त्याच्यात महत्त्वाच्या विषयावर भारदस्त चर्चा होत असे ती मोठी बोधप्रद व

मननीय असे. म्हणून याज्ञवल्क्य ती संधि सहसा वाया जाऊ देत नसत. ते त्या आश्रमात असताना अनेक प्रतिथयश विद्वानाचा व तत्त्वज्ञाचा अलभ्य असा दर्शनलाभ होऊन विविध विषयावरील त्याच्या विचारसरणीची अधुक अधुक ओळखहि त्यांना होऊ लागली. वेदविद्यापारगत असा प्राचीनशाल, सत्ययज्ञ, इंद्रद्युम्न, बुडिल, शौचेय, प्राचीनयोग्य असे महाश्रोत्रिय ब्राह्मण व त्याचप्रमाणे राजा अश्वपति, प्रवाहण जैवलि, अजातशत्रु, जानश्रुति इत्यादि तत्त्व-ज्ञाननिपुण राजर्षी याच्या दर्शनाचा व वादश्रवणाचा लाभ त्याना येथे आयताच लाभून, त्याच्या विचारात मोठी भर पडत चालली. त्यात राजा अश्वपति म्हणजे फार मोठा विद्वान होता तो इतक की, खुद्द उद्दालक आचार्यांना देखील त्याच्याजवळ जाऊन वैश्वानर आत्म्याचे ज्ञान त्याच्याकडून मुद्दाम शिकून घ्यावे लागले (छा. ५– ११ ते १७ ) अर्थात् या उद्दालकाच्या आश्रमात राहून मंत्र-सिद्धीचे ज्ञान करुन घेण्याचा उद्योग तर याज्ञवल्क्याने झपाट्याने चालविला. शिवाय आणखी इतर ज्ञानात भर घालण्याच्या कामीहि त्यानी पुष्कळ प्रयत्न केले.

गुरुवर्य उद्दालक आरुणीजवळ राहून, मंत्रविद्या हस्तगत करुन घेतल्यावर पुढे तेथून निघून, ऋग्वेदाचा अभ्यास करण्या साठी म्हणून ऋग्वेदाचार्य शाकल्य गुरुजवळ येऊन तेथे काही काल वास्तव्य केले व ऋग्वेदाचा पाठ घेण्यास त्यानी सुरवात केली. हे शाकल्य गुरु म्हणजे ऋग्वेदाचे मोठे प्रसिद्ध आचार्य होते. त्यांचे गुरु-कुल ऋग्वेद-अध्ययनासाठी प्रख्यात असून, विद्यार्थी तेथे बहु संख्येने उपस्थित होते त्यातच याज्ञवल्क्यांची भर पडली.

याज्ञवल्क्य हे शाकल्य ऋषीजवळ राहून ऋग्वेदाभ्यास करीत असताना एक अद्भुत प्रकार घडला. त्याचा येथे निर्देश

करणे जरूर व युक्त आहे हे शाकल्य ऋषि म्हणजे मोठे प्रसिद्ध आचार्य होत आणि त्याचा शिष्यपरिवारहि तमाच मोठा दाडगा होता ते सुप्रिय राजाचे पुरोहित होते तेथील प्रधान असा होता की, नित्य राजवाड्यात जाऊन दैनिक पौरोहित्य कृत्यें करावयाची व राजास शांति अभिषेक करावयाचा पौरोहित्य कृत्य ते स्वत जाऊन करीत आणि शांति अभिषेकासाठी कोणा तरी एका शिष्यास सागत हा शिष्य माग राहून राजास शांति अभिषेक करून मग आश्रमाकडे येई

याप्रमाणे दररोज एकेक शिष्य या कामासाठी क्रमानक्रमाने तेथे मागें राहून, राजास शांति अभिषेक करून, मग आश्रमाकडे परत येई असे होता होता एक दिवस ही पाळी याज्ञवल्क्यावर आली नियमाप्रमाणे गुरुजी वाड्यातील नित्यकर्म आटोपून, शांति अभिषेकार्थ याज्ञवल्क्याना तेथे सोडून वहिवाटीप्रमाणे ते आश्रमाकडे परतले आणि याज्ञवल्क्य तेवढेच तेथे मागे राहिले.

हा राजा म्हणजे एक विचित्र वल्ली होती परमेश्वराने तर-तम-बुद्धी बाजूला ठेवूनच त्याची मूर्ति तयार केली होती की काय न कळे राजे हे शहाणे तर शहाणे, आणि मूर्ख तर मूर्ख, उदार तर उदार, आणि लोभी तर लोभी, रगेल तर रगेल आणि मावे तर मावे असत सुप्रिय राजा म्हणजे असातलाच एक अर्धवट राजा होता ही स्वारी ऐन तारुण्यात असून मोठी रगेल होती तशात त्याला रमणीविलासाचे भारी वेड असे 'कामातुराणां न भयं न लज्जा' ही सुभाषितोक्ति त्याच्या बाबतीत अक्षरश सार्थ होती.

याज्ञवल्क्यानीं नियमाप्रमाणे होम करून, आपल्या मंत्रकौशल्याचा उपयोग करून राजाच्या अभिषेकार्थ मुद्दा जपतीर्थ

तयार केले आणि त्या दिव्यतीर्थाने त्यास अभिषेक करण्यासाठी म्हणून ते राजमहालात आले तेथे त्याना विलक्षण प्रकार दिसला. एका वारागनेच्या प्रेमविलासात ते अगदी रगून गेले होते याज्ञवल्क्य समोर येऊन उभे राहिले, तरी दाद ना फिर्याद ! याज्ञवल्क्याला पाहूनहि राजा ताळ्यावर आला नाही आणि त्याने प्रेमलीला थाबविल्या नाहीत, कपडे सावरले नाहीत की पलगावरुन उठून स्वारी पुढे आली नाही, आदर दाखविला नाही की शिष्टाचारहि पाळला नाही इतकेच नव्हे तर पलगावर पडूनच निर्लज्जपणे त्याना म्हणाला,'हे ब्राह्मणा, हल्ली मी विलासात असल्याने तुझा तो शाति अभिषेक आज मला नको ते तुय तीर्थ तेथेच कोठे तरी शिपडून चालता हो '

केवढा हा अपमान आणि कोण ही अप्रतिष्ठा ! दिव्योदकाने अभिषेक करावयास आलेल्या शिष्योत्तमाचा धिक्कार आणि तो एका वारागनेसमोर ! वेदोनारायणाचा केवढा अपमान आणि तेजस्वी पुरुषाची केवढी ही अप्रतिष्ठा ! याज्ञवल्क्य मानी होते याज्ञवल्क्य तो निर्लज्ज प्रकार पाहून, मनात फार चिडले, सतप्त झाले, पण करता काय, राजाशी प्रसग होता मूर्ख, पाजी, उद्धट, दुष्ट, भ्रष्ट, साराश, कसाही असला तरी राजा तो राजाच तेथे शहाणपणाचा उपयोग होत नाही शिष्टाचाराची प्रतिष्ठा, नीतीचे महत्त्व, शहाणपण, सारासार विचार, न्यायनीति, लाजलज्जा सर्व मोळून पिणाऱ्या कामाध व मदाध अशा राजाना त्याचे काही वाटत नाही राजे-महाराज म्हणजे महामूर्ख असा जो आज उपरोधिक अर्थ मानण्यात येतो, त्याला कारण म्हणजे त्याच्या लहरी व विचित्र लीलाच होत.

सुप्रियाने आज्ञा केल्यावरोवर याज्ञवल्क्य तेथून मार्ग

वळून शेजारच्या एका खावाजवळ आले. तेथे येऊन ब्रह्याचें ध्यान करुन 'फलिनो ये ' हा मंत्र जपून ते जपतीर्थ त्यांनी त्या खांबावर शिंपडल्याबरोबर मोठा चमत्कार झाला! तो वाळलेला. तासून व रधून, साफ केलेला शुष्क खाब, पण त्या दिव्य जपोदकाचा स्पर्श होताच त्यालाच क्षणार्धात सुदर पालवी फुटली आणि हा हा म्हणता तो फलपुष्पानी सुशोभित झाला ( 'तत् स पतिते तोये स्तम्भ पल्लवशोभित तत्क्षणादेव सजज्ञे फलपुर्ष्पैविराजित ' स्कद, ६–१२९–२१ ) !

केवढा हा मंत्रप्रभाव आणि केवढी ही अद्भुत गोष्ट ! प्रेतामध्यें चैतन्य शिरले, अमावास्येची पौर्णिमा झाली, लोखंडाचे सुवर्ण बनले आणि शुष्क काष्ठाचा सुदर वृक्ष झाला. विसाव्या शतकातल्या वाचकानो ! ही गोष्ट तुम्हास कशीशीच वाटेल. पण ती अपूर्व नवलाई घडली, हे मात्र खास. आपल्यातील मंत्रसामर्थ्य नष्ट झाले आहे म्हणून अशा गोष्टी आज काल्पनिक व चमत्कारिक वाटतात हे युक्तच आहे. पण रानांत वाढलेल्या रानवटालाहि राजधानीतील सुदर राजवाडा म्हणजे असाच काल्पनिक वाटत असतो तसाच हा प्रकार आहे.

सुप्रियाने हा अपूर्व व अद्भुत प्रकार डोळयांनी पाहिला मात्र. तो आश्चर्यानें दिपूनच गेला. क्षणमात्र तो दिङमूढ झाला. हे काय झाले नि कसे झाले हें त्यास समजेना. हा अननुभूत प्रकार पाहून मनातून तो एक प्रकारे चमकल्यासारखा झाला. आणि थोडासा वरमला व नरमलाहि. शेवटी त्याने पलंगावरून उठून आणि नम्रपणाने हात जोडून त्या महाभागाची क्षमा मागितली.

" द्विजोत्तमा " हात जोडून तो म्हणाला, " क्षमा करा !

मला क्षमा करा! चूक झाली माझी, मला क्षमा करा! माझ्या-वर त्या तुमच्या जपतीर्थाचा मगलाभिषेक करा तो प्रभावी मत्र पुनः म्हणा आणि माझे मस्तक तुमच्या दिव्य अभिषेकाने पुनीत होऊ द्या! "

(सत्पुरुषाचे अत.करण एकदा कठोर झाले की, मग वज्रालाहि दाद देत नाही.) याज्ञवल्क्याचे अंत.करण आता वज्रापेक्षाहि कठोर झाले होते. राजाचा उद्धटपणा व उन्मत्त-पणा पाहून ते मनात फार चिडले व सतापले होते. ब्राह्मणाचा अपमान आणि वेदोनारायणाची थट्टा ही मानी व निस्पृह पुरुषाला खपणे शक्य नसते

" नाही, राजा, नाही " याज्ञवल्क्य कडाडले, " आता ती गोष्ट बोलू नकोस. झाले ते होऊन गेले. आता त्याचे नावहि काढू नकोस. माझा रस्ता मोकळा आहे " असे म्हणून ते तेथून दरवाजाकडे जाऊ लागले.

राजा मध्येच आडवा होऊन, त्याची वाट अडवून पुन नम्रतेने म्हणाला, " हे पुण्यपुरुषा, असे रागावू नका. न कळत माझी चूक झाली, मला क्षमा करा. माझा अपराव पोटात घाला. तो तुमच्या हातचा पवित्र अभिषेक मजवर करण्याची कृपा करा, हे दिव्य पुरुषा, मजवर रोज अभिषेक होत होता. पण असा दिव्य प्रकार माझ्या अनुभवात आलेला नव्हता. आपण पुण्यपुरुष आहात. तर आता माझ्यावर तो दिव्य अभिषेक होऊ द्या हे सत्पुरुषा, आपणास सुदर वस्त्रे देतो, मोठे अलंकार देतो, उत्तम गाई-घोडे देतों, नाना वाहने देतों, गजान्त लक्ष्मी देतो, फार काय, आपण मागाल तें देतों. पण मला आपल्या पवित्र हातचा तो पुण्य अभिषेक एकवार घडू द्या.

" नाही, " याज्ञवल्क्य निर्धाराने उत्तरले, " नाही, राजा,

नाही तो गोष्ट आता कदापि शक्य नाही ते सुदर भाग्य तुझ्या नशिवी नाही विषयमदात व घुंदीत तू ब्राह्मणाला अवमानिलेस आणि वेदमाउलीस धिक्कारलेस आता तुझी इच्छा सफल होण्याची आशा नाही राजा, तू म्हणशील तेव्हा असे दिव्योदक चटकन् तयार होत नसते त्याला अग्निनारायणाचा प्रसाद लागतो त्याशिवाय मत्रात चैतन्य स्फुरत नाही तू राजा झालास म्हणून काय झाले ? वेद ब्राह्मणाचा अवमान करणारा तू पापी व चडाळच आहेस चल, सोड माझी वाट आणि कर माझा रस्ता मोकळा तुझ्या राजेपणाला भुलून धर्माचा बाजार मांडणारा हा याज्ञवल्क्य नाही, राजा मला आता अडवू नकोस उशीर झाला जाऊ दे मला असे म्हणून राजाच्या विनतीची पर्वा न करिता धाडधाड पाय आपटीत याज्ञवल्क्याची स्वारी तेथून निघून चालती झाली राजा मुखस्तभ होऊन जेथल्या तेथेच हा प्रकार पाहात तसाच पुतळ्याप्रमाणे उभा राहिला

याज्ञवल्क्य अजून विद्यार्थी दशेतच होते तरी त्याची सत्वनिष्ठा व स्वाभिमान केवढा ज्वाज्वल्य होता, हे वरील सभाषणावरून चागले व्यक्त होत मुलाचे पाय पाळण्यातच दिसतात असे म्हणतात, ते काही खोट नाही सुप्रिय म्हणजे काही लहानसहान व्यक्ति नव्हती बोलून चालून प्रत्यक्ष देशाचा अधिपति आणि त्यात शाकल्याचा आश्रयदाताहि होता ह सर्व जरी खरे असले तरी त्याना काय त्याचे सोयरसुतक थोडेच होते (जेथे सत्वाला जखम झाली, तेथे त्रैलोक्याचे राज्य मिळाले म्हणून काय व्हावयाचे आहे ?) सत्त्वधीर आपल्या सत्यापासून चळले, असे कोठे झाले आहे काय ? राजाने परोपरीने विनवणी केली, हात जोडले, क्षमा मागितली, नाना तऱ्हेचे आमिष दाखविले आणि

हरतऱ्हेनें त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न करुन पाहिला. पण कशा-लाच यश आलें नाहीं. सत्त्वनिष्ठ व करारी याज्ञवल्क्य कशानेहि वितळले नाहीत. ते जे राजवाड्यातून बाहेर पडले, ते सरळ-आश्रमाच्या रस्त्यास लागले.

याज्ञवल्क्य निघून गेल्यावर तिसरें प्रहरीं राजा शाकल्य-मुनीकडे आला आणि हात जोडून म्हणाला की, "गुरुजी, आज जो आपण अभिषेकार्थ शिष्य पाठविला होता तोच पुन. उदईकहि पाठवावा. गुरुजी कोण तो ?"

शाकल्य उत्तरले — तो याज्ञवल्क्य होय. मोठा प्रतापी नि मोठा तेजस्वी आहे तो. तसाच मोठा करारीहि आहे.

सुप्रिय :—त्यालाच उद्यां पाठवा.

शाकल्य :—दुसरा चालणार नाहीं का ?

सुप्रिय :—त्यालाच पाठवाल तर बरं होईल

शाकल्य :—बरं.

शाकल्याना नमस्कार करुन सुप्रिय तेथून निघून गेला. शाकल्यानी राजाच्या विनंतीस होकार दिला खरा. पण त्या दिवशी वाड्यांत घडलेला प्रकार व झालेली हकीकत याची त्याना कल्पना नव्हती. म्हणून त्यानी राजास 'होय' असें म्हटलें. आणि राजाहि त्या उत्तरानें खूष होऊन परत वाड्याकडे निघाला.

राजा निघून गेल्यावर गुरुजी याज्ञवल्क्यास म्हणाले, "मुला पुन. राजवाड्यांत उदईक शांति अभिषेकार्थ तुला गेलेंच पाहिजे. खुद्द राजा येऊन पुनः तुलाच पाठविण्यासाठी आग्रहाने सांगून गेला आहे." मग याज्ञवल्क्य हात जोडून नम्रतेनें म्हणाला, "गुरुजी माफ करा. दुसऱ्या कोणाला तरी पाठवा."

शाकल्य :—कां बरे ? तुला काय झालें तेथे न जायला ?

याज्ञवल्क्य —नाही, गुरुजी मी तेथें जाऊ इच्छित नाही. मला तेथे जाणे इष्ट वाटत नाही

शाकल्य —का, मुला अस का म्हणतोस ? अन् अस म्हणून कसे चालेल ? तो राजा आहे शिवाय आपला आश्रयदाता आहे. त्याची इच्छा मोडून कस चालेल ?

याज्ञवल्क्य —गुरुजी, स्पष्टच मागू आपल्याला आपण रागावू नये तो राजा मोठा द्वाड आहे, भ्रष्ट आहे नष्ट आहे, पुन सागतो तो पापी व चाडाळहि आहे

शाकल्य —याज्ञवल्क्या अस का म्हणतोस ?

याज्ञवल्क्य —त्यान माझा अपमान केला एका हलकट स्त्री देखत माझा अपमान केला. तीर्थोदकाने मी त्यास अभिषेक करावयास गेलो असता त्याने माझा धिक्कार केला अशा उर्मटाच्या घरी पुन मी पाऊलहि ठेवणार नाही गुरुजी साफ सागतो, तेथें मी जाणार नाही. कृपा करा, मला तेथे धाडू नका मी त्याचे तोडहि पाहणार नाही ( 'नाह तात गमिष्यामि शात्यर्थ तस्य मदिरे, अवलेपेन युक्तस्य श्रद्धाविरहितस्यच' स्कद ६–१२९–३२ )

हे वाक्य याज्ञवल्क्य इतक्या निर्धाराने बोलले को, त्यामुळे शाकल्य निरुत्तर झाले

गुरुजीला आता मोठी पचाईत पडली. राजाचा शब्द मोडवेना आणि शिष्याला आता जा म्हणवेना. मनुष्य एकदा अन्नाचा मिधा झाला म्हणजे त्याचा विवेक बोथट होतो गुरुजीचे तसेच झाले. त्याना शिष्याचे म्हणणे पटले होते पण राजाची भीड मोडवत नव्हती. सुप्रियाचा उद्धट स्वभाव ते ओळखून होते. पण त्याचा आश्रमास मोठा आश्रय असल्यामुळे त्याला नाखूप करण्याचे धैर्य त्याना होईना शिवाय आपला शब्द आधीच गुतून चुकला होता. मग आता या पेचातून सुटायचे कसे? पुन पुन त्यानी

याज्ञवल्क्याचे मन वळविण्याचाच प्रयत्न केला पण शिष्य म्हणजे काय, प्रत्यक्ष मेरुचा अवतार होता एकदा 'ना' म्हटले की, ते वज्र-लेपच प्रत्यक्ष ब्रह्मदेव आला तरी फिरावयाचे नाही सत्त्वशील पुरुषाचा स्वभावच असा असतो की, एकदा तोंडातून शब्द निघाले की त्याला मेरुचे रूप आलेच नाना परींनी सांगून पाहिले, राजाचे भय घातले आणि आपली सर्व पुण्याई खर्च केली, पण पालथ्या घागरीवर पाणी ओतल्यासारखें झाले 'मी जाणार नाही' हा त्यांचा एकच हट्ट आणि शेवटी तो त्यानी तडीसहि नेला 'तुला जर आमचे ऐकावयाचे नसेल, तर आमच्या आश्रमात राहू नकोस' असा शाकल्यानी त्यास स्पष्ट इशारा दिला तरी मानी याज्ञ-वल्क्य डगमगले व डळमळले नाहीत त्याच दिवशी आश्रमाला त्यानी रामराम ठोकला पण त्या भ्रष्ट राजाच्या दारी पुन पाऊल म्हणून त्यानी ठेवले नाही सत्याग्रह म्हणतात तो हा होय ( स्कद, ६-१२९- १ ते ५० )

याज्ञवल्क्याना ही जी अलौकिक मनसिद्धि प्राप्त झाली होती, ती त्यानी उद्दालक आरुणीकडून प्राप्त करून घेतली होती याजबद्दल बृहदारण्यकात उपमद व्रताचे निरूपण करताना उल्लेख आढळतो तो असा–('त हैतमुद्दालक आरुणिर्वाजसनेयाय याज्ञवल्क्यायान्ते-वासिन उक्त्वोवाचापि य एन शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरञ्छाखा प्ररोहेयु पलाशानीति' बृ ६–३–७ ) 'तो हा मत्र उद्दालक आरुणि यानी आपला शिष्य जो वाजसनेय याज्ञवल्क्य यास सागून म्हटले की, हा मत्र शुष्क खाबावर शिपडला तर त्या खाबाला फाद्या फुटून त्याला पालवीहि फुटेल' आणि याज्ञ-वल्क्याना याचा प्रयोग सुप्रिय राजाच्या मदिरात करून पाहण्याची संधी मिळाली व त्याची त्याना प्रचीतिहि आली



# योगाभ्यास

ही भारतभूमि वेद व अध्यात्म विद्येची जशी जन्मभूमि आहे तद्वत योगविद्येचेहि ती माहेरघर आहे असे म्हणावयास हरकत नाही. प्राचीन काळी ही योगविद्या या पुण्यभूमीत उत्कर्षाच्या अत्युच्च शिखरास जाऊन पोचली होती, ही गोष्ट इतिहासावरून निर्विवाद सिद्ध होते याज्ञवल्क्याच्या काळी महायोगीश्वर हिरण्यनाभ याचा आश्रम या योगविद्येसाठी मोठा प्रसिद्ध असून, तेथे अनेक विद्यार्थी योगाभ्यासासाठी येऊन राहिले होते त्यात ब्राह्मणहि होते आणि क्षत्रियहि होते त्या वेळी भारतीयाच्या विद्यापीठात ब्राह्मण-क्षत्रिय असले भेदभाव, जातीयता आणि आधुनिक संकुचित भेददृष्टिहि नव्हती हेच दुसऱ्या तऱ्हेने सागावयाचे म्हणजे, त्या वेळी विद्याभ्यासात आधुनिक अर्थाची जातीयता आड येत नव्हती काही क्षत्रियानी तर ब्राह्मणाइतकाच निरनिराळ्या विद्यात उच्चाक गाठला होता राजा जनक, राजा अश्वपति, राजा प्रतर्दन, राजा अजातशत्रु, राजा प्रवाहण, असे अनेक क्षत्रियपुगव वेदविद्येत, अध्यात्मविद्येत आणि योगविद्येत अत्यत तरबेज झाले होते.

हिरण्यनाभ क्षत्रिय असून, प्रत्यक्ष इक्ष्वाकु कुळात-श्री रामचद्राच्या कुळात त्यानी जन्म घेतला होता या अवतारी पुरुषापासून ते सतरावे वशज होते ते विश्वसहाचे पुत्र असून ( वायु ८८-२०७ ) सुकर्माचेशिष्य होत (भागवत,१२-६-७७ ) सुकर्मा

हे व्यासशिष्य जैमिनीचे पणतू असल्यामुळे ते भारत कालातले, अर्थात वैशंपायन, जनमेजय, उद्दालक, असित, देवल इत्यादिकांच्या समकालीन ठरतात मिथिलेचे सुप्रसिद्ध जनक राजे हे या हिरण्यनाभाचे शिष्य असून जनक वंशातले ते शेवटचे राजे होत म्हणजे जनकवंशाची पिढी येथे परिसमाप्त होते (विष्णु. पु ४-६-१२)

प्राचीन काळी योगविद्येला अत्यंत महत्त्वाचे व बहुमानाचे स्थान होते कारण ही विद्या वेदविद्येसारखीच श्रेष्ठ व प्रभावसंपन्न असून ऋषिपद प्राप्त करून घेण्याला या विद्येसारखे अन्य साधन नव्हते या विद्येचा प्रभावच असा विलक्षण आहे की, थोर विभूति होण्याला व म्हणवून घेण्याला ही योगविद्याच मूळ कारणीभूत आहे चंचल चित्त एकाग्र होणे योगाशिवाय शक्य नाही एकाग्र चित्ताशिवाय आत्मज्ञान प्रभावी होणे दुष्कर असून आत्मज्ञानाशिवाय मानवजन्म सफल झाला असे म्हणता यावयाचे नाही अर्थात् हे पूर्णत्व येण्यास योगसाधनाची अत्यंत जरूरी आहे

आम्ही असे का म्हणतो, ह्याची योगविद्येचा महिमा कळल्याशिवाय वाचकांना यथार्थ कल्पना येण्यासारखी नाही म्हणून त्या विद्येचा प्रभाव काय आहे हे येथे थोडक्यात सांगणे आम्हास इष्ट वाटते या योगाचा महिमा योगतत्त्वोपनिषदात वर्णिला आहे तो असा '– 'यथा वा चित्तसामर्थ्यं जायते योगिनो ध्रुवम् । दूरश्रुतिर्दूरदृष्टिः क्षणाद्दूरागमस्तथा ॥ वाक्सिद्धिः कामरूपत्वमदृश्यकरणी तथा । मलमूत्रप्रलेपेन लोहादेः सुवर्णता भवेत् ॥ खेगतिस्तस्य जायेत सततभ्यास योगतः । सदा बुद्धिमता भाव्यं योगिना योगसिद्धये ॥ भावार्थ – योग्याचे चित्तसामर्थ्य जसजसे दृढ होत जाईल, तसतसे त्याला वाक्सिद्धि–म्हणजे तो बोलेल तसे होणे–लाभत जाते त्याला दूरचे ऐकू येते व लांबचे दिसू लागते क्षणात लांबून येता येते त्याला वाटेल ते रूप धारण करता येते. दृष्टीला न दिसणारे असे सूक्ष्म व स्थूल चमत्कार करता येतात. मलमूत्राचे लेपन करून तो त्याचे सुवर्ण बनवू शकतो व आकाशात

सचार करण्यास समर्थ होतो। या व असल्या अनेक दिव्य शक्ति त्याला योगसाधनापासून प्राप्त होत असून तो मनुष्यातला जवळ जवळ देवच बनून जातो

अशा प्रकारची दिव्यशक्ति– ही योगविद्या– प्राप्त करून घेण्यासाठी याज्ञवल्क्य आता या हिरण्यनाभाच्या आश्रमात येऊन राहिले होते. विद्येची ज्याला तहान आहे व खरी आवड आहे, तो तत्प्राप्त्यर्थ सुखसर्वस्वावर– चैन व हौसेवर पाणी सोडण्यास व कसलेहि कष्ट व हाल सोसण्यास एका पायावर तयार असतो तेव्हा काय नि आता काय जातिवंत विद्यार्थ्यांचा प्रत्यक्ष असाच प्रकार दृष्टोत्पत्तीस येतो । विद्यातुराणा न सुख न निद्रा । कामातुराणां न भय न लज्जा ।।' ही सुभाषोक्ति त्रिकाल खरी आहे याज्ञवल्क्याची प्रकृति खऱ्या विद्यार्थ्यांच्या मालिकेत मोडत होती हे उघड सांगणे नकोच या योगाश्रमात राहून रात्रंदिवस खपून ती कष्टसाध्य योगविद्या थोडक्याच वेळात त्यानी हस्तगत करून घेतली नंतर तेथून निघून यजुर्वेदाचे आध्वर्यवज्ञान करून घेण्यासाठी पुन ते मामाच्या म्हणजे वैशंपायनाच्या आश्रमात आले.

यावेळी याज्ञवल्क्य भर ज्वानीत– ऐन पचवीसाच्या घरात– आरते परते होते. त्याचे विद्यातेजहि तसेच मोठे प्रखर होते अग्नीप्रमाणे त्याच्या मुखावर ज्ञानकांति विलसत होती. त्या सबंध आश्रमात त्याच्यासारखा ज्ञानसपन्न विद्यार्थी क्वचितच होता त्याचे ते ज्ञानवैभव पाहून जो तो विद्यार्थी त्याच्यापुढे कौतुकपूर्वक प्रेमादराने नम्र होई तेथील विद्यार्थीजगात त्याचा बोलबाला दिवसेदिवस वाढत चालला. वेदविद्या, मत्रशास्त्र, योगविद्या यात त्याचा हात धरणारा त्या सबध आश्रमात कोणीच नव्हता. ते स्वभावाने सरळ, आचरणाने शुद्ध व मनाने उदार असे असल्यामुळे लवकरच आश्रमातील शिष्यगणात प्रमुख व मोठे शिष्यनायक होऊन बसले असल्यास त्यात आश्चर्य तरी काय ?

---

# धर्म म्हणतां कर्म

व्यवहारात मोठी माणसेहि चुकतात कोण केव्हा नि कसा घसरेल, याचा नेम नसतो वैशंपायन ऋषी म्हणजे मोठी विभूति पण ते सुद्धा एका प्रसंगात घसरलेच तो प्रसंग पुढीलप्रमाणे होता एकदा सर्व ऋषींनी मिळून काही कार्यानिमित्त न चुकता एके ठिकाणी जमण्याचे ठरविले होते जो कोणी ठरलेल्या वेळी हजर राहण्यास चुकेल त्यास ब्रह्महत्येचे पातक लागेल, असेंहि शासन प्रगट केले होते ( वायु ६१–१४ ) पुढे तो दिवस उजाडला आणि नेमलेल्या वेळी सर्व ऋषी संकेताप्रमाणे उपस्थित झाले पण वैशंपायन मात्र हजर राहू शकले नाहीत अर्थात् त्यानी नियम मोडल्यामुळे त्याना ब्रह्महत्येचा दोष लागला

एवढ्यावरच ही आपत्ति संपली नाही पुढें कर्मधर्म संयोगानें त्याना बालहत्येचेहि पातक लागले. एके दिवशी ते पहाटेस उठून स्नान करण्याकरता म्हणून नदीवर जावयास निघाले होते पण या गडबडीत घरात एका कोपऱ्यात त्याच्या बहिणीचे एक लहान मूल निजले होते त्याच्या अंगावर चुकून त्याचा पाय पडला आणि ते मूल दुर्दैवाने गतप्राण झाले ( 'स्वस्त्रीय बालक सोऽयं पदा स्पृष्टमघातयत् ।' विष्णु, ३–५–५ ) ब्रह्महत्या व बालहत्या या जोड महापातकातून मुक्त होण्याकरता म्हणून प्रायश्चित्त घेणे त्याना ओघानेच प्राप्त झाले यासाठी त्यानी आपल्या शिष्यवृंदास जवळ बोलावून घेऊन, त्याना घडलेली हकीकत कळविली नि आपणाकरता प्रायश्चित्त आचरण्यास सांगितले. या शिष्यगणात याज्ञवल्क्यहि होते

वैदिककाळी प्रायश्चित्त घेणे म्हणजे तीर्थयात्रा करीत करीत देशसचार करावा लागे या पद्धतीला अनुसरून प्रायश्चित्त घेणारा परशुराम हा कार्तवीर्यास ठार मारल्यावर तद्दोषनिवारणार्थ म्हणून तीर्थयात्रा करीत हिंडत होता, त्याच वेळी अर्जुन हा धर्म–द्रौपदीचा एकान्त पाहून लागलेल्या दोषपरिहारार्थ तीर्थयात्रा करीत हिंडत होता, ही गोष्ट ' रुचतो का तीर्थयात्रा या समयी त्यास ती ' या सुभद्रेच्या पदाने महाराष्ट्रास मशहूर आहेच बलदेवाने रोमहर्षणसूतास ठार मारले म्हणून तत्पापक्षालनार्थ तो काही दिवस तीर्थयात्रा करीत होता साराश, कोणत्याहि पापाबद्दल प्राय श्चित्त घ्यावयाचे झाल्यास तीर्थयात्रेच्या द्वारा घेण्याचा तेव्हाचा परिपाठ होता

या वेळी याज्ञवल्क्य हे तरुण, मोठे सशक्त व सुदृढ होते ते बुद्धीने तीक्ष्ण मनाने उदार स्वभावाने सरळ व आचरणाने पवित्र असून जरा उतावीळ वृत्तीचे होते विद्या व धाडस यात त्याचा हात धरणारा तेथ दुसरा कोणीहि नव्हता त्याचा उत्साह म्हणजे भारी दाडगा आणि कामाची हौस तर मोठी विलक्षण होती कसलहि अवघड काम असो, ते अगावर घेऊन पार पाडून दाखविण्याचा त्याचा बाणा होता ते स्वत ला वैशपायनाचा मोठा आवडता शिष्यहि समजत

वैशपायन ऋषीच्या प्रायश्चित्ताबद्दलचे भाषण ऐकून गुरुभक्तिपरायण याज्ञवल्क्याचे अत करण कळवळले व विरघळले इतर शिष्याच्या उत्तराची वाट न पाहता ते एकदम पुढे होऊन म्हणले, " गुरुदेवा, मीच एकटा ते तुमचे सर्व प्रायश्चित्त घतो ( ' भगवन् अहमेक. करिष्यामि ' वायु. पुराण, ) उगीच इतराना त्रास व दगदग हवी कशाला ? ते इथच राहोत ( ' तिष्ठतु

मुनयस्त्विमे ' वायु पु. ). असें म्हणून गुरुजींची आज्ञा मिळण्यासाठी ते त्यांच्याकडे मोठ्या उल्हसित नेत्रांनी पाहात उभे राहिले.

त्यांचें भाषण अगदी सरळ व सच्छिष्याला पूर्ण शोभण्यासारखे होतें. त्यात वावगें असें कांही नव्हते. पण दुर्दैवानें गुरुजीस मात्र तसे वाटले नाही. इतर शिष्यांना तुच्छ मानून, याज्ञवल्क्य आपली प्रौढी मिरवूं पाहतो असा त्यांनी आपला ग्रह करून घेतला. त्यांना तो त्याचा उद्दामपणा वाटला. या त्यांच्या विपरीत समजुतीमुळे ते त्यांच्या मनांतून पूर्णपणें उतरले. त्यामुळे त्यांच्या बुद्धीचा तोल सुटला; भिवया वर चढल्या, डोळे गरगर फिरू लागले आणि क्रोधानें सर्वांग पेटले आणि ' अरे गर्विष्ठा याज्ञवल्क्या, केवढा रे तूं उन्मत्त झालास? तुझ्या विद्येची व तुझ्या सामर्थ्याची तुला फार घमेंड दिसते. आणि म्हणून तूं इतरांस टाकून बोलतोस. अरे ज्या विद्येने तूं एवढा चढेल झालास आणि इतरांना तुच्छ मानतोस ती माझी विद्या मला परत दे, ( ' यत्त्वयाधीतं सर्वं प्रत्यर्पयस्व मे' वायु. पुराण ). जा कोठेंतरी एकदाचें काळें करून व पुनः मला तुझें दर्शनहि देऊं नको ( विष्णु पु. अं. ३, अ. ५, श्लो. ८ व ९).

निरपराधी याज्ञवल्क्यावर हा जणुं विद्युत्पातच झाला. त्यांच्या अंतःकरणावर धगधगीत अग्निवृष्टि झाली. तीक्ष्ण वाग्बाणानें निष्पाप काळजाचा ठाव घेऊन त्यांच्या उत्साहावर निराशेचें विरजण पडलें. अमानुष शिक्षेचा अगदी कडेलोट झाला. त्यानें याज्ञवल्क्याचा तो तेजस्वी चेहरा खरकन् उतरला आणि तोंड गोरेंमोरें झालें. केवढा अनर्थ, केवढी शिक्षा, केवढा अपमान? धर्म म्हणतां कर्म त्यांच्यापुढें दत्त म्हणून उभें राहिलें. दैव फिरलें आणि अमृताचें विष बनलें.

कौतुक करावयाचे तेथे सूड, बक्षीस द्यावयाचें तेथें दंड, धन्यता मानावयाची तेथे संताप, आणि आशीर्वाद द्यावयाचा तेथे भयंकर शाप मिळावा अशी त्याची स्थिति झाली. गुरुसेवेत तत्पर असणारा हा शिष्य सत्त्वशील नि उदार होता ( शिष्यः परमधर्मज्ञो गुरुवृत्तिपरः सदा, विष्णु, ३–५–३ ). याज्ञवल्क्य हे धर्मज्ञ वैशंपायन ऋषीचेच प्रभावी भाचेहि होते थोरामोठ्या विद्वानाची बुद्धीदेखील केव्हा केव्हां चळते नि भ्रम पावते असे म्हणतात, त्याची येथे प्रचीति आली. वास्तविक यात संतापण्यासारखें कांही नव्हतें. याज्ञवल्क्यांचें ते भाषण वस्तुतः सरळ व भक्तियुक्त अंतःकरणातून सहज बाहेर पडलें होतें. ' गुरुजी, ' आपल्यावरील भक्तीमुळें मी तसें बोलून गेलों ( ' भक्त्यैतत्ते मयोदितम् ' विष्णु, ३-५-१० ), असें तेथल्या तेथेंच त्यांनी बोलूनहि दाखविलें. तरी वैशंपायनांचें समाधान झालें नाहीं व त्यांची समजूतहि पटली नाही. आपल्या सरळ भाषणाचा असा विपरीत परिणाम होऊन एकदम भडका उडेल, हें याज्ञवल्क्यांच्या स्वप्नांतहि नव्हतें. कोणाला टोंचावे अगर दुखवावें असा त्यांचा मुळीच उद्देश नव्हता. अथवा गुरुजी त्याचा असा विपरीत अर्थ करतील, ही कल्पनाहि त्यांना शिवली देखील नव्हती. कोणतीहि गोष्ट पुढें पुढें होऊन धडाडीनें करण्याची हौस मात्र त्यांच्यांत फार मोठी होती. इतरांना टाकून बोलून आपली नुसती प्रौढी मिरवावी असा त्यांचा मुळीच उद्देश नव्हता. आपण एकटेच तें प्रायश्चित्त घेऊन गुरुजींस दोषमुक्त करुन टाकूं, एवढीच त्यांची प्रामाणिक सदिच्छा होती. पण वैशंपायनांचा ग्रह झाला तो भलताच आणि रागाच्या आवेशांत ते बोलून गेले तेंहि पण भलतेंच बोलले.

याज्ञवल्क्य जात्याच फार मानी होते. वैशंपायनांची आज्ञा

म्हणजे सत्याचा व सद्भावनेचा अपमान आणि सदयतेचा खून होता. याज्ञवल्क्याना ते मुळीच खपले नाही आपला कसलाच अपराध नसता, अथवा असला तरी सुताचे भूत करून फर्मावलेली शिक्षा अपराधाच्या मानाने अत्यंत कडक व पूर्ण अन्यायाची आहे, असे समजून आणि कसेहि झाले तरी गुरूची आज्ञा शिरसावंद्य मानणे हे शिष्याचे परम कर्तव्य आहे हे लक्षात घेऊन त्यानी आपले डोळे मिटले आणि आपले सर्व योगसामर्थ्य एकवटून वैशंपायनाकडून जेवढी म्हणून विद्या ग्रहण केली होती, तेवढी सर्व अक्षरन् अक्षर खडाखड म्हणून भडाभड ओकून टाकून दिली. आणि क्षणाचाहि विलंब न करता धाडधाड पाय आपटीत ते तेथून हा हा म्हणता वाऱ्याप्रमाणे निघून गेले ते गेल्याने ( विष्णु ३-५-११ ) सूर्याचा अस्त झाला आणि आश्रमावर स्मशानवत् छाया पसरली !

हा सर्व अकल्पित प्रकार पाहून तेथील सर्व मंडळी आश्चर्याने थक्क झाली शरीरातून प्राण जसा निघून जावा, अथवा राजवाड्यातून राजलक्ष्मीने पाय काढावा, त्याप्रमाणे याज्ञवल्क्य त्या पुण्य आश्रमातून विजेप्रमाणे क्षणार्धात अदृश्य झाला वैशंपायन झाले तरी काय, रागाच्या भरात नि विकाराच्या आवेशात काही तरी ते बोलून गेले होते. त्याचा असा विलक्षण व विपरीत परिणाम होईल, हे त्यांच्यासुद्धा स्वप्नात नव्हते पण आता करणार काय ? झाली ती गोष्ट होऊन गेली याज्ञवल्क्य मात्र तेथून जे गेले ते पुन काही तिकडे फिरकले नाहीत

याज्ञवल्क्यानी म्हणून तोंडावाटे बाहेर टाकलेली विद्या तेथें जमलेल्या शिष्याना वैशंपायनानी ग्रहण करण्यास व जतन करण्यास सांगितल्यावरून, तित्तिरि नावाच्या शिष्यानी तिचा

स्वीकार केला. याचा अर्थ असा कीं, याज्ञवल्क्यांनी ज्या क्रमानें ती यजुर्विद्या बाहेर टाकिली, त्याच क्रमाने तित्तिरि या शिष्यांनी ती ग्रहण केली. अर्थात् तो यजुर्वेद एकदा सर्वच्या सर्व म्हणून खलास केल्यावर याज्ञवल्क्यांनी पुनः त्या वेदाचा आजन्म त्या क्रमांत व त्या स्वरांत पुनरुच्चार म्हणून केला नाही. त्यास त्याज्य मानले. ही याज्ञवल्क्य यांनी ओकून टाकलेली विद्या शिळी म्हणजे मलिन झाली असल्यामुळे तिला पुढे 'कृष्णयजुः' अशी संज्ञा प्राप्त झाली. पुढें वैशंपायनाकरता जे शिष्य प्रायश्चित्त घ्यावयास म्हणून तीर्थयात्रेस निघाले, त्यास 'चरक' हे टोपण नाव प्राप्त झालें. म्हणून वैशंपायनाच्या शिष्यात 'तैत्तिरीय' व 'चरक' असे मुख्य दोन भेद झाले आहेत ( विष्णु. पु. अ. ३, अ. ५, १२, १३ ).



# खग्रास ग्रहण

याज्ञवल्क्यानी वैशपायनास विद्या अर्पण करून ते तेथून निघून गेले नि आता ते स्वाभाविकपणे निर्विद्य निस्तेज झाले होते म्हणूनच त्याच्या उच्च आकाक्षेची राखरागोळी झालेली होती आणि सगळया उदात्त भावना करपून गेलेल्या होत्या त्याच्या कोमल काळजाच्या चिधड्या चिधड्या उडाल्या असून सर्व जीवितहि निराशेच्या गाढ अध कारात गडप झाले होते त्याच्यावर दारुण आपत्ति निरपराधी असताहि आल्यानें घरी बसून त्याना चैन पडेना व बाहेर जाऊन लोकाना तोड दाखविता येईना, अशी त्याची कुचवणा झालेली होती त्याच्या दु खाला व मनस्तापाला आता सीमा राहिली नव्हती पख तोडलेला पक्षी जसा जागच्या जागीच तडफडत असतो, मातृहीन झालेले वालक जसे मनातल्या मनातच झुरत असते, तशीच दु खावस्था त्याना प्राप्त झाली होती. त्याच्या सर्व आशा, आकाक्षा, भावना, उल्हास नि उत्साह ही सर्व पार होरपळून जाऊन, भविष्यकाळ निराशेच्या गहन व सपूर्ण अध कारात गुरफटून गेला होता

अशा निर्विद्य स्थितीत राहून कुत्र्या-माजराप्रमाणे नीरस आयुष्य कठण्यापेक्षा मेलेले काय वाईट असे त्याना वाटले तेजस्वी पुरुषाना दैन्यावस्थेतील जीवन म्हणजे नरकापेक्षाहि अधिक असह्य वाटू लागते याज्ञवल्क्याना तर ते तसे खात्रीने वाटले त्याच्यावर आता आकाशच कोसळले होते

# अरण्यांत

काही झाले तरी सिंह तो सिंहच ! अन्नावाचून मरणास टेकला तरी तो गवत खाईल असे थोडेंच आहे ? याज्ञवल्क्य झाले तरी मनुष्यातले प्रतिसिंहच होते जात्याच मोठे तेजस्वी, धाडसी नि साहसीहि होते निराशेचा बुरखा त्यानी चट्दिशी झुगारून दिला सारे मनोदौर्बल्य चटकन झाडून टाकले विषादवृद्धीला मूठमाती दिली त्यामुळें त्याचे अंतस्थ चैतन्य आता खडबडून जागृत झाले आणि मन नवोल्हासाने स्फुरू लागले या गावात राहून दिवस कठणें म्हणजे व्यर्थ आयुष्याचा अपव्यय करणे अशी त्याच्या मनाची पक्की खात्री होऊन त्यानी घरातून पाय काढण्याचा निश्चय केला नि तडक अरण्याचा रस्ता धरला पूर्वीप्रमाणे सुविद्य व सुबुद्ध झाल्याशिवाय पुन घराचे नावहि घ्यावयाचे नाही व कोणाचे तोंडहि पाहावयाचे नाही, अशी त्यानी भीष्मप्रतिज्ञा केली

ज्ञानोपासकाला–देवोपासकाला–अरण्यासारखें विद्यापीठ या भूतलावर इतरत्र कोठेंच नाही सत्य व श्रेष्ठ ज्ञान करून देणारे सर्वोत्तम विद्यापीठ जर कोठें असेल तर ते एकान्त व निर्जन अरण्यच होय सामान्य माणसाला ते भेडसावणारे असले तरी जे ज्ञानोपासक आहेत, जे सत्य शोधण्याच्या मार्गास लागले आहेत, ज्याना सृष्टि-देवतेचे हृद्गत जाणावयाचे आहे, अगर ज्याना विश्वाची बीजशक्ति शोधून काढावयाची आहे, अशा सर्व महापुरुषानी आपली तपोभूमि–ज्ञानतीर्थ–म्हणून अरण्यच

पसंत केलें आहे. विश्वामित्रानें ब्रह्मत्व प्राप्त करून घेतलें तें अरण्यांतच. शुकांनीं तपश्चर्या केली ती अरण्यांतच: भगवान गौतमबुद्धांनीं संबोधि प्राप्त करून घेतली ती अरण्यातच. ध्रुव बाळानें विष्णूला प्रसन्न करून घेतलें तें अरण्यांतच. ज्ञानेश्वर, रामदास इत्यादि साऱ्या साधुसंतांनीं दिव्य ज्ञान-प्राप्त्यर्थ एकान्तवास पत्करला तो अरण्यांतच: प्राचीन वैदिक ऋषींचे प्रसिद्ध व पवित्र आश्रम थाटले होते, ते सर्व अरण्यातील पुण्यभूमींतच. अर्थात् अरण्य म्हणजे ज्ञानोपासकांची प्रत्यक्ष कामधेनु व देवभक्तांचा मंगल कल्पवृक्ष होय. तेथें जाऊन व राहून ज्ञानोपासकांनीं, देवभक्तांनीं व साधुसंतांनी आपणांस काय हवें होतें तें सर्व पदरांत घेऊन आपला मानवजन्म धन्य व कृतकृत्य केला व जगाला ज्ञानदीप देऊन व श्रेष्ठ कल्याणमार्ग दाखवून ते इतिहासांत अजरामर होऊन राहिले.

याचें कारण असें कीं, हें अरण्यांतील पुण्य व पवित्र स्थान स्वार्थी व लोभी मनुष्याच्या प्रापंचिक खळबळी व दगदगीपासून स्वार्थ व चुरस यांच्या नित्य स्पर्धेपासून अगदीं अलिप्त असतें. येथे नितांत शांतता व गंभीर स्तब्धता अखंड नांदत असून, नयनकुशल सृष्टिदेवतेचें रमणीय सौंदर्य सर्वत्र खुलून व मोहरून राहिलेलें असतें. शिवाय मंगल देव-देवतांचा व गंधर्व किन्नरांचा शुभप्रद संचार व विहार येथें गुप्त पण अविरत चालू असतो. शिवाय विश्वात्म्यांची गूढ व सूक्ष्म शक्ति अज्ञ व अल्प अशा जिज्ञासू जीवात्म्याशीं हितगुज करण्यास व त्यास दिव्यज्ञान व अद्भुत सामर्थ्य देऊन व उच्च आणि उदात्त मार्ग दाखवून सामान्य जनतेचा त्यास ज्ञानदेव बनविण्यास सदैव तत्पर असते.

अरण्यवास म्हणजे खरोखर या मृत्युलोकांतील प्रत्यक्ष

स्वर्गवासच होय !शुद्ध व स्वच्छ हवा, पवित्र व शांत वातावरण, मधुर व निर्मल उदक, निरभ्र व स्वच्छ आकाश, पिठासारखे चांदणे, तेजस्वी तारा-मंडळ, गगनचुंबित वृक्षराजि, फलपुष्पादिकांनी नटलेल्या झाडवेली, कोमल फुलाशी मधुर क्रीडा करणारी सुंदर फुलपाखरे, झाडावर बसून मंजुळ कूजन करणारे विविध पक्षी-गण, एकीकडे गगनचुंबित उंच पर्वत तर एकीकडे पाताळाला जाऊन भिडलेल्या खोल दऱ्याशिवाय या सर्वांना निर्माण करणाऱ्या त्या दिव्य कलावंताचे–जगत्कर्त्याचे–अगाध सामर्थ्य, अनुपम कौशल्य, अपार चातुर्य, अचिंत्य ऐश्वर्य इत्यादि मनाला मोहविणारे, अंतःकरणाला खुलविणारे व बुद्धीला उजळविणारे असे ते अपूर्व सौंदर्य व आश्चर्यकारक रचनाचातुर्य पाहून, मनुष्याच्या अंतरंगात स्फुरणारी आत्मज्योत आनंदाने फुलून नागाप्रमाणे डोलते.'

आता त्या जगत्कर्त्या परमेश्वराची मंगलमूर्ति मनुष्याच्या चर्मचक्षूला प्रत्यक्ष दिसत नसली, तरी या विश्वघडणेत प्रतीत होणारे त्याचे विशाल स्वरूप, अगाध सामर्थ्य, अपार चातुर्य, अनुपम कौशल्य, अलौकिक सौंदर्य, दिव्य रचना, अगाध योजना, अपरमित बुद्धिमत्ता व अढळ व्यवस्था इत्यादि विस्मयकारक गोष्टींचा तीक्ष्ण व जिज्ञासु बुद्धीला मंगल साक्षात्कार होतो साखरेची गोडी तोंडाने सांगून जशी समजणार नाही तद्वत् त्या अनंत कोटि-ब्रह्मांडनायकाचे वास्तव स्वरूप लेखणीने लिहून अगर वाणीनें बोलून कळविता येणार नाही. ते ज्याचे त्याने आपल्या बुद्धीच्या जोरावरच अजमावून घेतले पाहिजे त्याशिवाय ते समजण्यास दुसरा मार्ग नाही

प्रपंचात रंगलेल्या या विषयमूढ व सुखलोलुप मानवाला

ते सूक्ष्म व दिव्य ज्ञान गहन व अचिंत्य असले, तरी तेच अरण्य-वासी तपोनिष्ठ, ज्ञानोपासकांना व ऋषीमुनींना योगावस्थेत सहज स्फुरत असा ज्ञानी व तपस्वी लोकांचा अनुभव आहे तात्पर्य, परमेश्वरी ज्ञानप्राप्तीचे एकमेव मंगल व पवित्र क्षेत्र म्हणजेच विविध सृष्टि-सौंदर्याने अखंड नटलेले हे ज्ञानगर्भ अरण्य होय, प्रापंचिकांना ते भयप्रद व नीरस भासले तरी ज्ञानी लोकांना तो प्रत्यक्ष चिंतामणी व सुखमय स्वर्गवास वाटतो

याज्ञवल्क्य आता दिव्य व अपूर्व ज्ञान प्राप्त्यर्थ अरण्यात येऊन एकान्त स्थळी दाखल झाले तेथे आल्यावर शांत, रम्य व सुरक्षित असे स्थान पाहून त्यांनी तेथ आपली तपोभूमी केली ते स्थान मोठे रम्य व प्रसन्न होते सभोवती विविध प्रकारच्या वेली, फुलेफळे आलेली झाडं, पशु-पक्षी, नदी-नाले, डोंगर दरी इत्यादि सृष्टि देवतेचे सुंदर, अद्भूत, गंभीर, विशाल, विविध व विचित्र रूपलावण्य अफाट पसरलेले असून, तपश्चर्येस सर्व दृष्टींनी ते स्थान अत्यंत सोइस्कर व श्रेयस्कर वाटले येथे आल्या वर त्यांच्या मनाला शांति लाभून, बुद्धीला स्थिरता आली. त्यांना एका नव्या जगातच उतरल्याचा भास झाला, या नव्या तपो-भूमीतील प्रत्येक वस्तु त्यांना नवीन ज्ञान देणारी गुरुमाउलीच वाटली, झाडांच्या पानावर, फुलांच्या पाकळ्यावर पाखरांच्या पंखा-वर विलसणारी ती कलाकुसर, तसेच पक्ष्यांच्या विविध जाति व रूपरंग, पर्वतांची उंचउंच शिखरं, खोलच खोल दऱ्या, गवतांचीसूक्ष्म अग्रें, दवाचे त्यावर चमकणारे शुभ्र मौक्तिक बिंदू, वर पसरलेले ते निरभ्र नीलवर्ण व विशाल आकाश, रात्री चमकणारे ते विशाल तारा-मंडल, चंद्र-सूर्य, ग्रहनक्षत्रे, अर्थात जावे तेथे व पाहावे

नित्य नवीन ज्ञान देणारे त्याला ते एकाएकी गुरुदेवच वाटले. सूर्याच्या किरणात, चंद्राच्या चांदण्यात, नक्षत्रांच्या लुकलुकण्यात, वायूच्या लहरीत, विजेच्या कोरीत, मेघांच्या गर्जनेत, पावसाच्या सरीत, व सृष्टिदेवतेच्या विविध वस्तुजातात गूढ चैतन्य-शक्तीचे गुप्त अस्तित्व, अपूर्व कौशल्य व अपार सामर्थ्य यांची त्यास प्रचिति येऊन, त्याच्या जिज्ञासु बुद्धीवर ज्ञानाची मधुर कोर चमकून मनाला आनंदाची उमळी येऊ लागली. ज्ञानी मनुष्याच्या जागृत चित्तवृत्तीचा तो सहजस्वभावच आहे.

याज्ञवल्क्य अरण्यात आल्यावर एक सुंदर व प्रशांत असे रम्य स्थान पाहून तेथे त्यांनी आपले प्रस्थान ठेवले. ते पसंत केलेले स्थान अरण्यात मोडत असले तरी सुखसोईच्या दृष्टीने सोईस्कर असेच होते. एका बाजूला उंच डोंगर, जवळच मंद वाहणारा नदीचा निर्मळ प्रवाह, सभोवार घनदाट वृक्षराजि, मधून मधून फुल-वेली, फळ-झाडे, होती. सारांश, हे स्थान सर्व दृष्टींनी अनुकूल व सोईचे असेच होते. येथे आल्यावर त्यांना मनस्वी समाधान झाले. त्यांचे त्रस्त मन आता शांत झाले. भांबावलेली बुद्धी स्थिर झाली व दुखावलेला आत्मा प्रसन्न झाला.

अशा रीतीने याज्ञवल्क्य घरदार सोडून अरण्यात आले, ते काही मौजेखातर आले नव्हते. त्यांना वेदोपासना करून देवाला प्रसन्न करून घ्यावयाचे व नवीन विद्या मिळवावयाची होती. त्या उद्देशानेच ते तेथे आले होते. येथे आल्यावर बाकीची सर्व सिद्धता झाली. पण कोणत्या देवाला गुरुस्थानी मानावयाचे याचा विचार करणे प्राप्त झाले. जरूर ती विद्या देऊन आपले मनोरथ पुरवील असा देव त्यांना हवा होता. इंद्राकडे धाव मारावी तर तो सामर्थ्य—

दाता, वरुणाकडे जावे तर तो न्यायमूर्ति असल्यामुळे आपल्याला हवे असलेले साध्य मिळणार नाही अश्विनी कुमाराना आळवावे तर ते फक्त वैद्यकीय शास्त्रात निपुण, वेदविद्येत त्याना गति नाही. अग्नीला भजावे तर तो फक्त गृहपति, अशी वस्तुस्थिति असल्याने कोणाला भजावे, कोणाची उपासना करावी, कोणाला शरण जावे, अशा विवचनेत ते पडून त्याची वुद्धिहि गोंधळली

अशा किंकर्तव्यमूढ स्थितीत काही काल लोटल्यावर एके दिवशी अशा अनिश्चित स्थितीतच सुदैवाने वर नभोमंडळात दैदीप्यमान तेजाने तळपत असलेले भगवान श्रीसूर्यनारायण सहज त्याच्या दृष्टीस पडले त्यामुळे त्याचा सशयतिमिर पार वितळून गेला या वेळी त्याना जो काही आनद झाला तो अनुभविल्याशिवाय कळणार नाही कारण त्याना ज्ञानदेवाचे मगल दर्शन झाले आणि त्याच्या डोळयाचे पारणे फिटले गेले भक्ति-भावाने त्याचे अत करण उचबळून येऊन त्या अखिल ब्रह्माडनायक श्री सूर्य-नारायणावर त्याची अनन्यसामान्य निष्ठा जडली अर्थात् सूर्यनारायणास त्यानी आपला गुरुदेव केले.



# सूर्याराधना

भगवान् श्रीसूर्यनारायण म्हणजे इहलोकीचे साक्षात् दैवत आहे इंद्र, वरुण, रुद्र, विष्णु हे सर्व देव आहेत खरे, पण ते कोणाला प्रत्यक्ष दिसत नाहीत सूर्यनारायण सर्व प्राणिमात्राना नित्य व प्रत्यक्ष दर्शन देणारा देव आहे या भमडळावर सूर्यनारायणाचे जसे अखड व अनत उपकार आहेत, तसेच इतराचे जरी असले तरी ते दिसून येत नाहीत सूर्यनारायण आहे म्हणून जगाचे सर्व व्यवहार सुरळीत व सुसूत्र चालले आहेत या विश्वकोशाला जी उष्णता व चैतन्य लाभले आहे, ते त्याची कृपा म्हणूनच ही प्राणिसृष्टि हसत व डुलत आहे ती केवळ त्याच्या जिवावर ! व उद्या तो नाहीसा होऊ द्या, म्हणजे पाहा केवढा अनर्थ माजेल तो जर पृथ्वीला सोडून गेला तर मग चोवीस तासातच ही सुदर पृथ्वी पार गारठून जाऊन, अखिल जीवसृष्टि जेथल्या तेथेच कुडकुडून व आखडून जाईल एकहि प्राणी जिवत असा सापडावयाचा नाही सूर्यनारायणाचा प्रभाव मोठा असून प्राणिमात्रावर त्याचे मोठे उपकार आहेत जगातील अस्सल नास्तिकातील मोठा नास्तिक म्हणून मिरविणाऱ्या हेगलसारख्या पाश्चात्य शास्त्रज्ञाला देखील आधिभौतिक दृष्टीनेच का। होईना या अखिल कोटिब्रह्माडनायकाचे देवत्व मान्य करणे अखेर भाग पडले आहे सूर्यदेवाचे हे अपूर्व वैभव व दिव्य प्रभाव पाहूनच सूज्ञ व भाविक वैदिक ऋषीनी त्याला ' त्वमेव प्रत्यक्ष विष्णुरसि, त्वमेव प्रत्यक्ष

ब्रह्मासि, त्वमेव प्रत्यक्ष रुद्रोऽसि ' अशा अर्थपूर्ण सुदर स्तोत्रानी आळविले आहे, ते अक्षरश सत्य व शास्त्रशुद्ध आहे.

भारतीयाच्या दृष्टीने सूर्यदेव म्हणजे प्रत्यक्ष ज्ञानदेव आहे सर्व ज्ञानाचा साठा त्याच्याजवळ असून, त्याजपासून मनुष्याला ज्ञानप्राप्ति होते व सत्कर्मप्रेरणा लाभते अशी वैदिक ऋषीची ठाम समजूत असून, ते नेहमी त्याच्याजवळ सत्यज्ञान देण्याविषयी त्याची प्रार्थना करीत असलेले दिसून येतात आपणामध्ये ज्ञानतेज स्फुरविण्याबद्दल विश्वामित्राने सूर्यदेवाची मोठ्या कळकळीने प्रार्थना केली असून, ज्या मत्राने ती करण्यात आली आहे तो मत्र आज गायत्रीमत्र म्हणून प्रसिद्ध आहे त्या मत्रानेच आम्ही सर्व वैदिक आर्य आज देखील सध्योपासनेच्या वेळी सूर्यनारायणाची ज्ञानदानार्थ नित्य प्रार्थना करीत असतो सर्व प्राणि-मात्राच्या हृदयात राहून त्याना कर्म करण्यास प्रेरणा करणारा म्हणून सूर्याला सविता हे नाव प्राप्त झाले आहे प्रेरणा या शब्दात 'गति' हा अर्थ गर्भित असून, 'सर्वे गत्यर्था ज्ञानार्था' या न्यायान गतिवाचक शब्द हे ज्ञानाचे अर्थबोधक असतात असे समजण्यात येते अतएव सूर्यदेवता ही वैदिकाची ज्ञानदेवता आहे असे गायत्रीमत्रावरून स्पष्ट होते याज्ञवल्क्याची देखील हीच भावना होती, म्हणून सूर्यदेवाचे दर्शन होताच ती भावना खडबडून जागृत झाली अर्थात् त्यानी त्या देवाला गुरुस्थानी मानून त्याची एकनिष्ठ उपासना करण्याच्या ते उद्योगास लागले

वैदिक लोकाची तपश्चर्येवर व देवोपासनेवर विलक्षण श्रद्धा असलेली दिसून येते आजचे युग श्रद्धेचे नसल्यामुळे लोक थोडेफार उदासीन आहेत, ही गोष्ट निराळी पण प्राचीन काळी

ज्ञानी लोक झाले तरी मोठे श्रद्धावान् होते वैदिक काळचा श्रद्धेचा अर्थ आज बरोबर ध्यानी येत नाही, म्हणून श्रद्धेची टवाळी होते पण हा समज आता फार दिवस टिकणार नाही. ' श्रत्नाम सत्य यस्या धीयते सा श्रद्धा ' ' सत्य ज्यामध्ये गर्भित आहे ती श्रद्धा ' असा आम्हा वैदिकाचा श्रद्धा शब्दाचा अर्थ आहे आणि या श्रद्धेच्या अव नव्हे डोळस श्रद्धेच्या योगानेच सत्यवस्तूचे ज्ञान होते ' श्रद्धया सत्यमाप्यते ' असे शतपथात स्पष्ट घोषित केले असून, भगवान श्रीकृष्णाने त्याचाच अनुवाद ' श्रद्धावाँल्लभते ज्ञानम् ' या सुप्रसिद्ध गीतावचनात केलेला आहे

तपश्चर्या ही वैदिकाची कामधेनु तिच्या जोरावर भारतीयानी काय हवे ते मिळविले तपश्चर्या करून दरिद्री, राजे बनले, तपश्चर्या करून मूर्खाचे ज्ञानी झाले तपश्चर्या करून क्षत्रियाचे ब्राह्मण बनले तपश्चर्या करून नराचे नारायण झाले ! अशी ही दिव्य कामधेनु वैदिक आर्यानी शोधून काढली आणि तिच्या साहाय्याने त्यानी आपले साध्य तडीस नेले ' तपसा वै लोक जयति ' 'तपाच्या योगानेच मनुष्य दिव्य लोक प्राप्त करून घेतो ' असे याज्ञवल्क्यानी पुढे शतपथात नमूद करून ठेविले आहे ते प्रत्यक्ष आपल्या अनुभवाच्या जोरावरच केले याज्ञवल्क्याचे युग हे तपश्चर्येचे युग होते त्या वेळी काही अडले अगर नडले तर बसलेच माडी घालून तपश्चर्येला ! मग तेथे तहान नाही, भूक नाही, ऊन नाही, वारा नाही, थडी नाही, पाऊस नाही, रात्र नाही, दिवस नाही, एकच ध्यान नि एकच व्रत अरण्यवास आणि जवळ जवळ उपवास, ।खायला आहे तर आहे, नाही तर नाही, पांघरायला आहे तर आहे, आणि नाही तर नाही , पण या असल्या क्षुद्र बाह्य उपाधीकडे उपासकाचे मुळी लक्षच नसते ।या

सर्व गोष्टी तो मोठ्या आनंदानें सहन करावयास तयार असतो. एवढेंच नव्हे तर त्यातच तो आनंदहि मानतो. श्रम केल्याशिवाय, कष्ट सोसल्याशिवाय कोणालाच देव पावत नाही. 'नाश्रांतस्य सख्याय देवाः' - श्रमल्याशिवाय देवांचें सख्य लाभत नाही असें श्रुतिमाउलीनें स्पष्ट बोलून दाखविलें आहे. पाहा, श्रम करुनच, प्रजापतीने ही सृष्टि निर्माण केली. तप करुनच देवानी स्वर्ग मिळविला आणि तपाच्या दिव्यांतून बाहेर पडूनच विश्वामित्र हा क्षत्रियाचा ब्राह्मण झाला आणि तप करुन, श्रम करून, कोण काय झाले नाहीत? 'श्रमेण ह वै तद्देवा जयन्ति यदेषां जय्यमास' - तप व श्रम करूनच देवांनी आपणास जें काय मिळवावयाचें होतें तें मिळवून घेतले. अर्थात् ही तपश्चर्या म्हणजे वैदिकाची कामधेनु व प्रत्यक्ष कल्पवृक्ष आहे.



# राजा जनमेजय

राजा जनमेजय म्हणजे भारतीय इतिहासातील एक अत्यंत थोर व अविस्मरणीय असा प्रख्यात सम्राट् होय त्याच्या कर्तृत्वामुळेच जगाला भारताचा पराक्रम विश्रुत झाला, नि भारतीय इतिहासाला नवीन वळण लागले हा धनुर्धारी अर्जुनाचा पणतू असून पुण्यश्लोक परिक्षित राजाचा ज्येष्ठ पुत्र होय तो मोठा सद्गुणी, शूर, पराक्रमी व सद्वर्तनी असून शत्रूचा कर्दनकाळ होता क्षात्रतेजात त्याला मागे हटवणारा असा क्षत्रिय भरतखंडात त्या काळी दुसरा कोणी झाला नव्हता हा सम्राट् राजधर्मात जसा निष्णात होता तसाच विद्येचाहि तो मोठा चाहता आश्रयदाता व पुरस्कर्ता होता

परिक्षित राजाचा सर्पदंश होऊन शोचनीय दुःखद अन्त झाल्यावर त्याच्या पश्चात् पांडवांच्या पुण्यश्लोक गादीवर विराजमान होऊन, जनमेजयाने हस्तिनापूरचा राजदंड हातात धारण केला त्या वेळी बाप सर्पदंश होऊन मरण पावला] इतकेच त्यास माहीत होते त्याच्या मागचा इतिहास त्यास ठाऊक नव्हता पुढे काही दिवसांनी त्याच्या मन्त्र्याकडून तो त्यास कळला परिक्षित राजा एकदा मृगया करावयास म्हणून अरण्यात गेला असता एका हरणाला बाण मारून त्यास त्याने घायाळ केले. पण ते हरिण तेथून तसेच निसटून गेले राजा त्याच्या शोधार्थ निघाला असता वाटेत त्यास शमीक मुनी दिसले ते त्या वेळी ध्यानस्थ असल्यामुळे त्यांना बाहेरच्या जगाचे काहीच भान नव्हते राजा त्यांच्या जवळ जाऊन हरिण कोठे गेले असे विचारता त्या मुनींनें

त्यास काहीच उत्तर दिले नाही पुन त्यानं त्यास तोच प्रश्न विचारला तरी ते मुग्धच ! डोळे वर करून शमीकांनी त्या राजाकडे पाहिले नाही, की तोंड उघडून त्यास सरळ उत्तर दिले नाही त्या मुनीची ही बेमुर्वतखोर वृत्ति पाहून राजा जरा चिडला, व जवळच एक साप मरून पडला होता, तो हळूच धनुष्याच्या टोकाने उचलून, त्या शमीकाच्या गळ्यात अडकवून स्वारी तेथून निघून पुढे चालती झाली ( भारत आदि ४० )

ही हकीकत नंतर शमीकाच्या मुलास म्हणजे श्रृंगीस कळली हे श्रृंगी म्हणजे मोठे कडक तपस्वी होते तसेच तेजस्वी व सत्त्वसंपन्न होते शमीक जितके शांत तितके हे तापट होते त्यांचे तप सामर्थ्य इतके प्रचंड नि इतके प्रभावी होते की, ते बोलतील तसे हटकून घडून यई अर्थात् त्यांची वाणी म्हणजे ती देववाणीच होती ती कधी खोटी पडायचीच नाही आपल्या पूज्य पित्याची, ते ध्यानस्थ असता, कुचेष्टा व अपमान करणाऱ्या त्या उन्मत्त राजाचा त्यांना फार संताप आला व त्या भरात त्यांनी परिक्षितास तू सात दिवसात सर्पदंश होऊन मरशील असा शाप दिला त्याप्रमाणे सातव्या दिवशी सध्याकाळी तो सर्पदंश होऊनच मरण पावला सर्प म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून प्रत्यक्ष नागराज तक्षकच होता ( महाभारत आदिपर्व ४१ )

आता या नागराज तक्षकाने परिक्षितास दंश का केला हा इतिहासहि तितकाच मोठा मनोवेधक व मननीय असाच आहे हा पांडवकाळातला इतिहास असून त्याचीच ही उत्तरकथा आहे

एका मोठ्या सत्रात अग्नि तूप पिऊन पिऊन पांढरा फटफटीत झाला त्याला उपाय म्हणजे पशूचा अलोट मेध भक्षण करावयाचा पण हे घडावयाचे कसे ? तितका मेध मिळणार कोठून

नि देणार तरी कोण ? अग्नीला मोठी चिंता पडली पण सुदैवाने त्यास धनुर्धर पार्थाची आठवण झाली मग उशीर कसला ? चटकन् तो त्याजपाशी गेला व झालेली हकीकत सागून आपणास खाडववन भक्षणार्थ मिळेल तर आपला रोग जाईल, सबब ते आपणास मिळवून देण्याविषयी त्यान त्याची प्रार्थना केली कारण त्या वनात हरत हेचे पुष्कळसे प्राणी वास करून होते शिवाय नागलोकहि तेथ वास करून असत त्याचा तक्षक हा राजा होता

अर्जुनाने अग्नीची ती मनीषा मान्य करून मागचा पुढचा विचार न करता त खाडववन त्यास देण्याचे अभिवचन दिल अर्थात् अर्जुनाचे वचन म्हणजे त देववचनच ! प्रत्यक्ष काळ आला तरी ते फिरणारे नव्हे ! अर्थात् त अन्यथा करण्याची काणाची प्राज्ञा नव्हती तशात नागलोकाची तर मुळी नव्हतीच नव्हती आता तेथ राहणे म्हणजे आपला आपणच घात व नाश करून घेणे, अशा थरास गोष्ट येऊन पोचल्यामुळे आपला बचाव करण्यासाठी म्हणून ते नाग तेथून आपले बिऱ्हाड उचलून बाहेर पडले व मजलदरमजल करीत उत्तरेकडे तक्षशिला येथ जाऊन त्यानी आपले बिऱ्हाड ठोकले अग्नीने त खाडववन समस्त भक्षण करून त्याची राखरागोळी करून टाकली ! त्यात असख्य प्राणी प्राणास मुकले आणि असख्य झाडाझुडपाची पार राखरागोळी झाली ! हा अनर्थ पाहून त्या नागाना फार दुःख झाल व सतापहि आला पण करणार काय ? अर्जुनापुढ त्याचे काय चालणार ? वेळ अनुकूल नसल्यामुळ त्या वेळी स्वस्थ वसणे यापलीकडे त्याना काहीच करता येणे शक्य नव्हत ,पण सुप्त ज्वालामुखीप्रमाणे ते वरून शात दिसत होते तरी आतून सारखे धुम-

सत राहिले. केव्हां फावेल नि केव्हां सूड घेऊं याची ते डोळ्यांत तेल घालून वाट पाहात होते.

पुढें पांडव निजधामास गेल्यावर हस्तिनापूरच्या गादीवर अर्जुनाचा नातू परिक्षित हा आला. पुढें मृगयेकरितां तो अरण्यांत गेला असतां वर सांगितल्याप्रमाणें त्याच्या हातून प्रमाद घडून त्याचा परिणाम पुढें त्या शृंगीच्या शापांत झाला. तक्षकाचें नशीब उघडलें. आणि आजाचा सूड त्यानें नातुवर उगवून घेतला. असा हा पूर्वीचा थोडक्यात इतिहास असून तो ऐकून जनमेजयास अत्यंत दुःख झालें. त्याला आपल्या पित्याचा कपटानें प्राण घेणाऱ्या तक्षकाचा मनस्वी राग आला. त्या रागाच्या भरांत तक्षकाचाच नव्हे तर सर्व नाग जातीचा निःपात करण्याची घोर प्रतिज्ञा करून त्याप्रमाणे त्यानें नागांच्या तक्षशिलेवर स्वारी केली आणि त्यांचा पराभव करून असंख्य नागास पकडून आणलें व तेथें सर्पसत्र प्रारंभून त्यांचा त्या सत्रांत बळी देण्याचा सपाटा चालविला.

हा सर्व इतिहास येथें सांगण्याचें कारण इतकेंच की, प्रस्तुत चरित्रग्रंथांत आम्हास हा पांडवांचा पणतू परिक्षित, जनमेजय व आमचे चरित्रनायक वाजसनेय याज्ञवल्क्य यांचा परस्पर संबंध व समकालीनत्व सिद्ध करून दाखवावयाचें आहे. म्हणून ही सर्पसत्राची कथा आम्हास मोठी पुष्टि देणारी आहे.*

---

* हा संबंध ग्रंथाच्या प्रथम आवृत्तीतच स्पष्ट दाखविला होता. पण तो संदर्भ तितकासा साधार असल्याचे श्री ज. स. करंदीकर, पुणे, प्रा. वि. व. आठवले, अहमदाबाद, पं. वारेशास्त्री नाशिक, वगैरे काही विद्वानांना वाटत नाहीं. म्हणून या ग्रंथाच्या प्रथमावृत्तीच्या वेळी हा टीकेचा विषय झाला होता.

योगीश्वर याज्ञवल्क्यचरित्राचे महावस्त्र विणण्यापूर्वी प्रथम त्याचे शतपथात, महाभारतात, वायु-विष्णु-भागवतस्कंध, मत्स्य इत्यादि अधिकृत ग्रंथात इतस्तत विखुरलेले सुटे धागेदोरे काळजीपूर्वक एकत्र करण्याचा प्रयत्न करणे अत्यंत जरूर आहे त्याशिवाय वाजसनेय याज्ञवल्क्याची यथार्थ ओळख पटायचीच नाही नुसता एखाद दुसरा ग्रंथ चाळून त्याच्या आधारे याज्ञवल्क्य चरित्र रंगविणे म्हणजे तो प्रयत्न हास्यास्पद झाल्याशिवाय राहणार नाही पुराणांत इतिहासाची संगति लागते, हे खरे असले तरी ते मोठ्या परिश्रमाचे, दीर्घ अभ्यासाचे, व सूक्ष्म चिकित्सक बुद्धीचे काम आहे योगीश्वर याज्ञवल्क्याच्या चरित्रावर झगझगीत प्रकाश पाडणारा असा महत्त्वाचा प्रसंग महाभारतात आढळून असून त्याचा संबंध जनमेजयाच्या सर्पसत्राशी अगदी निकटचा येतो आणि म्हणून आम्ही जो कथाभाग वर दिला आहे त्याचे कारणहि हेच आहे

जनमेजयाच्या सर्पसत्रात कोण कोण सदस्य होते याची एकदा निश्चिति झाली म्हणजे मग त्याचा व वाजसनेय याज्ञवल्क्याचा कोठे व कसा संबंध आला हे दाखवून अर्जुनाचे पणतू परिक्षित जनमेजय व आमचे चरित्रनायक वाजसनेय याज्ञवल्क्य यांचे समकालीनत्व निःसंशय व निर्विवाद सिद्ध होण्यास पुष्कळच मदत होते म्हणून आता सर्पसत्रातील सदस्यांची ओळख म्हणून महाभारतातील मूळ वचनच येथे उद्धृत करून देण्यात येत आहे

'सदस्यश्चाभवद्व्यास पुत्रशिष्यसहायवान् ।
उद्दालक शमठक श्वेतकेतुश्च पंचम ॥७॥
असितो देवलश्चैव नारद पर्वतस्तथा ।
आत्रेय कुण्डजठरो द्विज कुटिघटस्तथा ॥८॥

वात्स्य श्रुतश्रवा वृद्धस्तप स्वाध्यायशीलवान् ।
कहोडो देवशर्मा च मोद्‌गल्य शमसौमर ॥९॥
एते चान्येच बहवो ब्राह्मणा सशितव्रता ।
सदस्या अभवस्तत्र सत्रे पारिक्षितस्य ह ॥१०॥
( आदि. ४८, ७-१० )

वरील वचनात ज्या सदस्याचा उल्लेख करण्यात आलेला आहे, त्यापैकी व्यास, उद्दालक, श्वेतकेतु, देवल, नारद, कहोड, तसेच पारिक्षित म्हणजे परिक्षिताचा मुलगा जनमेजय व व्यास-शिष्य म्हणजे वैशपायन ही नावे महत्त्वाची असून त्याचा व याज्ञवल्क्याचा सबध कोठे व कसा आला आहे हे आम्ही प्रसगा-प्रसगाने पुढें दाखवीत जाऊ यावरता आणखी शतपथाची चागली ओळखहि असावयास पाहिजे, ते निराळेच त्याशिवाय याज्ञवल्क्याची ओळख नीटशी पटावयाची नाही कारण तेथेहि त्याचा सबध असलेल्या अनेक व्यक्तींचा उल्लेख सापडतो म्हणून तोहि आम्ही योग्य ठिकाणी देत जाऊ.

जनमेजयाच्या सर्पसत्रातील वरील जाड टाइपात दाखवि-लेले सदस्य आमच्या सविधानास अत्यत महत्त्वाचे असून वाचकानी त्याची आठवण जरूर ठेवावी अशी त्याना अगत्याची व कळ-कळीची विनति आहे.

# ग्रहण सुटलें

श्रावण शुद्ध पौर्णिमेच्या मगल दिवशी पहाटस नित्याप्रमाणे स्नान करून सूर्यास अर्घ्य देऊन, सूर्योपस्थान केल्यावर याज्ञवल्क्य जपास ध्यानस्थ होऊन बसले सूर्य मध्यान्हीवर आला, उन्हाचा ताप चागला जाणवू लागला, वाऱ्याची गति मद झाली, पक्षी व पाखरे झाडवेलीचा आश्रय धरून बसली, जिकड तिकड अगदी सामसूम झालेली होती इतक्यात याज्ञवल्क्यानी ध्यानयोग आवरून आपले नत्र सूर्यनारायणाकडे लावले त्यानी उभे राहून दोन्ही हात जोडून पुढीलप्रमाणे सूयनारायणाची प्रार्थना केली ते म्हणाले, ' देवा, भक्तवत्सला, दयाघना अजून तू माझा अत पाहणार ? दीनोद्धारा, नको नको माझा अत पाहूस आता शरणागतवत्सला, या दीनावर दया कर दीनोद्धारा, तुला माझा नमस्कार असो ! सद्गुरो, मी आता थकलो भागला आह माझ्याने आता देवा, धीर धरवत नाही दयाघना, ज्ञानमूर्ते, मला अपूर्व असे ज्ञानतेज दे हा दीन शिष्य, तुझा नम्र भक्त तुझ्याजवळ विद्याधनाची याचना करीत आहे तर देवा, माझ्या गुरूजवळ नाही असा अपूर्व यजुर्वेद मला दे माझ्यात तुझ्या कृपेन ती दिव्य शक्ति स्फुरण पाव् दे तू शरणागतव सल म्हणवितोस मग माझा अत अजून त किती पाहणार ? ब्रह्माड नायका, नको नको माझा अत पाहूस आता भगवन् ! मजवर कृपा कर तुझ्याशिवाय मला आता दुसरा आश्रय नाही, दुसरा त्राता नाही, नि दुसरा गुरु नाही तूच माझा गुरु, पिता,

वधु आणि त्राता देवा, माझ्या बुद्धीत पुन दिव्य ज्ञानोदय होईल, मेधाशक्ति स्फुरण पावेल, प्रतिभा तेज चमकेल असे कर देवा, मला पदरात घे आणि माझा उद्धार कर" असे म्हणून त्यानी सूर्यास साष्टाग नमस्कार घातला

भक्तोद्धारक प्रभु श्री सूर्यनारायण प्रत्यक्ष ज्ञानदेव त्याला आता या दीन याज्ञवल्क्याची दया आली त्याची दीर्घ तपश्चर्या व अनन्य भक्ति पाहून सूर्यनारायण परम आनदित झाला आणि त्याला भक्तवात्सल्याचा पान्हाहि फुटला ! याज्ञवल्क्य हे पवित्र गगेच्या निर्मळ उदकाप्रमाणे केवळ निष्पाप व निर्दोषी असून कृपाकटाक्षास पूर्ण पात्र आहेत असा विचार करून भक्ताच्या इच्छेप्रमाणे याज्ञवल्क्याच्या गुरुजवळ नव्हता असा शुद्ध (शुक्ल) यजुर्वेद भगवतानी वाजीचे रूप धारण करून त्याच्या बुद्धीत बिबविला। त्या वेळी सूर्याचे रूप याज्ञवल्क्याला अश्वाप्रमाणे भासले म्हणून पुराणात सूर्याने वाजीरूप धारण करून त्याना शुक्ल यजुर्वेद पढविला असे अलकारिक भाषेत म्हटले आहे

आता येथे थोडी शास्त्रीय चर्चा करणे जरूर आहे पुराणात पुष्कळ भाकड कथा सागण्यात आल्या आहेत असा आधुनिक सुशिक्षिताचा एक मोठा आरोप आहे पण तो सर्वस्वी निराधार असून, सुशिक्षिताचे वेदाविषयीचे गाढ अज्ञान आहे, हेच त्यास प्रमुख कारण आहे ! काही सुशिक्षित असा आक्षेप घेतात की, पुराणकर्त्या व्यासानी हे काही तरीच खूळ माजविले आहे सूर्याने घोडा होऊन याज्ञवल्क्याला वेद पढविला या विधानावर काहीचा विश्वास बसत नाही हे विज्ञानयुग आहे जगलात राहणाऱ्याचे युग नव्हे त्यामुळे घोडा कसा मनुष्यवाणी बोलेल अशी बुद्धिवादी लोकाची शका आहे आधुनिक विज्ञान

शास्त्र व प्राचीन वेदवचन याच्या आधारे थोडक्यात खालील-प्रमाणे त्याचे उत्तर आहे.

प्रथम आधुनिक विज्ञान दृष्टीनें याचा थोडासा ऊहापोह करून त्या रोखाने वेदवचनाच्या आधारे वरील गोष्ट तत्त्वत कशी शक्य आहे, हे दाखविण्याचा प्रयत्न केला पाहिजे पृथ्वीला उष्णता व प्रकाश सूर्यापासून लाभला आहे याविषयी कोणाचे दुमत होईल असे आम्हास तरी वाटत नाही आणि हा प्रकाश नि ही उष्णता आम्हास सूर्यापासून किरणद्वारा लाभते, ही गोष्टहि विज्ञानशास्त्रास सम्मत आहे सूर्यप्रकाशाविषयी आम्हास अधिक मीमांसा करावयाची आहे

सूर्यापासून सूक्ष्म, अत्यंत सूक्ष्म, अशा तेजाच्या ज्या केश-सदृश रेषा निघतात त्याला किरण अशी संज्ञा आहे. हे किरण दिसावयास साध्या डोळयाला शुभ्र दिसतात, पण त्यांचे पृथक्करण केल्यास त्यात तांबडा, हिरवा, पिवळा, नारिंगी, जांभळा, पारवा व निळा असे निरनिराळे सात रंग असलेले दिसून येतात सारांश, सूर्यापासून निघणारे किरण सात रंगाचे असून, त्याच्या मिश्रणाने शुभ्र प्रकाश झालेला आहे हे सर्व किरण जसे कांति-मान आहेत तसेच ते गतिमानहि आहेत त्याचा दर सेकंदाला वेग १८६००० मैल असतो असे आज शास्त्रज्ञांनी ठरविले आहे तसेच ते मोठे प्रभावी व भेदक आहेत या प्रत्येक रंगाच्या किर-णाचे रसायन व वैद्यकीय शास्त्रदृष्टचा एकेक वैशिष्टय फार मोठे आहे. त्यात जे गडद नीलवर्णाचे (Ultrav.olet) किरण आहेत त्याचा येथें अधिक विचार करणें आहे हे नीलवर्ण किरण शरीरभेदक असून, ते कातडीच्या सूक्ष्म रंध्रातून रक्तवाहिन्यांत शिरून तेथून ते चिच्छक्तिरूपाने सर्व शरीरभर पसरून राहतात.

अर्थात् या सूर्यप्रकाशाचा एवढा मोठा प्रभाव आहे की त्यापासून जगाचे प्रत्यक्ष ज्ञान होते बुद्धिचैतन्य स्फुरते, अनेक व्याधींचे निरसन होते क्षयरोगासारखे दु साध्य रोगहि बरे होतात असो या सूर्यप्रकाशाचा मानवशरीरावर व जीवनावर शरीरशास्त्र-दृष्ट्या, जीवनशास्त्रदृष्ट्या, आरोग्यशास्त्रदृष्ट्या व वैद्यकशास्त्र-दृष्ट्या इतका महत्त्वाचा परिणाम झाला आहे! जगाला हे जें चैतन्य व प्रेरणाशक्ति लाभली आहे ती सूर्यदेवाची कृपाच होय ही मीमासा विज्ञानशास्त्रदृष्टीने आम्ही करीत आहोत अजून हे शास्त्र अपूर्ण व आंधळ आहे! त्याला अद्याप अध्यात्मदृष्टि लाभलेली नाही! सूर्य हा किरणद्वारा मनुष्याच्या शरीरात शिरून त्याला चैतन्य व स्फूर्ति देऊ शकतो असा आमचा मान्य ठाम सिद्धान्त आहे!

अध्यात्मदृष्टि असलेले आमचे वैदिक ऋषी काय सांगतात याची मीमासा करणेहि जरूर आहे वैदिक ऋषींना विज्ञानदृष्टिहि होती वैदिक ऋषींचे हे वैशिष्ट्य आहे 'सूर्य आत्मा जगत-स्तस्थुषश्च' सूर्य हा स्थावर-जंगम सृष्टीचा प्रत्यक्ष आत्माच आहे ( ऋ १-११५-१) येथ सूर्य याचा अर्थ विश्वाचा प्रेरक (सर्वस्य प्रेरक ) असा अर्थ सायणाचार्य करतात भूतमात्राच्या अंतर्यामी राहून त्याना प्रेरणा करणारा असा जो परमेश्वर तो सूर्य, असा वैदिकाचा सूर्य शब्दाचा अर्थ आहे

आता ही पुढील ऋचा विचारात घेऊ 'सदा त्वा हरित रथे वहन्ति देव सूर्य। शोचिष्केश विचक्षण। (ऋ १-५०-८ ) येथे 'हरित' हा शब्द मननीय आहे 'हरित' याचा अर्थ साय-णाचार्य 'अश्वा रश्मयो वा'– अश्व किंवा रश्मि कर्ण किरण असा करतात त्याचप्रमाणे 'शोचिष्केश' याचा अर्थ ज्याच्यामध्ये

किरण केसाप्रमाणे दिसतात तो ' (तेजांसि एव यस्मिन् केशा इव दृश्यन्ते स ), असा अर्थ करण्यात येतो वरील मत्राचा भावार्थ असा आहे–हे सूर्यदेवा, हे किरणकेशा, विश्वप्रकाशका, रथात बसलेल्या तुला सात किरणरूपी अश्व ओढून नेतात येथ सप्त हा सख्यावाचक शब्द अर्थपूर्ण आहे, सात किरण म्हणजे वर जे विज्ञानशास्त्रात सागितलेले सात निरनिराळ्या रगाचे किरण तेच हे होत वरील ऋचेत ' हरित ' या शब्दाचा घोडा ऊर्फ रश्मी असा अर्थ करण्यात आला आहे या ऋचेचे महत्त्व येथे असे आहे की, सूर्याचे किरण हे सात रगी आहेत आणि किरण म्हणजे सूर्याचे तेजस्वी केस होत अर्थात सूर्यापासून किरण निघतात आणि ते सप्तरगी असतात ही गोष्ट प्राचीन ऋषी ओळखून होते असे यावरून सिद्ध होते

पुन आणखी, ही दुसरी एक महत्त्वाची ऋचा पाहा– ' भद्रा अश्वा हरित सूर्यस्य चित्रा एतग्वा अनुमाद्यास । ' ( ऋ १-११५-३ ) या ऋचेत प्रत्यक्ष अश्व शब्द आला असून त्याचा अर्थ ' वाहणे ' असा आहे तसेच, ' हरित ' व ' चित्रा ' हे शब्दहि मननीय आहेत येथ ' अश्वा ' याचा अर्थ घोडे असा नसून जलद धावणारा ( व्यापनशील ) असा आहे ' हरित ' याचा अर्थ ' अश्वा रश्मयो वा ' असा असून ' चित्रा ' याचा अर्थ निरनिराळ्या रगाचा असा आहे आणि ' एतग्वा ' याचा अर्थ शबलवर्ण असलेले सूर्याचे घोडे असा होतो ' हरित ' याचा अर्थ हिरवा अगर पिवळा किंवा पिवळट हिरवा घोडा ( ' हरिद्वर्णानश्वान् ' ऋ १-११५-३, सायणभाष्य ) असा अर्थ ऋ १-११५-३ या ऋचेच्या भाष्यात करण्यात आलेला आहे

याला पुष्टिकरणार्थ आणखी एक ऋचा खालीलप्रमाणे आहे ' उदुत्य जातवेदस देव वहन्ति केतव । दृशे विश्वाय

सूर्यम्।' ( ऋ १-५०-१ ) येथे 'केतव' हा शब्द विचारार्ह आहे 'केतव' याचा अर्थ 'प्रज्ञापका सूर्याश्वा यद्वा सूर्य रश्मय' असा करण्यात आलेला आहे आता वरील मंत्रात 'अश्व' 'केतव' 'हरित' 'रश्मय' या सर्वाचा सामान्य अर्थ किरण असा असून अलंकारिक भाषेत त्याच किरणाला कोठे अश्व, कोठे हरित्, कोठे रश्मि तर कोठे केतु असे म्हटले आहे तेव्हा सूर्याचा घोडा म्हणजे चार पायाचा पृथ्वीवरचा जलद धावणारा प्राणी नसून, तो प्रत्यक्ष सूर्यदेवाचा अंशभूत असा तेजस्वी किरणच होय पृथ्वीवरचे घोडे प्रचंड तेजस्वी सूर्याच्या रथाला जोडणे आणि ते अंतराळातून सूर्याला पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत बारा तासात वाहून नेणे, हे केवळ प्रतीकात्मक वर्णन आहे असो इतक्याने आमच्या वाचकांची समजूत पटेल असे आम्हास वाटते

इतकी भूमिका तयार झाल्यावर आता पुढील प्रक्रिया काय, इकडे वळू हे जे सूर्याचे किरण आहेत, ते मनुष्याच्या शरिरात शिरू शकतात ऋग्वेदात ही गोष्ट स्पष्ट सांगण्यात आली आहे 'अन्तश्चरति रोचना अस्य' ( ऋ १-१८३-२ ) या सूर्य देवाचे तेज हृदयाकाशापर्यंत जाऊन पोचू शकते' 'तत्सवितुर्वरेण्यं भर्गोदेवस्य धीमहि। धियो यो नः प्रचोदयात्' त्या सवितादेवाच्या सर्वश्रेष्ठ ज्ञानमय तेजाचे आम्ही ध्यान करतो तो आमच्या बुद्धीला प्रेरणा देवो' या गायत्री मंत्रावरून बुद्धीला प्रेरणा देणारा देव म्हणजे सूर्यदेवच'। प्रेरणाशक्ति ही सूर्यापासूनच स्फुरण पावते याचे कारण असे की, तो आपल्या अंशभूत किरणरूपाने मनुष्याच्या बुद्धीत शिरून तिला योग्य

स्फुरण देऊ शकतो, हे विज्ञानशास्त्राला देखील सिद्ध करता येईल. तेव्हा याज्ञवल्क्याना त्याने अश्वद्वारा म्हणजे किरणद्वारा पशुद्वारा नव्हे नवीन वेदाची रुपरेखा स्फुरविली असे म्हटले, अथवा अलकारिक भाषेत व्यासानी तसे सागितले, असे म्हटल्यास ते अप्रस्तुत होणार नाही, वैदिक देव हे उपासकाला काय सागावयाचे ते त्याच्या बुद्धीत स्फुरवीत असतात ' न देवा दडमादाय रक्षन्ति पशुपालवत् । य रक्षितुमिच्छन्ति बुद्धया सयोजयन्ति तम् ॥ ' हा वैदिक देवाचा भक्ताशी बोलण्याचा नेहमीचा पायडा आहे या सर्व विवेचनावरुन याज्ञवल्क्याला सूर्यदेवाने नवीन वेद दिला, याचा अर्थ शास्त्रीय दृष्टीने कसा लावावयाचा व तो कसा सुदर नि सयुक्तिक लावता येतो, हे दिसून येईल.



# सुकवीन्द्रो भव !

भगवान श्रीसूर्यनारायणानी याज्ञवल्क्याना त्याच्या इच्छे-प्रमाणे त्याचे माजी गुरु जे वैशंपायन यांच्याजवळ नसलेला असा अभिनव शुक्ल यजुर्वेदाचा आराखडा त्याच्या बुद्धीत बिंबविला व तो तेथे स्थिर होऊन राहण्यासाठी म्हणून वैदिक आर्यांची विद्याधिष्ठात्री देवता जी सरस्वती, तिचे मंगल स्तुतिस्तोत्र गाऊन तिला प्रसन्न करून तिचा वरप्रसाद संपादन करण्यास सांगून, भगवान तेथून अंतर्धान पावले. पुढे त्या देवाच्या सूचने-प्रमाणे आपणास मिळालेला नवीन शुक्ल यजुर्वेद बुद्धीत रुजून स्थिर व्हावा, एतदर्थ सकल विद्येची प्रधान देवता जी सरस्वती, तिला प्रसन्न करून घेण्याच्या उद्योगास ते उदयोन्मुख योगीराज उत्साहभरित अंतःकरणाने लागले.

या विश्वाच्या विविध कार्यक्षेत्रासंबंधाने जी परमेश्वरी योजना आखण्यात आली आहे, त्यात विश्वातील ज्ञाननिधीचे श्रेष्ठ विश्वस्त म्हणून सूर्य व सरस्वती यांची नेमणूक झाली आहे, असे वैदिक धर्माचे सांगणे आहे. त्यापैकी सूर्यदेवाला उपासना-द्वारा प्रसन्न करून घेण्याचा जो एक लहानसा पण अत्यंत अर्थपूर्ण व महाप्रभावी असा दिव्य मंत्र वैदिक आर्यांत प्रसिद्ध व प्रचलित आहे त्यास गायत्री मंत्र असे नामाभिधान असून, त्याची मांडणी आहे, ती अशी –' ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गोदेवस्य धीमहि । धियो यो नः प्रचोदयात् । ' हा महामंत्र महातपस्वी विश्वामित्राच्या योगस्थ मनात सूर्याच्या प्रेरणेने स्फुरला असून त्याचा भावार्थ

पुढीलप्रमाणे आहे 'त्या त्रैलोक्यप्रसिद्ध सूर्यमंडलस्थ विश्वव्यापी परमेश्वराच्या परममंगल अशा ज्ञानतेजाचे आम्ही योगस्थ मनाने ध्यान करतो तो महादेव आमच्या बुद्धीला सत्कर्मद्वारा दिव्य ज्ञान मिळविण्यास प्रेरणा करो' आणि या महामंत्राचा शास्त्रशुद्ध जप करून अनेक महाभागांनी आपल्या दुर्लभ मानव जन्माचे उदंड कल्याण करून घेतले आहे. गय म्हणजे प्राण त्या प्राणाचे रक्षण करणारा जो मंत्र त्यास गायत्री मंत्र असे म्हणतात. ('प्राणा वै गयास्तत्प्राणास्तत्रे तस्माद्गायत्री नाम' श. प. १४-८-१५-७) तो वैदिक ज्ञानोपासनेचा महामंत्र असून, प्रत्येक वैदिक आर्य त्याचा सध्योपासनेच्या वेळी नित्य जप करीत असतो.'

त्याचप्रमाणे सरस्वतीचाहि एक मंत्र ऋग्वेदात प्रसिद्ध असून, तोहि अर्थपूर्ण व मोठा मननीय आहे 'पावका नः सरस्वती वाजेभिर्वाजिनीवती । यज्ञं वष्टु धियावसुः ॥ १-३-१० चोदयित्री सूनृतानां चेतन्ती सुमतीनाम् । यज्ञं दधे सरस्वती॥ १-३-११ ॥ महो अर्णः सरस्वती प्रचेतयति केतुना । धियो विश्वा विराजति॥ १-३-१२॥ भावार्थ – उपासकांना पावन करणारी, ज्ञानसामर्थ्याने सुसंपन्न असलेली, बुद्धिवैभवाने नटलेली अशी ही सरस्वतीदेवी आमचा हा ज्ञानयज्ञ दिव्य विबुधाप्रत नेऊन पोचवो सत्य भाषणाला प्रेरणा करणारी व सद्बुद्धीला चेतना देणारी अशी ही शुभमंगल सरस्वती असून ती आमच्या या ज्ञानात्मक यज्ञोपासनेचा स्वीकार करती झाली.

ऋग्वेदात सरस्वती देवीचे नदी व देवता रूपाने हे असे थोडक्यात पण यथार्थ वर्णन असून ती सकल हिंदुमात्राची ज्ञान-देवता आहे आणि म्हणून सूर्यनारायणाने अंतर्धान पावताना या

सरस्वतीचे स्तवन करून घेण्याचा उपदेश केला, तो झाला तरी तितकाच योग्य आहे

भगवान श्री सूर्यनारायणाच्या उपदेशाप्रमाणे याज्ञवल्क्य आता सरस्वतीला प्रसन्न करून घेण्याच्या कार्याकडे वळले. देवाना प्रसन्न करुन घेण्याचा वैदिक आर्यांचा अमोघ मार्ग म्हणजे त्या त्या देवतेची एकनिष्ठ उपासना हा व्यक्तिगत मार्ग आहे.[इतरांचे सहाय्य न घेता स्वतःच्या आत्मविश्वासावर व कडक तपानुष्ठानावर प्रत्येक व्यक्तीला आपल्या इष्ट देवतेला प्रसन्न करुन घेऊन तद्वारा आपले मनोरथ सत्यसृष्टीत प्रतिबिंबित करून घेता येतात, असा भारतीयाचा दृढ विश्वास व स्वानुभव आहे] मात्र तशी प्रखर श्रद्धा व अढळ निश्चय पाहिजे. याज्ञवल्क्य काय, विश्वामित्र काय, गौतमबुद्ध काय, महावीर काय, झोरोष्ट्रर काय, किंवा येशू ख्रिस्त काय या सर्वांनी श्रद्धा व तपश्चर्या याची कास धरूनच आपली इष्टसिद्धि प्राप्त करून घेतली हे सर्व महात्मे मानवसृष्टीत अजरामर होऊन राहिले आहेत, इतकेच नव्हे तर सकल मानवमात्राचे मार्गदर्शक असे शाश्वत दीपस्तंभ होऊन राहिले आहेत

याज्ञवल्क्य आता सरस्वतीच्या ध्यानपूजनेत अखंड तल्लीन होऊन गेले एके दिवशी सहज स्फूर्ति होऊन, त्यानी सरस्वतीची एकाग्र चित्ताने अनन्यभावे खालील प्रार्थना केली. ती अशी —

कृपा कुरु जगन्मातर्मामेवं हततेजसम्
गुरुशापात् स्मृतिभ्रष्टं विद्याहीनच दु:खितम् ६
ज्ञानं देहि स्मृति देहि विद्या विद्याधिदेवते
प्रतिष्ठा कविता देहि शक्ति शिष्य प्रबोधिकाम् ७
ग्रन्थनिर्मितिशक्ति च सच्छिष्य सुप्रतिष्ठितम्
प्रतिभा सत्सभाया च विचारक्षमतां शुभाम् ८

लुप्तां सर्वां दैववशान्नवां कुरु पुनः पुनः
यथांकुरं जनयति भगवान्योगमायया ९
ब्रह्मस्वरूपा परमा ज्योतिरूपा सनातनी
सर्वविद्याधिदेवी या तस्यै वाच्यै नमोनमः १०
यया विना जगत्सर्वं शश्वज्जीवन्मृतं सदा
ज्ञानाधिदेवी या तस्यै सरस्वत्यै नमोनमः ११
यया विना जगत्सर्वं मूकमुन्मत्तवत्सदा
वागाधिष्ठातृ-देवी या तस्यै वाण्यै नमोनमः १२
स्मृतिशक्ति-ज्ञानशक्ति-बुद्धिशक्ति-स्वरूपिणी
प्रतिभा-कल्पना-शक्तिर्या च तस्यै नमोनमः १३
त्वं संस्तुता पूजिता च मुनीन्द्रमनुमानवैः
दैत्येंद्रैश्च सुरैश्चापि ब्रह्माविष्णुशिवादिभिः १४
जडीभूतः सहस्रास्यः पंचवक्त्रश्चतुर्मुखः
यां स्तोतुं किमहस्तौमि तामेकास्येन मानवः १५

( ब्रह्मवैवर्त पुराण प्रकृति खड अ. ५, ६– १५ )

याज्ञवल्क्य म्हणाले, 'हे जगदंबे ! हे ज्ञान-देवते ! कृपा कर ! जगज्जननी ! मजवर कृपा कर ! मी तुला अनन्यभावे शरण आलो आहे हे देवि ! गुरूच्या अवकृपेमुळें मी हतविद्य होऊन निस्तेज बनलो आहे. ज्ञानहीन झालो आहे. स्मृतिभ्रष्ट बनलो आहे, अर्थात् या सर्व आपत्तीमुळे मी सर्वस्वी दुःखसागरात बुडून सारखा धडपडत आहे. तर हे शारदाबे ! मला श्रेष्ठ ज्ञान दे. स्थिर स्मृति दे. तेजस्वी विद्या दे. दिव्य काव्य-शक्ति दे ग्रंथ निर्माण करण्यास सामर्थ्य दे. सच्छील व सुप्रतिष्ठित असा शिष्यवृंद दे सभेत प्रभाव गाजविण्याची सर्वोत्तम प्रतिभाशक्ति दे. सूक्ष्म विचार करण्याची दिव्य शक्ति दे. हे माते हे विद्याधि-

देवि ! काय सांगू माझें संकट, आणि किती सांगू माझें दुःख ! दुर्दैवानें घेरल्यामुळें माझी विद्या जणु काही लुप्तप्राय झाली आहे तर हे महामंगल देवते ! योगमायेनें भगवान ज्याप्रमाणे वृक्षाची अंकुरोत्पत्ति करतो तद्वत् तूंहि माझी नष्टप्राय झालेली विद्या पुनः सजीव व सतेज कर हे सरस्वति ! हे शारदाबे! प्रत्यक्ष तूं ब्रह्मरूपिणी आहेस, तशीच ज्योतिरूप आहेस सनातन असून अखिल विद्यांची अधिष्ठात्री देवता आहेस अशा तुला—मंगल वाग्देवतेला—माझा नमस्कार असो हे ज्ञानमाउली, काय सांगू तुझा महिमा ! मनुष्य जिवंत असूनहि तुझ्याशिवाय तो मेल्यासारखाच आहे हे सर्व जग तुझ्या अनुग्रहाशिवाय केवळ मूक व मूढ आहे हे देवि, तुला माझा नमस्कार असो हे सरस्वति, किती वर्णूं तुझा महिमा ? प्रत्यक्ष तूं स्मृतिशक्ति आहेस प्रतिभाशक्तीहि तूंच, आणि ज्ञानशक्तीहि पण तूंच आहेस हे जगन्माउली, मुनीजनांनी तुझे स्तोत्र गाइले आहे तसेंच मन्वादि मनुष्यांनी व देव-दानवांनी तुला मुक्तकंठानं आळविलें आहे फार काय ब्रह्मा–विष्णु–शिव यासारख्या देवश्रेष्ठांनी देखील तुझा दिव्य महिमा मोठ्या आवडीनें गायन केला आहे मग वण वणू असा मी तरी किती वर्णूं तुझा महिमा ? पाहा हजार मुखांचा तो शेष ! तो मुद्धां तुझा महिमा गातां गातां अखेर जडमूढ बनला त्या पंचमुखी शंकराचीहि तीच कथा आणि तो चतुर्मुख ब्रह्मा झाला तरी काय ? बिचारा तोहि अखेर थकलाच की नाहीं ? मग एकच तोंडाचा मजसारखा अल्प मनुष्य तुझा तो अनंत महिमा गा गा गाईल तरी किती ? आणि तो संपणार तरी कसा ! हे परमेश्वरि, प्रसन्न हो मज दीनावर कृपा कर मला पुनः ज्ञान व प्रतिभासंपन्न कर माझी विद्या स्थिर व

जागृत राहो, व ज्ञान सामर्थ्य अभग व अजिक्य बनो हे मगल माते, माझा नमस्कार असो.'

याप्रमाणें सरस्वती देवतेचे मगल व सुदर स्तोत्र गाऊन याज्ञवल्क्यानी तिला नमस्कार केला ! पुन पुन केला भक्त-वत्सल शारदाबाच ती ! जगन्माउली ! याज्ञवल्क्याची ती आतापर्यंतची अनन्य उपासना, व एकनिष्ठ भक्ति पाहून व हे वरील सुदर स्तुतिस्तोत्र ऐकून परम सतुष्ट होऊन प्रत्यक्ष त्या भक्तश्रेष्ठाच्या मस्तकावर तिने आपला वरदहस्त ठेविला, व 'सुकवीन्द्रोभव ' असा मगल आशीर्वाद देऊन ती अतर्धान पावली, धन्य झाले याज्ञवल्क्य आनदानें आता त्याचा आत्मा फुलला बुद्धि उजळली ! मन प्रसन्न झाले. मुखावर दिव्य तेज खुलले व नेत्रात अपूर्व चैतन्य चमकू लागले ! त्याची तपश्चर्या फळास आली व जीवितहेतु साध्य झाला सूर्यनारायण व सरस्वती देवी याचा वरप्रसाद मिळवून ते आता कृतार्थ झाले.



# सवता सुभा !

याज्ञवल्क्य अरण्यात जाऊन, सूर्याराधना करून दिव्य ज्ञान मिळवून परत घरी आले. ही बातमी ऐकताच सर्व जण त्यांना भेटून त्यांचे क्षेम-समाचार घेऊं लागले. जे कोणी त्यांच्या दर्शनास येत, ते त्यांची ती दिव्य व तेजस्वी मूर्ति पाहून आनंदाश्चर्यानें भारले जाऊन, त्यांच्या अलौकिक साहसाचें व धाडसाचें कोड-कौतुक करीत. त्यांच्या अंतर्बाह्य स्थितीत व रूपात मोठी क्रांति झाली असल्यामुळें लोकांना ती एक नवीन विभूतीच वाटूं लागली. त्यांच्या चेहऱ्यांत, वांग्यांत, दृष्टीत, आवाजांत, भाषणांत व वर्तनांत आमूलाग्र फरक पडला होता. त्यांच्या त्या प्रफुल्ल चेहऱ्यावर दिव्य तपश्चर्येचें मधुर तेज चमकत असून, मुद्रा शांत व प्रसन्न दिसत होती. त्यांची अंतर्ज्योति चांगली उजळली असल्यामुळें तिची साक्ष त्यांचे नक्षत्राप्रमाणे चकाकणारे पाणीदार डोळे स्पष्ट देत होते. त्यांच्या मधुरवाणीत प्रत्यक्ष सरस्वतीच अवतरल्यामुळें तें मोहक व प्रेमळ भाषण ऐकून श्रोतृवर्ग मंत्रमुग्ध होऊं लागला. त्यांच्याशी भाषण करतांना जी काय त्यांच्या मुखांतून शब्दसंपत्ति बाहेर पडे, ती काही अपूर्व असून ते जे विचार प्रगट करीत तेहि अलौकिक असत. त्यांची निगर्वीवृत्ति, साधा, सरळ स्वभाव, विनयपूर्ण भाषण व आदरपूर्ण वर्तन पाहून जो तो त्यांना कौतुकपूर्वक धन्यवाद देई.

त्यांना भेटणारा प्रत्येक जण प्रथम त्यांच्याकडे औत्सुक्यपूर्ण दृष्टीनें टक लावून पाही. पण जों जों पाही तों तों त्याचे मन

तेथे मधावरील माशाप्रमाणे आकर्षून राही प्रेक्षकाच्या डोळयाची सपूर्ण तृप्ति झाली असे सहसा होत नसे

त्याना भेटून गेल्यावर जो तो मनात म्हणे की, याज्ञवल्क्य हे आपलेच आहेत पण दुसऱ्या क्षणी त्यास वाटे की, ते आपलेच असले तरी आपल्यापेक्षा काही निराळेच दिसतात कोणाला असे वाटे की, ते आपल्यासारखेच आहेत, पण आपल्यापेक्षा खात्रीने श्रेष्ठ आहेत एकदरीत त्याचे दर्शन घेऊन त्याच्याशी सभाषण केल्यावर ज्याला त्याला असे वाटे की, आपण अगदी सामान्य आहोत, पण ते म्हणजे कोणी अद्वितीय, महाज्ञानी, श्रेष्ठयोगी, महान् तपस्वी, आणि दिव्य विभूति आहेत

याप्रमाणे ते मिथिलेत आल्यावर तेथें व तिच्या आसपासच्या गावात याज्ञवल्क्य म्हणजे लोकाच्या कुतूहलाचा व कोडकौतुकाचा एक विषयच होऊन बसला जसजशी ही बातमी बाहेर पसरत चालली, तसतसे त्याचे दूरदूरचे स्नेही सोबती चाहते व सहाध्यायी त्याना मुद्दाम येऊन भेटून जाऊ लागले त्याच्याशी ते बोलू लागले प्रदीर्घ भाषण करून ते आपला अरण्यातला अनुभव, तपश्चर्येचा प्रभाव, सूर्यनारायणाचा प्रसाद, सरस्वतीचे वरदान इत्यादि आश्चर्यकारक व अलौकिक गोष्टी सागत असत अतिथीची गर्दी एवढी झाली की नेहमी दहा पाच मित्रमडळीचा घोळका त्याच्या शेजारी आसन घालून बसलेला दिसू लागला सुनदेचा मुलगा अरण्यात जाऊन देव होऊन आला, ही बातमी स्त्री समाजात पसरताच कित्येक जणींनी सुनदेस भेटून तिला धन्यवाद दिला

रोज सध्याकाळी मित्रमडळीस बरोबर घेऊन त्याच्याशी आपण अभ्यासिलेल्या नवीन वेदावर विद्वत्तापूर्ण व मनोरज क-

विचारविनिमय ते करीत असत. सूर्यप्रेरणेने आपण तयार केलेला शुक्ल यजुर्वेदाचा प्राथमिक काही भाग आपल्या मधुर वाणीतून सुस्वर म्हणून दाखवून ऐकणाराची मति गुगवून त्याना नागाप्रमाणे ते डोलावयास लावीत त्याचा तो वेद ऐकण्याचे काहीना तर वेडच लागले होते उद्दालक, हिरण्यनाभ, वैशपायन व शाकल्य याच्या आश्रमातील त्याचे काही चाहते व स्नेही सोबती तर घरदार सोडून त्याच्या जवळच कायमचा तळ देऊन राहिले होते. एवढी त्याच्या व्यक्तिमत्त्वाची मोहिनी आसमतात पडली होती त्यामुळे त्याच्यावर सर्वांचा लोभ व भक्ति जडून दोजारी-पाजारी त्याचे मोठे चाहते व कैवारी झाले, ते त्याचे चागले आदरातिथ्य करीत. थोडयाच वेळात या उदयोन्मुख जगद्गुरुचा बोलबाला देशात सर्वत्र पसरून जनता त्याच्याकडे प्रेमादराने पाहू लागली ते बाहेर निघाले म्हणजे लोक तेथे तेथे जमा होऊन त्याच्याकडे टक लावून पाहात व भक्तिपूर्वक नमस्कार करून आपला आदर व्यक्त करीत सारांश, अगदी अल्प वयातच याज्ञवल्क्य म्हणजे एक महान् विभूति म्हणून चमकू लागली

त्यानी जो शुक्ल यजुर्वेद श्री सूर्यनारायणापासून प्राप्त करून घेतला–अर्थात् त्याच्या दिव्य प्रेरणेने व प्रसादाने मूर्त स्वरूपात आणला–तो वैशपायनाच्या जुन्या वेदापेक्षा सर्वस्वी निराळा व स्वतत्र असून, तो सुव्यवस्थित व सुसगत असा होता व आहे. तसाच म्हणावयास सुलभ व ऐकावयास सुश्राव्य असा आहे अतएव या वेदाच्या प्रसारार्थ व प्रचारार्थ स्वतत्र असा एक पक्ष निर्माण करून, तद्द्वारा लोकोपकारार्थ व लोकहितार्थ या

शुद्ध वेदाचा जगात प्रसार व प्रचार करावा असे त्याना वाटे याबाबत त्याना सर्वांचा सपूर्ण पाठिंबा होता

शुक्ल यजुर्वेदाचा वाढदिवस श्रावण शुक्ल पौर्णिमेस असतो त्या दिवशी भगवान् सूर्यनारायणाने प्रसन्न होऊन याज्ञवल्क्यास शुक्ल यजुर्वेदाचा स्फूर्तिरुपाने पाठ दिला होता त्या दिवशी याज्ञवल्क्याने श्रावणी आटोपल्यावर सूर्यनारायणाचे ध्यान करून व सरस्वतीचे स्मरण करून 'श्री शुक्ल यजुर्वेदीय वाजसनेय शाखा' या नावाची स्वतन्त्र सस्था स्थापन केली व त्याचे धुरीणत्व पत्करून त्या कार्याच्या प्रसारार्थ व उत्कर्षार्थ आपणास आजन्म वाहून घेतले त्या दिवसापासून याज्ञवल्क्य हे शुक्ल यजुर्वेद-शाखाप्रवर्तक आद्य व मुख्य गुरुदेव झाले

# गृहस्थाश्रमांत पदार्पण

वैदिक धर्माची सर्व मदार गृहस्थाश्रमावरच अधिष्ठित झालेली आहे किंबहुना गृहस्थाश्रम म्हणजेच वैदिक धर्म आणि म्हणून सर्व आश्रमात त्या आश्रमालाच प्रामुख्याने अग्रस्थान देण्यात आलेले आहे (अर्थात् हा आश्रम साध्य झाल्याशिवाय मानवजन्म सफल व कृतकृत्य होत नाही तो साध्य व्हावयाला एकट्या पुरुषालाच शक्य नाही स्त्रीचे साहचर्य व सहकार्य लागते अतएव स्त्रीशिवाय पुरुष हा या बाबतीत असहाय, अपूर्ण नि अर्धवट आहे तिच्या सहवासानेच तो पूर्ण होतो

वैदिक धर्म स्पष्ट सांगतो की, ' अर्धो ह वाऽएष आत्मनो यज्जाया तस्माद्यावज्जाया न विन्दते नैव तावत्प्रजायतेऽसर्वो हि तावद्भवति अथ यदैव जाया विन्दतेऽथ प्रजायते तर्हि हि सर्वो भवति ' ( श प ५ २-१-१० ) पत्नी ही पुरुषाची अर्धांगी आहे म्हणून जोपर्यंत तो जाया मिळवीत नाही, तोपर्यंत तो प्रजोत्पत्ति करु शकत नाही आणि म्हणून तोपर्यंत तो अपूर्णच असतो जेव्हा तो जाया मिळवून तिच्या ठायी प्रजोत्पादन करील तेव्हाच तो पूर्ण होतो यावरुन वैदिक धर्मात स्त्रीचे स्थान किती उच्च आहे व तिचे सहकार्य किती जरूर आहे याची कल्पना सहज येईल 'गृहस्थ' या शब्दातील 'गृह' या शब्दाचा अर्थच 'जाया' 'पत्नी' 'गृहिणी' असा असून, तो ऋग्वेदात तसा स्पष्ट बोलून दाखविण्यात आलेला आहे 'जायेदस्त' जाया म्हणजेच घर असे तेथ स्पष्टच म्हटले असून, तोच भाव 'न गृहं गृहमित्याहु गृहिणी गृहमुच्यते' या मनूजीच्या वचनात प्रतिबिंबित झाला आहे तेव्हा गृहस्थाश्रमात ज्यास शिरावयाचे आहे त्याला विवाह करून स्त्रीचे सख्य व सहकार्य मिळविणे अपरिहार्यच आहे

तेव्हा, जो वेदोपासक आहे–ज्याची वैदिक धर्मावर श्रद्धा आहे–त्याला ब्रह्मचर्याश्रमातील सपूर्ण ध्येय साध्य करून घेतल्यावर गृहस्थाश्रमी बनणे ह ओघानेच प्राप्त होते कारण मानवजन्म कृतार्थ व्हावयाचा, कृतकृत्य व्हावयाचा तो या गृहस्थाश्रमातच होय प्रपच व परमार्थ माधण्याचे हेच एकमेव स्थान होय आणि ज्याने ते दोन्ही साधले, तोच कृतकृत्य झाला असे मानणारा वैदिक धर्म असून, स्वर्गाची दिव्य दौलत त्यासाठीच आहे, असे त्याचे स्पष्ट मागणे आहे जो वैदिक आर्यकुलात जन्मतो, ता जन्मत च तीन ऋणे घेऊन जन्मतो देवऋण, ऋषिऋण व पितृऋण ही तीन ऋणे जन्मल्याबरोबर त्याच्या मागे लागलेली असून ती फेडल्याशिवाय तो कृतकृत्य झाला असे धर्मदृष्टचा मानता व म्हणता येत नाही आणि या ऋणातून मुक्त झाल्याशिवाय त्याला स्वर्गाचा दरवाजा उघडला जाणारहि नाही! म्हणून प्रपच व परमार्थ, इहलोक व परलोक हे दोन्ही साधण्यासाठी म्हणून गृहस्थाश्रमाचा अवतार आहे शिवाय देवोपासना, यज्ञोपासना, ही फक्त या आश्रमाचीच मिरासदारी आहे ह विसरून भागावयाचे नाही

हे सर्व सागण्याचे कारण की याज्ञवल्क्य ब्रह्मचर्याश्रमातील आपले ध्येय साध्य करून घेऊन, घरी परत आल्यावर गृहस्थाश्रमात पदार्पण करणार हे ठरल्यासारखेच होते या वेळी त्याचे वय जवळ जवळ तीस बत्तीस वर्षाचे असावे याज्ञवल्क्य गृहस्थाश्रमी होऊ पाहतात ही बातमी बाहेर पसरताच जो तो त्याना जामात करून घेण्यास पुढे येऊ लागला. अखेर कात्यायनी त्याची गृहलक्ष्मी झाली! कात्यायनी सुंदर तर होतीच, पण नुसत्या सौंदर्यावर याज्ञवल्क्य भुलणारे प्रेमवेडे नव्हते.

तिचें शील व स्वभाव याला महत्त्व देऊन स्त्रीचें मूल्य वाढविणारे तीनहि गुण तिच्यात पूर्णत्वानें वास करीत असल्यामुळे तिला त्यानी आपली गृहिणी केले.

'धर्मप्रजात्यर्थोहि विवाहः' हे वैदिक विवाहाचे श्रेष्ठ व सुंदर ध्येय पूर्ण त्याच्या दृष्टीसमोर असल्यामुळें त्या रोखाने आतां संसारचक्रें हलू लागली. वरील वचनाकडे दृष्टि दिल्यास 'देहतर्पणार्थो हि विवाहः' व 'रामा रमणाय' हें जे आधुनिकाचें विवाहसूत्र आहे, त्यापेक्षा वरील वैदिकाचे सूत्र किती तरी सरस, नमजस व सयुक्तिक आहे. याज्ञवल्क्याच्या एकाकी जीवनाला आता निराळे वळण लागले. तरुण तरुणीचा नवा संसार म्हणजे तो एक त्याना नवे जगच असतो. स्त्रीपुरुषाच्या सांसारिक जीवनात विविध भावनाचे नदनवन आपोआपच खुलते. मग तो राजाचा राजवाडा असो वा गरिबाची चंद्रमौळी झोपडी असो! कोठें झाले तरी दाम्पत्यजीवनातून उठणारे प्रेमाचे फवारे व आनंदाच्या लहरी एकच व सारख्याच ! प्रेमाच्या नंदनवनात व आनदाच्या साम्राज्यात श्रीमत गरीब हा भेदच नाही. सर्वांना एकच माप. |

स्त्रीपुरुषांचा जीव–पतिपत्नीचा आत्मा–एक अखड होण्याचा खराखुरा मार्ग म्हणजे सुशील पत्नीची अनन्य पतिभक्ति व सालस पतीची निर्मळ पत्नीनिष्ठा हा एवढाच आहे.| सती कात्यायनी तर आपल्या पतिरायाला साक्षात् देव मानीत असे. आणि देव म्हणजे तरी काय ? देणारा तो देव, 'देवो दानात्' अशी देव शब्दाची व्याख्या असून, स्त्रीला इच्छित गोष्टी देऊन तिचे मनोवांछित पूर्ण करून तिला सुखांत व खुषीत ठेवणारा तो तिचा देवच. याच अर्थानें पतीला देव समजून आर्य स्त्रिया

त्याला पूज्य मानीत व मानतात. या बाबतीत सीतेनें अरुंधतीला दिलेले उत्तर मोठे मार्मिक आहे. मी माझ्या पतीला श्रीरामचंद्राला देवाप्रमाणे पूज्य का मानते, याचे तिचे उत्तर फार नामी असून तें पुढील वचनात आहे तें असें; "मित ददाति हि पिता मित भ्राता मित सुतः। अमितस्य हि दातारं भर्तारं का न पूजयेत्॥ बाप काय, भाऊ काय, मुलगा काय स्त्रीला जे काय देतो ते मित म्हणजे मर्यादितच असते. पण अमित देणारा, ती मागेल ते सर्व देणारा, तिचे सर्व मनोरथ पूर्ण करणारा तिचा पति हा एकटाच असून, तशा पतिदेवाला पूज्य का मानू नये ? असे तिने सांगितलें आहे.

सीतेच्या या वचनात स्त्रीचे सर्व अंतःकरण पूर्ण भरलेलें असून, तें सांसारिक स्त्रियाना खात्रीनें मननीय आहे."

आणि हें वचन डोळ्यापुढें ठेवूनच भारतीय आर्य महिलांनीं गृहिणीच्या श्रेष्ठ व पवित्र कर्तव्याला जागून, गृहस्थाश्रमाला सुंदर उजाळा देऊन झोपडीचा स्वर्ग बनवून दाखविला आहे. तसा प्रकार जगाच्या इतिहासांत क्वचितच पाहावयास मिळतो. 'अस्मिन् गृहे गार्हपत्याय जागृहि' ही वेदवाणी सतत डोळ्यापुढे ठेवून याज्ञवल्क्याच्या त्या गृहलक्ष्मीनें आपल्या नूतन संसाराची मांडणी व थाटणी इतक्या चातुर्यानें व दक्षतेनें केली की त्या साध्या संसारांत तिनें प्रत्यक्ष स्वर्गच उभारून दाखविला.

स्त्रीपुरुषांचा संसार सुखाचा व यशस्वी होण्याची गुरुकिल्ली वेदनारायणानें यापुढील मंत्रात ठेवून दिली आहे. ती ज्याला सांपडली त्याचा संसार सुखाचा झालाच म्हणून समजावा. विवाहप्रसंगी वर वधूला उद्देशून म्हणतो की 'यदेतद् हृदयं मम तदस्तु हृदयं तव। यदेतद् हृदयं तव तदस्तु हृदयं मम॥' हे वधू! माझे जे मन आहे तसेंच तुझेंहि असावें व तुझें जें आहे

तसेच माझहि असेल ] गृहस्थाश्रम सुखी व आनदमय होण्या चे मर्म काय त इथ आहे स्त्री पुरुष हे विवाहरज्जूने बद्ध झाल्याव र हा वरील मन्त्र अहर्निश डोळ्यापुढे ठेवून त्याप्रमाणे वागू लागतील तर ससार गाडा सुरळीत चालून ' कल्याण तत्र वै ध्रुवम् ' ही मनूक्ति मूर्तिमत अवतरली म्हणून खास समजावे सागण्याचे तात्पर्य असे की, योगीश्वर आता विवाह करुन गृहस्थाश्रमी झाले आणि धकाधकीच्या जागतिक जीवनात त्यांनी उडी घेतली.



# जनक-याज्ञवल्क्य भेट

याज्ञवल्क्य गृहस्थाश्रमी झाल्यावर पुढे एके दिवशी श्वेतकेतु व सोमशुष्म हे त्याच्या भेटीस आले तेव्हा त्याच्या-त्याच्यात काही विचारविनिमय होऊन इष्ट साधनार्थ दौऱ्यावर निघाले. वाटेत त्याना जनक राजा भेटला. तो रथातून चालला होता. या तिघाना पाहून त्याने आपला रथ थांबविला त्याना अग्निहोत्रासबधी माहिती हवी होती म्हणून ते म्हणाले. "आपण अग्निहोत्र कसे करता, हे मला सांगाल काय ?"

श्वेतकेतु-सूर्य व अग्नि या दोन देवताप्रीत्यर्थ धर्माच्या म्हणजे तापविलेल्या दुधाच्या दोन आहुती आहवनीय अग्नीत आम्ही नित्य देत असतो आदित्य हा उष्णदुग्ध ( धर्म ) आहे. त्या दुधाची आहुती सूर्य देवाला उद्देशून मी संध्याकाळी अग्नीत देऊन हवन करतो. त्याचप्रमाणे अग्नि हा सुद्धा उष्ण आहे. त्याला उद्देशून घर्माची आहुती आदित्यामध्ये हवन करतो

जनक-असे केले म्हणजे काय होते ?

श्वेतकेतु-याप्रमाणे जो करतो, त्याची अखंड भरभराट होते. त्याचप्रमाणे त्याचा लौकिकहि वाढतो. इतकेच नव्हे तर त्याचे आदित्य व अग्नि याच्याशी सख्य जुळून, अखेर तो सूर्य व अग्नि लोकात जाऊन राहतो.

नतर जनक राजा सोमशुष्माकडे वळून म्हणाले"सोमशुष्मा आपला अग्निहोत्राचा प्रकार कसा आहे ?"

सोमशुष्म-मी तेजच तेजामध्ये हवन करतो.

जनक–ते कसे ?

सोमशुष्म–आदित्य हा तेज आहे त्याला उद्देशून सायंकालीन अग्नीत हवन करतो आणि अग्नि हा सुद्धा तेजच आहे त्याला उद्देशून सकाळी आदित्यामध्ये आहुती देतो

जनक–म्हणजे काय होते ?

सोमशुष्म–जो याप्रमाणे अग्निहोत्र करतो, तो मोठा तेजस्वी होतो तसाच मोठा लौकिकवान होतो आणि चांगला भोक्ताहि होतो आणि मरणोत्तर सूर्य व अग्नि या देवताचे सायुज्य व सालोक्य प्राप्त करून घेतो.

जनक राजा याज्ञवल्क्याना म्हणाला, 'अग्निहोत्राचा आपला प्रकार कसा आहे ? '

याज्ञवल्क्य–माझा प्रकार काहीसा निराळा आहे मी अग्नि हा गार्हपत्यातून वर काढून घेतो असे करणे हेच अग्निहोत्र होय. आता सूर्य जेव्हा अस्तास जातो, तेव्हा सर्व देवहि त्याबरोबरच निघतात आणि ते जेव्हा मी अग्नि बाहेर काढलेला पाहतात, तेव्हा ते परत वळतात नंतर यज्ञपात्र स्वच्छ धुऊन, ती वेदीवर यथास्थान ठेवून धार काढल्यावर ते देव जेव्हा मजकडे पाहतात व मी त्याजकडे पाहतो तेव्हा त्या दुधाने मी आहुती देऊन त्याना संतुष्ट करतो असा माझा अग्निहोत्र विधि आहे.

जनकाला हे निवेदन ऐकून हर्ष झाला. तो म्हणाला, अग्निहोत्राविषयी अधिक सूक्ष्म व अधिक खोल आपण विचार केलेला आहे. आपला हा विधि ऐकून मला आनंद झाला. याबद्दल मी आपणास शभर गायी दक्षिणा देतो. या विधीसंबंधी संपूर्ण माहिती अद्यापहि मला मिळत नाही. अग्निहोत्र म्हणजे त्या दोन आहुतीची उत्क्रांति, प्रगति, आधार, तृप्ति, त्याचे पुनरागमन

वगैरेसंबंधी संपूर्ण ज्ञान आपणास झाल्यासारखे दिसत नाही असे म्हणून राजा रथात बसून निघाला

राजा निघून गेल्यावर या तिघात विचारविनिमय झाला. जनक हा क्षत्रिय आहे व आम्ही ब्राह्मण आहोत त्यामुळे या विधीसंबंधी आपणच अधिकारी आहोत या संबंधी त्याच्याशी वादविवाद करावा म्हणून पुढे लागलीच ते त्याच्या भेटीस निघाले. राजाने रथ थांबविला त्याला त्याचा उद्देश ध्यानी आला तो म्हणाला, 'ठीक आहे आता अग्निहोत्राच्या आहुतींची उत्क्रांति व प्रगति वगैरेसंबंधी स्पष्ट खुलासा करतो अग्निहोत्रात ज्या दोन आहुति देण्यात येतात त्या यथाविधि दिल्यावर प्रथम त्या अंतरिक्षात प्रवेश करतात आणि त्या अंतरिक्षालाच आहवनीय (अग्नि) करतात वायूला समिधा व किरणाला शुद्ध आहुती करुन त्या अंतरिक्षाला संतृप्त करतात नंतर त्या वर आकाशात जातात त्यावेळी आकाश हाच आहवनीय अग्नि केला जातो. आणि सूर्य हा समिधा आणि चंद्र हा शुद्ध आहुति होतो या आहुतीने आकाश संतृप्त झाल्यावर मग तेथून त्या आहुति पृथ्वीवर येतात आणि या पृथ्वीला आहवनीय अग्नि करतात तेव्हा अग्नि हा त्याच्या समिधा आणि वनस्पति या शुद्ध आहुति होतात या आहुतीपासून पृथ्वी संतृप्त होते नंतर त्या मनुष्यात शिरतात आणि त्याचे मुख हे त्याचे आहवनीय, जिव्हा ही समिधा आणि अन्न हे त्याचे शुद्ध अन्न होत याप्रमाणे त्या मनुष्याला तृप्त करतात हे जाणून जो अन्न भक्षण करतो त्याने अग्निहोत्र केले असे होते या नंतर त्या पुढे तेथून निघतात व त्या स्त्रीमध्ये शिरतात तेव्हा तिचे उपस्थ हे आहवीय, तिचे उदर समिधा आणि रेत हे शुद्ध आहुति करण्यात येते आणि खरोखर

हे जाणून जो आपल्या स्त्रीजवळ जाईल त्याने अग्निहोत्र केल्यासारखे होते आणि त्यापासून जो मुलगा होईल तो लोकोद्धार कर्ता होतो या क्रियेस अग्निहोत्र म्हणतात!

जनकराजाचे हे विवेचन ऐकून याज्ञवल्क्यास परम समाधान व अति आनंद झाला नंतर त्यांनी जनकास वर दिला. तेव्हा जनक म्हणाला, 'मला आताच त्याची गरज नाही मला जेव्हा इच्छा होईल तेव्हा आपणास मनमुराद प्रश्न विचारण्याची संपूर्ण मुभा असावी.' 'तथास्तु' असे याज्ञवल्क्यांनी म्हटल्यावर जनक तेव्हापासून ब्राह्मण झाला (श प. ११।६।२)



# गुरु-शिष्यांचा खटका

शुक्ल यजुर्वेदाची आखणी व घटना आता चांगली तयार झालेली असून, त्याच्या प्रचार-कार्यासहि प्रारंभ झालेला होता याज्ञवल्क्य आपल्या शिष्य व सहकारी मंडळीस बरोबर घेऊन जनतेला शुक्ल यजुर्वेदाचे महत्व, मर्म व मोठेपणा समजाऊन देण्यासाठी म्हणून मिथिलेच्या आसपासच्या प्रदेशांतील भेट देण्याच्या उद्योगास लागले लोकांवर त्यांच्या भाषणाची छाप पडत जाऊन, शुक्ल यजुर्वेदाविषयी त्यांच्या मनात कुतूहल जागृत होऊन ते दिवसेंदिवस वाढीस लागले कोणी त्यांचे स्वागत करीत, कोणी तारीफ करीत, तर कोणी त्याविषयी अधिक खुलासा विचारीत

याच सुमारास जनकराजाच्या वडिलांनी एक मोठा यज्ञ करण्याचे ठरवून, त्याप्रमाणे सिद्धता चालविली होती. या यज्ञात वैशंपायन याजकडे अध्वर्यूचे काम होते ऋग्वेदाचे प्रमुख आचार्य पैल याजकडे होत्याचे काम असून, सामवेदाचे कुलगुरु जैमिनी हे उद्गाता व अथर्ववेदाचे मुख्य गुरु सुमंत हे ब्रह्मा झाले होते याप्रमाणे या यज्ञात मोठमोठ्या ऋषींनी भाग घेतला होता शिवाय इतर जे उप-ऋत्विज लागतात, ते त्या त्या आचार्यांचे शिष्य झाले होते यज्ञ समारंभ जनक राजाच्या घरचाच असल्यामुळें त्याला एक प्रकारचे महत्व प्राप्त होऊन, लोकांत त्याविषयीं मोठें औत्सुक्य, कुतूहल व दर्शनलालसा उत्पन्न झाली होती

याज्ञवल्क्यादि या समारंभास उपस्थित होते पण ऋत्विज

म्हणून नव्हते तो मान त्याना अद्याप मिळालेला नव्हता अजून शुक्ल यजुर्वेदाला मिळावी तशी लोकमान्यता व राजमान्यता मिळालेली नव्हती. खासगीरीतीनें लोक तिकडे सहानुभूतीने व चिकित्सक दृष्टीने पहात पण उघडपणे त्याला मान्यता देण्याचे धाडस करण्यास अजून लोक धजत नसत याज्ञवल्क्याची योग्यता व विद्वत्ता त्याना पटली होती पण त्याच्या नवीन कलाकृतीकडे श्रद्धा-युक्त आदरभावाने पहाण्याची मनोवृत्ति अद्याप त्याच्यात व्हावी तशी जागृत झालेली नव्हती म्हणून प्रतिष्ठित लोकात त्याना आचार्यांचा मान क्वचितच मिळे येथे ते जे हजर होते ते एक सामान्य प्रेक्षक म्हणून होते आचार्य जरी होते तरी ' सुधारक आचार्य ' अशा दृष्टीने लोक त्याच्याकडे पहात

या यज्ञात अध्वर्यूचे काम वैशपायनाकडे होते पूर्व-संकेताप्रमाणे यज्ञकार्यास प्रारभ झाला व पुढ काही दिवस चालून तो आटोपण्याच्या बेतात आला येथपर्यंत सर्व काही सुरळीत व सुसूत्र चालले आता फक्त प्रायश्चित्तविधि तेवढा शिल्लक राहिलेला होता. हा विधि अध्वर्यूने करावयाचा असतो यज्ञानुष्ठानात अध्वर्यूकडून जो काय खोटी होते अगर प्रमाद घडतात, त्याबद्दल प्रायश्चित्त घ्यावयाचे असते आणि हा विधि यथाशास्त्र झाला तरच यज्ञ सफल होतो, नाही तर नाही प्रायश्चित्तविधि घ्यावयाचे काम अध्वर्यूचे असल्यामुळे तो प्रसग वैशपायनावर येऊन पडला त्यानी प्रायश्चित्तविधि केला, पण तो साधावा तसा साधला नाही वैशपायनानी खूप खटपट केली पण ती काही शास्त्रशुद्ध साधण्याचा रग दिसेना अतएव यज्ञात वैगुण्य उद्भवून तो निष्फल होण्याचा प्रसग ओढवला.

त्यामुळे सर्वजण मोठ्या विवचनेत पटले वैशपायनहि हतबुद्ध झाल्यासारखे दिसू लागले. जनकाचे मन गोंधळात पडले. जनतेत खळबळ सुरू झाली. फजितीची वेळ येऊन ठेपली आता पुढें काय असा पुरोहित मंडळीला प्रश्न पडला कोणास काही सुचेना की काही उमजेना वेळ तर मोठी आणीबाणीची येऊन ठेपली.

याप्रमाणे सर्व विनाशात असता कर्मधर्मसंयोगाने जनकाची दृष्टि अकस्मात् याज्ञवल्क्याकडे वळली. त्याना पहाताच त्याचे कर्मकौशल्य,मनसिद्धि व ज्ञानसामर्थ्य याची जनक राजास आठवण होऊन ते तडक त्यांच्याकडे निघाले व वैशपायनहि मागोमाग तेथे आले जनकराजे हात जोडून त्याच्यापुढें उभे राहिले व वैशपायनहि असहाय्य मुद्रेने त्याच्याकडे पाहू लागले जनकानी यज्ञकार्य सुधारून तो सफल करण्याची त्याना विनंति केली आणि वैश-पायनानी त्यास आपली मूकसमति दिली थोर नि उदार मनाच्या याज्ञवल्क्याना त्याची दया आली आणि मागचे सर्व विसरून ते चटकन् तेथून उठले. आपल्या नूतन शुक्लयजुर्वेदातील सुधारलेल्या पद्धतीप्रमाणे प्रायश्चित्तविधि त्यानी यथाशास्त्र करून दाखविला. त्यामुळे मोठा चमत्कार झाला. हा विधि उरकल्याबरोबर तो यज्ञ परिपूर्ण होऊन सफल झाला.जनक आनदभरित झाले.वैशंपायनाच्या तोंडावर हास्य झळकले आणि प्रेक्षकानी आनदाने जयजयकार केला. जनकानी या प्रसगी ऋत्विजास यथायोग्य दक्षिणा दिली.

वैशपायन व याज्ञवल्क्य या उभयतामध्ये दक्षिणेबद्दल मात्र वाद उत्पन्न झाला. दक्षिणेपैकी सगळीच जरी नाही तरी योग्य हिस्सा मिळालाच पाहिजे असा आग्रह याज्ञवल्क्यानी धरला. अध्वर्यूला जी दक्षिणा मिळावयाची तिच्यावर आपण अध्वर्यूचे काम केल्यामुळे आपलाच पूर्ण अधिकार आहे,असा वैशंपायनाचा

दावा होता. यज्ञ सफल झाला तो कांहीं अध्वर्यूच्या करामतीनें नसून आपल्या कौशल्यामुळे झाला, असें याज्ञवल्क्याचें त्यास प्रत्युत्तर होतें. अर्थात आपणहि त्यात बरोबरीनें वाटेकरी आहोत, असा त्यांचा आग्रह होता. जनक राजे तो प्रकार पहात तटस्थ उभे होते. पण त्याना या वादात कांहीच करतां येईना. वाद तर हट्टास पेटत चालला आणि प्रकरण वाढत वाढत हातघाईवर येऊन ठेपले !

वैशंपायनहि कांहीं सामान्य पुरोहित नव्हते. प्रत्यक्ष अध्वर्यू होते. यज्ञांतील सर्व व मुख्य कामगिरी ही त्यांनीच पार पाडली. होती. मग त्यांना तरी कसा दोष द्यावा ? इकडे याज्ञवल्क्याकडे पहावें तर न्यायाची बाजू त्याचीच होती. तेथेंहि बोलण्याची सोय नव्हती.यज्ञ सफल झाला तो त्याच्या कौशल्यामुळे नि त्याच्या मंत्रसिद्धीमुळें ! वैशंपायनांचा केवळ दुराग्रह होता. प्रकरण भडकण्याचा संभव दिसताच देवल ऋषि या वादांत पडले. आणि मध्यस्थी करुन अर्धी अर्धी दक्षिणा दोघांत वाटून दिली आणि वाद मिटविला.

याज्ञवल्क्यांचा हा त्यांच्या सार्वजनिक जीवनांतील पहिला नि प्रचंड विजय होय. ( भा. शां. ३२३, १८–२० )

या अपूर्व विजयामुळें याज्ञवल्क्यांचा बोलबाला होऊन जिकडे तिकडे तो वाढीस लागला. जनक राजाची या नूतन विजयामुळें त्याच्यावर विशेष भक्ति व श्रद्धा जडली. मागेंच त्यांना त्यांच्या विद्येची चमक दिसून आलेली होती आणि या विजयानें तर तिच्यांत विशेष भर पडली. या प्रसंगानें शुक्ल यजुर्वेदाचा प्रभावहि त्यांच्या प्रचीतीस आला. त्यामुळें या वेदाकडे ते सहानुभूतीनें पाहूं

पणान तसेच ज्ञानातहि आम्हीच त्याच्यापेक्षा सरस आहोत. अशा चढेल वृत्तीने ते बेहोप होऊन आपल्या प्राप्तीतील एक कणदखील ते दुसऱ्यास द्यावयास तयार नसत.

देव काही निराळ्या प्रकृतीचे होते. ते या असुरांसारख्या काही चढेल व कंजुष वृत्तीचे नव्हते त्याच्यात विचार होता, औदार्य होते नि सत्प्रवृत्ति होती. त्याचा सागण्यासारखा मुख्य गुण म्हणजे त्यागवृत्ति हा होय आपल्यातील सुखाचा काही अंश इतरासहि देऊन राहिलेल्याचा ते उपभोग घेत असत आपण

लागले जनक राजाचा वेदविद्येत व तत्त्वज्ञानात फार मोठा अधिकार होता. ते मोठे धर्मनिष्ठ व विद्याव्यासंगी असे राजे होते. अशा श्रेष्ठ व विव्दान राजपुरुषाने याज्ञवल्क्याची प्रशंसा व कौतुक करावे, यावरूनच याज्ञवल्क्याची अलौकिक बुद्धिमत्ता व प्रचंड कर्मकौशल्य याची साक्ष सर्वांना पटली

जनक राजाच्या यज्ञातील या अपूर्व विजयामुळे याज्ञवल्क्याच्या भावी जीवनास फार मोठे उत्तेजन मिळून तरुण मंडळीत त्याचा जम चांगला बसत चालला तरुण हे कोठेहि व केव्हाहि नव्या जमान्याचे मोठे चाहते असतात हा अनुभव जसा आज आहे तसाच तो याज्ञवल्क्याच्या काळीहि दिसून आला. याज्ञवल्क्याचे यज्ञातील ते अपूर्व कौशल्य व अजब कर्तबगारी पाहून अनेक तरुणांचा त्याच्या सभोवती घोळका जमला आणि त्याचे तोंडून काही ऐकावयास मिळेल व त्याचा सहवास प्राप्त होईल या उद्देशाने ते त्यांना म्हणाले 'याज्ञवल्क्यजी ! आम्हास बोधपर अशी कथा अगर गोष्ट सांगण्याची कृपा करा ' याज्ञवल्क्यानी त्यांचे म्हणणे कबूल केले व म्हणाले, ' मी सांगणाऱ्या गोष्टीत एक मोठे तत्त्व गर्भित असून, शहाण्यांना ते मार्गदर्शक होईल असे मी समजतो देव व असुर हे दोघेहि एकाच प्रजापतीचे मुलगे पण दोघांच्या स्वभावात जमीन अस्मानाचा फरक. वर्चस्वासाठी त्यांच्यात मोठी स्पर्धा सुरू झाली त्यात उन्मत्त असुरांना मोठा गर्व झाला होता शिवाय ते मोठे स्वार्थी व कंजुष होते आपल्या नगातील पाणी देण्यास देखील ते तयार नव्हते ते म्हणत की, आपण श्रम करून मिळविलेल्या कमाईतला अन्न दुसऱ्याला फुकट काय म्हणून द्यावा ? आमच्याहून थोर, श्रेष्ठ व ज्ञानी असे देव आहेत तरी कोण ? थोरपणात, श्रेष्ठ-

पणात तसेच ज्ञानातहि आम्हीच त्याच्यापेक्षा सरस आहोत. अशा चढेल वृत्तीने ते बेहोष होऊन आपल्या प्राप्तीतील एक कणदेखील ते दुसऱ्यास द्यावयास तयार नसत

देव काही निराळ्या प्रवृत्तीचे होते ते या असुरासारखे काही चढेल व कजुष वृत्तीचे नव्हते त्याच्यात विचार होता,औदार्य होते नि सत्प्रवृत्ति होती त्याचा सागण्यासारखा मुख्य गुण म्हणजे त्यागवृत्ति हा होय आपल्यातील सुखाचा काही अश इतरासहि देऊन राहिलेल्याचा ते उपभोग घेत असत आपण अन शिजवून त्यातीलहि काही भाग ते दुसऱ्यास देत असत ही त्याची त्यागवृत्तिच त्याच्या अभ्युदयास कारण झाली होती

त्यावेळी प्रजापतीची मदत दोघानाहि अवश्य वाटली प्रजापति जिकडे जाईल म्हणजे ज्याचा पक्ष घेईल, त्याचा विजय ठरल्यासारखा होता म्हणून ते दोघहि प्रजापतिकडे जाऊन आपल्यास मदत करण्याबद्दल त्यास विनवू लागले तेव्हा प्रजापति त्याना म्हणाला, ‘ तुम्हामध्ये गुणाने जो श्रेष्ठ असेल त्याच्याकडे मी येईन आपली प्रौढी दाखविण्यासाठी स्वार्थवृत्तीचे व अहकारबुद्धीचे तिखटमीठ लावून असुरानी मोठा टोलारा उभा केला प्रजापतीने त्याचे सर्व म्हणण शातवृत्तीने ऐकून घेतले देव म्हणाले, ‘पिताजी ! असुराप्रमाणे आमच्याजवळ तसे सागण्यासारखे काही नाही फक्त एकच गोष्ट आम्ही आपल्यापुढे ठेवू इच्छितो, ती म्हणजे दुसऱ्यास सतोष देऊन त्यात आम्ही आनद मानतो आमचा आनद त्यागवृत्तीत आहे स्वार्थात नाही आम्हाला विनय आवडतो अहकार आवडत नाही. आम्हास सत्य व न्याय आवडतो कपट मात्र आवडत नाही ’

प्रजापतीने दोघाचे म्हणणे ऐकून घेतल्यावर देवाचे म्हणणे त्याला पटल्यामुळे व आवडल्यामुळे तो देवास जाऊन मिळाला. अर्थात त्याने आपले देवाला सर्वस्व देऊन टाकले त्याचा परिणाम असा झाला की, त्या देवासुर स्पर्धेत देवांचा विजय होऊन असुराचा पराभव झाला. देवाचा जो विजय झाला, तो त्याच्या त्यागवृत्तीमुळे आणि असुराचा जो पराभव झाला तो त्याच्या ताठर व उन्मत्तवृत्तीमुळ होय ( श. प. ५-१-१-१ व २ )

साराश ताठरवृत्ति व अहकारवृत्ति हे पराभवाचे मूळ आहे. ( 'पराभवस्यैतन्मुख यदतिमान.' श. प ) मनुष्य तिच्या आहारी गेला म्हणजे त्याची नेहमी अशीच फसगत होते.



# शुक्ल यजुर्वेदाची उभारणी

शुक्ल यजुर्वेदाला नीट व व्यवस्थित असे] मूर्तस्वरूप देऊन त्याची सुसगत व सुव्यवस्थित अशी कायमची उभारणी करण्याची आता वेळच येऊन ठेपली होती जनक राजाच्या यज्ञानतर अनेक ठिकाणी याज्ञवल्क्यानी आपल्या जबाबदारीवर लहान मोठे यज्ञ हाती घेऊन त्यात आपण तयार केलेल्या पद्धतीप्रमाणे मन्त्र म्हणून व कार्यक्रम आखून, ते सर्व यज्ञ समारभ अथपासून इतिपर्यंत यथासाग व पूर्ण यशस्वी करुन दाखविण्याचे श्रेय सपादन केले त्यामुळे लोकात त्याचा जम हळुहळ् बसत जावून, त्याचे पाऊल आस्ते आस्ते पुढे पडत चालले होत.

शिवाय त्याच्या सभोवती तरुण, उत्साहि, विद्वान व होतकरु अशा कर्तबगार मडळीचा जमाव दिवसेदिवस फुगतच चाललेला होता सूर्य व सरस्वती याचा दिव्य व मगल वरप्रसाद त्याना लाभला असून मन्त्रविद्या व योगविद्या यात त्याचा हातखडा आहे, ही गोष्ट लोकाच्या नजरेत भरत चाललेली होती त्यावाळी त्याच्या तोडीचा दुसरा विद्वान नाही,अशी त्याची सर्वत्र प्रसिद्धी होऊन याची प्रचीति पाहण्यासाठी मोठमोठे विद्वान व पडित देखील त्याच्या दर्शनास येऊ लागले होते याज्ञवल्क्याच्या विद्यापूत व मधूर वाणीत अशी काही विलक्षण मोहिनी भरली होती की, जो जो त्याच्या भेटीस म्हणून येई, तो तो त्याच्या विद्वत्ताप्रचुर, मुद्देसूद व विनययुक्त भाषणाने मन्त्रमुग्ध होऊन त्याच्याविषयी त्याच्या अन्त करणात प्रेम व आदर उत्पन्न होत असे.

गुणी जनाना जगापुढे येण्यास कोठेहि व केव्हाहि काही कालावधि लागतोच. मधून मधून त्याच्या कामात अडथळे हे उत्पन्न होतात आणि मत्सरी लोक नाही तसल्या अफवा पसरवून त्याची टिंगल व टवाळी करू लागतात ! अर्थात गुणी जनाच्या सत्त्वाची ही एक प्रकारची परीक्षाच असते यातून तावून सुलाखून जो बाहेर पडेल त्याचे यश मग चंद्राप्रमाणे वाढीस लागते, असा इतिहासाचा अनुभव असून याज्ञवल्क्यहि त्याला अपवाद नव्हते. तथापि त्याची बुद्धिमत्ता व कर्तृत्वशक्ति अचाट व अफाट असल्यामुळे त्याचा जम बसावयास फार अवधि लागला नाही. रोज त्याच्या आश्रमात धार्मिक विषयावर व तत्त्वज्ञानावर व्याख्यान व चर्चा होत असल्यामुळे जिज्ञासु श्रोतृवृंदाची तेथे चिकार गर्दी जमू लागली त्यामुळे थोड्याच कालावधीत त्याची छाप चांगली बसत चालली आणि त्याचा लौकिक देशभर चन्दनाप्रमाणे पसरत चालला त्याच्या सभोवती जमलेल्या प्रभावळीत कण्व, माध्यंदिन, जाबाल इत्यादि शिष्यगण विशेष उल्लेखनीय आहेत भगवान बुद्धाचा लौकिक व मान वाढविण्यास त्याचे शिष्य मोग्गलायन व सारीपुत्र हे जसे कारणीभूत झाले, तद्वत याज्ञवल्क्याचे विभूतिमत्व व नावलौकिक वाढविण्यास कण्व व माध्यंदिन हे शिष्यद्वयच मुख्याशाने कारणीभूत झाले होते.

शुक्ल यजुर्वेदाचा महिमा व प्रभाव दिवसेदिवस लोकाच्या निदर्शनास येत जाऊन त्या वेदाला आता व्यवस्थित, सुटसुटीत व एकसूत्री संहितेचे रूप देऊन, त्याची शाश्वत उभारणी करण्याची अगदी निकडीची वेळ येऊन ठेपली. सूर्यनारायणाच्या कृपेने लाभलेल्या दिव्य स्फूर्तीने व सरस्वतीच्या

मंगल वरप्रसादाने त्यानी तेव्हाच शुक्लयजुर्वेदाची घडी मनात ठसवून ठेविली होती तिला मूर्त स्वरूप देण्याच्या उद्योगास ते आता लागले. या कामी त्याना कण्व व माध्यदिन याची चागली मदत झाली

शुक्लयजुर्वेदाचे सहितीकरण करण्याच्या वेळी त्याच्या बुद्धीची ठेवण कशी होती याचा थोडासा कानोसा घेतला पाहिजे. त्यानी वैशपायनाच्या मागणीवरून त्याचा वेद टाकून दिला होता तथापि बुद्धीवर त्याचा उमटलेला सस्कार मात्र पुसला गेला नव्हता याज्ञवल्क्याची कृष्ण यजुर्वेदाची जाणीव पूर्ण बुजली नव्हती शिवाय त्याना ऋग्वेदाचेहि पूर्ण ज्ञान होत उद्दालकाजवळ राहून तत्त्वज्ञान व मत्रसिद्धी याचे त्यानी पूर्ण शिक्षण घेतले होत हिरण्यनाभाजवळ राहून योगाभ्यासहि केलेला होता

त्यानी रोमहर्षणाकडून इतिहास व पुराणाचे ज्ञान सपादन केले या सर्वांचा उपयोग त्यानी शुक्ल यजुर्वेद तयार करताना करून घेतला अथर्ववेदाचा अभ्यासहि त्यानी केला होता

याज्ञवल्क्यानी शुक्लयजुर्वेद नवीन तयार केला म्हणजे काय केले, याची यथार्थ कल्पना सामान्य जनतेला नाही महाराष्ट्र जनता तरी या बाबतीत सपूर्ण अज्ञानात व अधकारात चाचपडत आहे याज्ञवल्क्यानी प्राचीन वैदिक वाङ्मयात काही तरी नवीन वाङ्मयसृष्टि निर्माण केली का आणखी काय केले, हे नक्की कळल्याशिवाय त्याच खरें वैशिष्ट्य व योग्यता याचे मनात यथार्थ प्रतिबिंब उमटणे हे सहसा शक्य नाही. त्याची खरी योग्यता व श्रेष्ठत्व अजमावयाचे झाल्यास त्याचा शुक्लयजुर्वेद व त्याबरोबरच शतपथ ब्राह्मण या दोन्ही अमर कलाकृतीचे सपूर्ण

गुणी जनांना जगापुढें येण्यास कोठेंहि व केव्हांहि कांहीं कालावधि लागतोच. मधून मधून त्यांच्या कामांत अडथळे हे उत्पन्न होतात आणि मत्सरी लोक नाहीं तसल्या अफवा पसरवून त्याची टिंगल व टवाळी करूं लागतात ! अर्थात गुणी जनाच्या सत्त्वाची ही एक प्रकारची परीक्षाच असते. यातून तावून सुलाखून जो बाहेर पडेल त्याचें यश मग चंद्राप्रमाणें वाढीस लागते, असा इतिहासाचा अनुभव असून याज्ञवल्क्यहि त्याला अपवाद नव्हते. तथापि त्यांची बुद्धिमत्ता व कर्तृत्वशक्ति अचाट व अफाट असल्यामुळे त्यांचा जम बसावयास फार अवधि लागला नाही. रोज त्यांच्या आश्रमांत धार्मिक विषयावर व तत्त्वज्ञानावर व्याख्यान व चर्चा होत असल्यामुळे जिज्ञासु श्रोतृवृंदाची तेथें चिकार गर्दी जमूं लागली. त्यामुळें थोड्याच कालावधीत त्यांची छाप चांगली बसत चालली आणि त्यांचा लौकिक देशभर चन्दनाप्रमाणे पसरत चालला. त्यांच्या सभोंवती जमलेल्या प्रभावळीत कण्व, माध्यंदिन, जाबाल इत्यादि शिष्यगण विशेष उल्लेखनीय आहेत. भगवान बुद्धाचा लौकिक व मान वाढविण्यास त्याचे शिष्य मोग्गलायन व सारीपुत्र हे जसे कारणीभूत झाले, तद्वत याज्ञवल्क्याचें विभूतित्व व नांवलौकिक वाढविण्यास कण्व व माध्यंदिन हे शिष्यद्वयच मुख्यांशानें कारणीभूत झाले होते.

शुक्ल यजुर्वेदाचा महिमा व प्रभाव दिवसेंदिवस लोकांच्या निदर्शनास येत जाऊन त्या वेदाला आता व्यवस्थित, सुटसुटीत व एकसूत्री संहितेचें रूप देऊन, त्याची शाश्वत उभारणी करण्याची अगदीं निकडीची वेळ येऊन ठेपली. सूर्यनारायणाच्या कृपेनें लाभलेल्या दिव्य स्फूर्तीनें व सरस्वतीच्या

मगल वरप्रसादाने त्यानी तेव्हाच शुक्लयजुर्वेदाची घडी मनात ठसवून ठेविली होती तिला मूर्त स्वरूप देण्याच्या उद्योगास ते आता लागले. या कामी त्याना कण्व व माध्यदिन याची चागली मदत झाली

शुक्लयजुर्वेदाचे सहितीकरण करण्याच्या वेळी त्याच्या बुद्धीची ठेवण कशी होती याचा थोडासा कानोसा घेतला पाहिजे. त्यानी वैशपायनाच्या मागणीवरून त्याचा वेद टाकून दिला होता तथापि बुद्धीवर त्याचा उमटलेला सस्कार मात्र पुसला गेला नव्हता याज्ञवल्क्याची कृष्ण यजुर्वेदाची जाणीव पूर्ण बुजली नव्हती शिवाय त्याना ऋग्वेदाचेहि पूर्ण ज्ञान होत उद्दालकाजवळ राहून तत्वज्ञान व मनसिद्धी याच त्यानी पूर्ण शिक्षण घेतले होत हिरण्यनाभाजवळ राहून योगाभ्यासहि केलेला होता

त्यानी रोमहर्षणाकडून इतिहास व पुराणाचे ज्ञान सपादन केले या सर्वांचा उपयोग त्यानी शुक्ल यजुर्वेद तयार करताना करून घेतला अथर्ववेदाचा अभ्यासहि त्यानी केला होता

याज्ञवल्क्यानी शुक्लयजुर्वेद नवीन तयार केला म्हणजे काय केले, याची यथार्थ कल्पना सामान्य जनतेला नाहीं महाराष्ट्र जनता तरी या बाबतीत सपूर्ण अज्ञानात व अधकारात चाचपडत आहे याज्ञवल्क्यानी प्राचीन वैदिक वाङमयात काही तरी नवीन वाङमयसृष्टि निर्माण केली का आणखी काय केले, हे नक्की कळल्याशिवाय त्याचे खरे वैशिष्टच व योग्यता याचे मनात यथार्थ प्रतिबिब उमटणे हे सहसा शक्य नाही. त्याची खरी योग्यता व श्रेष्ठत्व अजमावयाचे झाल्यास त्याचा शुक्लयजुर्वेद व त्याबरोबरच शतपथ ब्राह्मण या दोन्ही अमर कलाकृतीचे सपूर्ण

गुणी जनांना जगापुढे येण्यास कोठेहि व केव्हाहि काही कालावधि लागतोच. मधून मधून त्यांच्या कामात अडथळे हे उत्पन्न होतात आणि मत्सरी लोक नाही तमल्या अफवा पसरवून त्यांची टिंगल व टवाळी करू लागतात ! अर्थात गुणी जनांच्या सत्त्वाची ही एक प्रकारची परीक्षाच असते यातून तावून सुलाखून जो बाहेर पडेल त्याचे यश मग चंद्राप्रमाणे वाढीस लागते, असा इतिहासाचा अनुभव असून याज्ञवल्क्यहि त्याला अपवाद नव्हते तथापि त्यांची बुद्धिमत्ता व कर्तृत्वशक्ति अचाट व अफाट असल्यामुळे त्यांचा जम बसावयास फार अवधि लागला नाही रोज त्यांच्या आश्रमात धार्मिक विषयावर व तत्त्वज्ञानावर व्याख्यान व चर्चा होत असल्यामुळे जिज्ञासु श्रोतृवृंदाची तेथे चिकार गर्दी जमू लागली त्यामुळे थोडयाच कालावधीत त्यांची छाप चांगली बसत चालली आणि त्यांचा लौकिक देशभर चन्दनाप्रमाणे पसरत चालला त्यांच्या सभोवती जमलेल्या प्रभावळीत कण्व, माध्यंदिन, जाबाल इत्यादि शिष्यगण विशेष उल्लेखनीय आहेत भगवान बुद्धाचा लौकिक व मान वाढविण्यास त्यांचे शिष्य मोग्गलायन व सारीपुत्र हे जसे कारणीभूत झाले, तद्वत याज्ञवल्क्याचे विभूतितत्व व नावलौकिक वाढविण्यास कण्व व माध्यंदिन हे शिष्यद्वयच मुख्याशाने कारणीभूत झाले होते.

शुक्ल यजुर्वेदाचा महिमा व प्रभाव दिवसेदिवस लोकांच्या निदर्शनास येत जाऊन त्या वेदाला आता व्यवस्थित, सुटसुटीत व एकसूत्री संहितेचे रूप देऊन, त्याची शाश्वत उभारणी करण्याची अगदी निकडीची वेळ येऊन ठेपली. सूर्यनारायणाच्या कृपेने लाभलेल्या दिव्य स्फूर्तीने व सरस्वतीच्या

नगल वरप्रसादाने त्यानी तेव्हाच शुक्लयजुर्वेदाची घडी मनात नसवून ठेविली होती तिला मूर्त स्वरूप देण्याच्या उद्योगास ते आता लागले. या कामी त्याना कण्व व माध्यंदिन याची चागली मदत झाली

शुक्लयजुर्वेदाचे संहितीकरण करण्याच्या वेळी त्याच्या बुद्धीची ठेवण कशी होती याचा थोडासा कानोसा घेतला पाहिजे त्यानी वैशंपायनाच्या मागणीवरून त्याचा वेद टाकून दिला होता तथापि बुद्धीवर त्याचा उमटलेला संस्कार मात्र पुसला गेला नव्हता याज्ञवल्क्याची कृष्ण यजुर्वेदाची जाणीव पूर्ण बुजली नव्हती शिवाय त्याना ऋग्वेदाचेहि पूर्ण ज्ञान होते उद्दालकाजवळ राहून तत्त्वज्ञान व मंत्रसिद्धी याचे त्यानी पूर्ण शिक्षण घेतले होते हिरण्यनाभाजवळ राहून योगाभ्यासहि केलेला होता

त्यानी रोमहर्षणाकडून इतिहास व पुराणाचे ज्ञान संपादन केले या सर्वाचा उपयोग त्यानी शुक्ल यजुर्वेद तयार करताना करून घेतला अथर्ववेदाचा अभ्यासहि त्यानी केला होता

याज्ञवल्क्यानी शुक्लयजुर्वेद नवीन तयार केला म्हणजे काय केले, याची यथार्थ कल्पना सामान्य जनतेला नाही महाराष्ट्र जनता तरी या बाबतीत संपूर्ण अज्ञानात व अधकारात चाचपडत आहे याज्ञवल्क्यानी प्राचीन वैदिक वाङमयात काही तरी नवीन वाङमयसृष्टि निर्माण केली का आणखी काय केले, हे नक्की कळल्याशिवाय त्याचे खरे वैशिष्ट्य व योग्यता याचे मनात यथार्थ प्रतिबिंब उमटणे हे सहसा शक्य नाही. त्याची खरी योग्यता व श्रेष्ठत्व अजमावयाचे झाल्यास त्याचा शुक्लयजुर्वेद व त्याबरोबरच शतपथ ब्राह्मण या दोन्ही अमर कलाकृतीचे संपूर्ण

गुणी जनाना जगापुढे येण्यास कोठेंहि व केव्हाहि काही कालावधि लागतोच मधून मधून त्यांच्या कामात अडथळे हे उत्पन्न होतात आणि मत्सरी लोक नाही तमल्या अफवा पसरवून त्याची टिंगल व टवाळी करू लागतात ! अर्थात गुणी जनाच्या सत्त्वाची ही एक प्रकारची परीक्षाच असते यातून तावून सुलाखून जो बाहेर पडेल त्याचे यश मग चद्राप्रमाणे वाढीस लागते, असा इतिहासाचा अनुभव असून याज्ञवल्क्यहि त्याला अपवाद नव्हते तथापि त्याची बुद्धिमत्ता व कर्तृत्वशक्ति अचाट व अफाट असल्यामुळें त्याचा जम बसावयास फार अवधि लागला नाही रोज त्याच्या आश्रमात धार्मिक विषयावर व तत्त्वज्ञानावर व्याख्यान व चर्चा होत असल्यामुळे जिज्ञासु श्रोतुवृदाची तेथ चिकार गर्दी जमू लागली त्यामुळें थोडयाच कालावधीत त्याची छाप चागली बसत चालली आणि त्याचा लौकिक देशभर चन्दनाप्रमाणे पसरत चालला त्याचा सभोवती जमलेल्या प्रभावळीत कण्व, माध्यदिन, जाबाल इत्यादि शिष्यगण विशेष उल्लेखनीय आहत भगवान बुद्धाचा लौकिक व मान वाढविण्यास त्याचे शिष्य मोग्गलायन व सारीपुत्र हे जसे कारणीभूत झाले, तद्वत याज्ञवल्क्याचे विभूतित्व व नावलौकिक वाढविण्यास कण्व व माध्यदिन हे शिष्यद्वयच मुख्याशाने कारणीभूत झाले होते

शुक्ल यजुर्वेदाचा महिमा व प्रभाव दिवसेंदिवस लोकांच्या निदर्शनास येत जाऊन त्या वेदाला आता व्यवस्थित, सुटसुटीत व एकसूत्री संहितेचे रूप देऊन, त्याची शाश्वत उभारणी करण्याची अगदी निकडीची वेळ येऊन ठेपली सूर्यनारायणाच्या कृपेने लाभलेल्या दिव्य स्फूर्तीने व सरस्वतीच्या

मगल वरप्रसादाने त्यानी तेव्हाच शुक्लयजुर्वेदाची घडी मनात चमवून ठेविली होती तिला मूर्त स्वरूप देण्याच्या उद्योगास ते आता लागले. या कामी त्याना कण्व व माध्यदिन याची चागली मदत झाली

शुक्लयजुर्वेदाचे सहितीकरण करण्याच्या वेळी त्याच्या बुद्धीची ठेवण कशी होती याचा थोडासा कानोसा घेतला पाहिजे त्यानी वैशपायनाच्या मागणीवरून त्याचा वेद टाकून दिला होता तथापि बुद्धीवर त्याचा उमटलेला सस्कार मात्र पुसला गेला नव्हता याज्ञवल्क्याची कृष्ण यजुर्वेदाची जाणीव पूर्ण बुजली नव्हती शिवाय त्याना ऋग्वेदाचेहि पूर्ण ज्ञान होत उद्दालकाजवळ राहून तत्त्वज्ञान व मनसिद्धी याचे त्यानी पूर्ण शिक्षण घेतले होत हिरण्यनाभाजवळ राहून योगाभ्यासहि केलेला होता

त्यानी रोमहर्षणाकडून इतिहास व पुराणाचे ज्ञान सपादन केले या सर्वांचा उपयोग त्यानी शुक्ल यजुर्वेद तयार करताना करुन घेतला अथर्ववेदाचा अभ्यासहि त्यानी केला होता

याज्ञवल्क्यानी शुक्लयजुर्वेद नवीन तयार केला म्हणजे काय केले, याची यथार्थ कल्पना सामान्य जनतेला नाहीं महाराष्ट्र जनता तरी या बाबतीत सपूर्ण अज्ञानात व अधकारात चाचपडत आहे याज्ञवल्क्यानी प्राचीन वैदिक वाङमयात काही तरी नवीन वाङमयसृष्टि निर्माण केली वा आणखी काय केले, हे नक्की कळल्याशिवाय त्याचे खरे वैशिष्ट्य व योग्यता याचे मनात यथार्थ प्रतिबिंब उमटणे हे सहसा शक्य नाही. त्याची खरी योग्यता व श्रेष्ठत्व अजमावयाचे झाल्यास त्याचा शुक्लयजुर्वेद व त्याबरोबरच शतपथ ब्राह्मण या दोन्ही अमर कलाकृतीचे सपूर्ण

ज्ञान व्हावयास पाहिजे, त्याशिवाय याज्ञवल्क्याचे वैशिष्टय ओळखू येणार नाही

याज्ञवल्क्यानी नवा यजुर्वेद कसा तयार केला, हे समजण्यासाठी प्रथम मूळ यजुर्वेद कसा होता याचे ज्ञान असणे जरूर आहे म्हणजेच शुक्ल यजुर्वेदाची उभारणी कशी करण्यात आली याची यथार्थ कल्पना येण्यासाठी याज्ञवल्क्याची अपार विद्वत्ता, चातुर्य, प्रतिभा, विशाल कल्पकता, विलक्षण योजकता आणि अलौकिक ज्ञानसामर्थ्य इत्यादि अष्टावध्यानी लोकोत्तर दैवी संपत्तीचा विचार करणे जरूर आहे याज्ञवल्क्यानी शुक्लयजुर्वेद जो तयार केला तो काही नव्यानेच डोक्यातून स्वतंत्र असा काढला नाही त्यावेळी विद्यमान असलेल्या कृष्णयजुर्वेदाच्या मूळ मांडणीत व क्रमातच आमूलाग्र फरक करून, त्याचप्रमाणे त्यातील मंत्रात, स्वरात व पठणातहि आपल्या मनाजोगती मुरड देऊन, त्याची रचना केली केवळ कृष्णयजुर्वेदावरच अवलंबून न राहता त्याच्या जोडीला ऋग्वेद व अथर्ववेद यांचेहि भरपूर सहाय्य त्यानी घेतले शिवाय स्वतंत्र असे काही मंत्रहि त्यात समाविष्ट करण्यात आले सारांश, कृष्णयजुर्वेदाचे स्वरूप सर्वस्वी बदलून, शुक्लयजुर्वेदाला सुंदर व बाळसेदार असे नवीन सुटसुटीत रूप देण्यात त्यानी आपली अलोट विद्वत्ता व प्रतिभा खर्ची घातली आहे शिवाय त्याचे शतपथातील अप्रतिम व अतुल ज्ञानभांडार विद्वानाना आश्चर्यचकित करीत आहे कृष्णयजुर्वेद व शुक्लयजुर्वेद यांचे येथ थोडक्यात साम्य व विरोध दाखवून व इतर काही महत्त्वाची माहिती देऊन शुक्लयजुर्वेदाची उभारणी कशी करण्यात आली, याची थोडक्यात ओळख पुढे करून देण्यात येणार आहे,

कृष्णयजुर्वेद असावा तसा व्यवस्थित नाही. त्याची रचना ओबडधोबड असून माडणी गुतागुतीची व अस्वाभाविक अशी आहे. तेथे मत्र व ब्राह्मण याची सरभेसळ झाली असल्यामुळे विषयमाडणीला अवश्य असणारा सुसगतपणा व सुटसुटीतपणा याचा त्याच्यात अभाव दिसून येतो. मत्रभाग स्पष्ट व सुगम नाही. विषयाची भेसळ झाल्याने त्याची रचना क्लिष्ट व बोजड झाली आहे. त्याचप्रमाणे विषय प्रतिपादनातहि सलगपणा व स्वाभाविकपणा दिसून येत नाही. या सर्व गोष्टी याज्ञवल्क्याच्या पूर्ण नजरेत भरल्यामुळे त्यातील सर्व गोंधळ, अव्यवस्थितपणा, अस्वाभाविकपणा व विसंगतपणा मोठ्या चातुर्याने त्यानी काढून टाकला आहे शुक्लयजुर्वेदाच्या उभारणीत सकृतदर्शनीच मत्रभाग व ब्राह्मणभाग असे दोन स्वतत्र व पृथक् पृथक् भाग पाडून, त्या त्या भागात त्या त्या विषयाचीच माडणी करून, तो तो विषय समजण्यास सुबोध व सुलभ करून ठेविला आहे प्रत्येक विषय सुव्यवस्थित, सुसगत, व सलग माडून शुक्लयजुर्वेद ऋग्वेदाप्रमाणे व्यवस्थित करण्यात आला आहे. शुक्लयजुर्वेदाची उभारणी करताना कृष्णयजुर्वेदाचे अस्वाभाविक व अशास्त्रीय रूप सबध बदलून टाकून त्यास अभिनव, रेखीव, सरळ व सहजसुंदर असे एकसूत्रीपणाचे गोडस रूप दिले आहे



# कृष्ण व शुक्ल यजुर्वेदांतील साम्य-विरोध

## योजनेंत फरक

कृष्णयजुर्वेदाची ग्रंथयोजना कांड, प्रपाठक, अनुवाद व मंत्र अशा पद्धतीची असून, शुक्ल यजुर्वेदाची अध्याय व मंत्र अशी आहे. ऋग्वेदाची मांडणी अष्टक, अध्याय, सूक्त व ऋचा किंवा मंडल, सूक्त व ऋचा अशी द्विविध आहे. तिन्हीं वेदांची रचना स्वतंत्र व वैशिष्ट्यपूर्ण आहे असें दिसतें. कृष्णयजुर्वेदाच्या रचनेचा थोडक्यांत तपशील असाः—

**कृष्णयजुर्वेदाची योजना**

| कांड | प्रपाठक | अनुवाक | मंत्र | ब्राह्मण | मिश्र |
|---|---|---|---|---|---|
| १ लें | ८ | १४६ | ११४ | २३ | ९ |
| २ रें | ६ | ७५ | ११ | ६४ | ० |
| ३ रें | ५ | ५६ | १८ | १९ | १९ |
| ४ थें | ७ | ८२ | ८२ | ० | ० |
| ५ वें | ७ | १११ | ४४ | ६८ | ७ |
| ६ वें | ६ | ६६ | ० | ६६ | ० |
| ७ वें | ५ | १०७ | ५२ | ५५ | ० |
| ७ | ४४ | ६५१ | ३२१ | २९५ | ३५ |

वरील कोष्टकावरून कृष्णयजुर्वेदाचे ७ कांड, ४४ प्रपाठक, ६५१ अनुवाक, ३२१ मंत्र, २९५ ब्राह्मण आणि ३५ मंत्र व ब्राह्मण, असें मिश्र अनुवाक अशी एकंदर ग्रंथरचना आहे.

शुक्ल यजुर्वेदाची योजना आहे ती अशी. त्याचे एकंदर चाळीस अध्याय असून मंत्रसंख्या १९७५ आहे. तिचा तपशील –

शुक्ल यजुर्वेदाची योजना

| अध्याय | मंत्र | अध्याय | मंत्र | अध्याय | मंत्र | अध्याय | मंत्र |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ३१ | ११ | ८३ | २१ | ६१ | ३१ | २२ |
| २ | ३४ | १२ | ११७ | २२ | ३४ | ३२ | १६ |
| ३ | ६३ | १३ | ५८ | २३ | ६५ | ३३ | ९७ |
| ४ | ३७ | १४ | ३१ | २४ | ४० | ३४ | ५८ |
| ५ | ४३ | १५ | ६५ | २५ | ४७ | ३५ | २२ |
| ६ | ३७ | १६ | ६६ | २६ | २६ | ३६ | २४ |
| ७ | ४८ | १७ | ९९ | २७ | ४५ | ३७ | २१ |
| ८ | ६३ | १८ | ७७ | २८ | ४६ | ३८ | २८ |
| ९ | ४० | १९ | ९५ | २९ | ६० | ३९ | १३ |
| १० | ३४ | २० | ९० | ३० | २२ | ४० | १७ |
| १० | ४३० | १० | ७८१ | १० | ४४६ | १० | ३१८ |



## क्रमांत फरक

### कृष्ण व शुक्ल यजुर्वेदाची ठेवण

दोनहि संहितांत निरनिराळ्या वेदविहित कर्मांकरिता मंत्र सांगितले आहेत. त्या कर्मांच्या क्रमांत देखील फरक आहे तो थोडक्यांत पुढें दर्शविला आहे.

| कृष्ण | | शुक्ल | |
|---|---|---|---|
| | विषय संहितास्थान | | विषय संहितास्थान |
| १ | पुरोडाशीय १-१-१ ते १-१-१४ | १ | दर्शपौर्णिमास १-१-३१ ते |
| २ | अध्वर १-२-१ ते १-३-१४ | | २-१-२८ |
| ३ | ग्रह १-४-१ ते १-४-४२ | २ | पिंडपितृयज्ञ २-२९ ते ३४ |
| ४ | हवन १-४-४३ ते १-४-४६ | ३ | अग्न्याधेय ३-१ ते ८ |
| ५ | पुनराधेय १-५-१ ते १-५-४ | ४ | उपस्थान ३-९ ते ४३ |
| ६ | अग्नि-उपस्थान १-५-५ ते | ५ | चातुर्मास्य ३-४४ ते ६२ |
| | १-५-११ | ६ | अग्निष्टोम ४-१ ते ३७ |
| ७ | ऐष्टिक याजमान १-६-१ ते | | ,, ५-१ ते ४३ |
| | १-६-६ | | ,, ६-१ ते ३७ |
| ८ | ऐष्टिक याजमान विधि १-६-७ | | ,, ७-१ ते ४८ |
| | ते १-७-६ | | ,, ८-१ ते ३२ |
| ९ | वाजपेय १-७-७ ते १-७-१३ | ७ | वाजपेय ९-१ ते ३४ |
| १० | राजसूय १-८-१ ते १-८-२२ | ८ | राजसूय ९-३५-४० |
| ११ | काम्यपशु २-१-१ ते २-१-११ | | ,, १०-१ ते ३० |
| १२ | काम्य इष्टय: २-२-१ ते २-४-१४ | ९ | अग्निचयन ११-१ ते ८३ |
| | | | ,, १२-१ ते ११७ |
| १३ | दर्शब्राह्मण २-५-१ ते २-५-४ | | ,, १३-१ ते ५८ |
| | ब्रा २-६-१ ते २-६-६ | | ,, १४-१ ते ३१ |
| १४ | दर्श हौत्र २-५-५ ते २-५-१२ | | ,, १५-१ ते ६५ |
| १५ | द्रव्य हौत्र २-६-७ ते २-६-१२ | | ,, १६-१ ते ६६ |
| १६ | ओपानुवाक ३-१-१ ते ३-५-११ | | ,, १७-१ ते ९९ |
| १७ | अग्नि ४-१-१ ते ४-६-५ | १० | वसोर्धारा १८-१ ते २९ |
| | ४-७-१ ते ४-७-१५ | ११ | सौत्रामणि १९-१ ते ९५ |
| | ५-१-२ ते ५-६-१० | | ,, २०-१ ते ९० |
| | ५-७-१ ते ५-७-१० | | ,, २१-१ ते ६१ |

| | | | |
|---|---|---|---|
| १८ | अश्वमेघ ४–६–६ ते ४–६–९ | १२ | अश्वमेघ २२–१ ते ३४ |
| | ५–६–११ ते ५–६–२३ | | ,, २३–१ ते ६५ |
| | ५–७–११ ते ५–७–२६ | | ,, २४–१ ते ४० |
| | ७–२–११ ते ७–२–२० | | ,, २५–१ ते ४७ |
| | ७–३–११ ते ७–३–२० | १३ | खिल अध्याय २६ ते |
| | ७–४–१२ ते ७–४–२२ | | व ४० पर्यंत खिलसंज्ञक मंत्र. |
| | ७–५–११ ते ७–५–२५ | | |
| १९ | अध्वर विधि ६–१–१ ते ७–१–२० | | |
| २० | सत्रायण ७–२–१ ते ७–२–१० | | |
| | ७–३–१ ते ७–३–१० | | |
| | ७–४–१ ते ७–४–११ | | |
| | ७–५–१ ते ७–५–१० | | |

ही अशी कृष्ण व शुक्ल यजुर्वेदाची ठेवण आहे.



## माडणींत फरक

**कृष्णयजुर्वेदाची मांडणी**

इषे त्वोर्जे त्वा वायवः स्थोपायव स्थ देवो व सविता प्रार्पयतु श्रेष्ठतमाय कर्मण आ प्यायध्वमघ्निया देवभागमूर्जस्वती पयस्वती प्रजावतीरनमीवा अयक्ष्मा मा व स्तेन ईशत माऽघश्ँ सो रुद्रस्य हेति परि वो वृणक्तु ध्रुवा अस्मिन्गोपतौ स्यात बव्हीर्यजमानस्य पशून्पाहि ॥ १–१–१ ॥

शुन्धध्व दैव्याय कर्मणे देवयज्यायै मातरिश्वनो घर्मोऽसि द्यौरसि पृथिव्यसि विश्वधाया असि परमेण धाम्ना दृहस्व माव्हार्वसूना पवित्रमसि सहस्रधारँ हुतः स्तोको हुतो द्रप्सोऽग्नये बृहते नाकाय स्वाहा द्यावापृथिवीभ्याँ सा विश्वायुः सा विश्वव्यचा सा विश्वकर्मा सं पृच्यध्वमृतावरी रूर्मिणीर्मधुमत्तमा मन्द्रा धनस्य सातये सोमेन त्वा ऽ ऽ तनच्मीन्द्राय दधि विष्णो हव्य रक्षस्व ॥ १–१–३ ॥

**शुक्ल यजुर्वेदाची मांडणी**

इषे त्वोर्जत्वा वायव स्थ देवो वः सविता प्रार्पयतु श्रेष्ठतमाय कर्मणऽआप्यायध्वमघ्न्याइन्द्राय भागं प्रजावतीरनमीवाऽ अयक्ष्मा मा व स्तेनऽईशत माघशँ सो ध्रुवाऽअस्मिन् गोपतौ स्यात बव्हीर्यजमानस्य पशून्पाहि ॥ १–१ ॥

वसोः पवित्रमसि द्यौरसि पृथिव्यसि मातरिश्वनो धर्मोऽसि विश्वधाऽअसि दृँहस्व मा व्हार्मा ते यज्ञपतिर्व्हार्षीत् ॥ १–२ ॥

सा विश्वायु. सा विश्वकर्मा सा विश्वधाया. । इन्द्रस्य त्वा भागँ सोमेनातनच्मि विष्णो हव्य रक्ष ॥ १–४ ॥

प्रत्युष्टँ रक्षः प्रत्युष्टाऽ-अरातयो निष्टप्तँ रक्षो निष्टप्ताऽ अरातयः । उर्वन्तरिक्षमन्वेमि ॥ १-७ ॥

धूरसि धूर्व धूर्वन्त धूर्व तं योऽअस्मान्धूर्वति तं धूर्व य वय

कर्मणे वां देवेभ्यः शकेयं वेषायत्वा प्रत्युष्टं रक्षः प्रत्युष्टा अरातयो धूरसि धूर्व धूर्वन्तं धूर्वन्तं योऽस्मान्धूर्वति तं धूर्वयं वय धूर्वामस्त्व देवानामसि सस्नितमं पप्रितमं जुष्टतमं वन्हितमं देवतमम्अह्रुतमसि हविर्धानं दृंहस्व मा मेर्मा सं विक्था मा त्वा ॥ १ ॥ हिंसिषमुरु वाताय देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्या-मग्नये जुष्टं निर्वपाम्यग्नीषो-माभ्यम् ।

धूर्वामः। देवानामसि वन्हितमं सस्नितमं पप्रितमं जुष्टतमं देवहूतमम् ॥ १-८ ॥

अह्रुतमसि हविर्धानं दृंहस्व मा व्हार्मा ते यज्ञपतिर्व्हार्षीत् । विष्णुस्त्वा क्रमतामुरु वाताया-पहतंरक्षो यच्छन्तांपञ्च॥१-९॥

देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्याम्। अग्नये जुष्टं गृण्हाम्यग्नीषो-माभ्यां जुष्टं गृण्हामि॥१-१०॥

येथें कृष्णयजुर्वेदाचे म्हणजे तैत्तिरीय संहितेचे पहिले ३ अनुवाद दिले असून त्यातील मंत्राची मांडणी शुक्ल यजुर्वेदांत कशी करण्यांत आली आहे हें समजण्यासाठी शुक्ल यजुर्वेदाचे प्रारंभीचे कांहीं मंत्र दिले आहेत. चौथ्या एकच अनुवाकांतून कांही मजकूर घेऊन थोडा फार बदल करून शुक्ल यजुर्वेदाचे पहिल्या अध्यायांतील ८-९-१० हे मंत्र तयार झाले आहेत हें चाणाक्ष वाचकांच्या तेव्हांच नजरेंत येणार आहे. असा विषय प्रतिपादनांचा बदल पुष्कळशा मंत्रांतून झालेला आढळतो.

## मत्रांत फरक

नुसत्या माडणीच नव्हे परतु कित्येक मत्रातदेखील बदल झालेला आढळतो त्याविषयी कल्पना पुढील मत्रावरून कळून येईल

बदल असलेले मत्र

| कृष्ण | शुक्ल |
| --- | --- |
| इषे त्वोर्जे त्वा वायव स्थोपायव स्थ देवो व सविता प्रार्पयतु श्रेष्ठतमाय कर्मण आ प्यायध्वमघ्निया देवभागमूर्ज- स्वती पयस्वती प्रजावतीर- नमीवा अयक्ष्मा मा व स्तेन ईशत माऽघश॑ सो रुद्रस्य हेति परि वो वृणक्तु घ्रुवा अस्मि- न्गोपतौ स्यात वह्वीर्यजमानस्य- पशून्पाहि ॥ १–१–१– ॥ | इषे त्वोर्जे त्वा वायवस्थ देवो व सविता प्रार्पयतु श्रेष्ठतमाय कर्मणऽआप्यायध्वमघ्न्याऽइन्द्राय भाग प्रजावतीरनमीवाऽअयक्ष्मा मा वस्तेनऽईशत माघश॑सो ध्रुवाऽ अस्मिन् गोपतौ स्यात वह्वीर्यजमानस्य पशून्पाहि ॥ १–१ ॥ |
| मनो ज्योतिर्जुपतामाज्य विच्छिन्न यज्ञ॑समिम दधातु बृहस्पतिस्तनुतामिम नो विश्वे देवा इह मादयन्ताम्॥१–६–३॥ | मनो जूतिर्जुपतामाज्यस्य बृहस्पतिर्यज्ञमिम तनोत्वरिष्ट यज्ञ॑ समिम दधातु विश्वे देवासऽइह मादयन्तामोऽम्प्रतिष्ठ २–१३ |
| देहि मे ददामि ते नि मे धेहि नि ते दधे निहारमिनि मे हरा निहारम् (१) नि हरामि ते ॥१–८–४ ॥ | देहि मे ददामि ते नि मे धेहि नि ते दधे । निहार च हरासि मे निहार निहराणि ते॥३–५०॥ |

अग्ने गृहपते सुगृहपतिरह त्वया गृहपतिना भूयास॑ सुगृहपतिर्मया त्व गृहपतिना भूया शत॑ हिमास्तामाशिष्मा शासे तन्तवे ज्योतिष्मतीम्॥१–६-६॥

अग्ने गृहपते सुगृहपतिस्त्वयाऽग्नेऽहं गृहपतिना भूयास॑ सुगृहपतिस्त्वं मयाऽग्ने गृहपतिना भूया । अस्थूरि णौ गार्हपत्यानि सन्तु शतं हिमाः सूर्यस्यावृतमन्वावर्ते ॥ २–२७ ॥

मंत्र–सादृश्य

काही मंत्र तसेचे तसे दोन्ही वेदात आढळतात. उदाहरणार्थ .–

कृष्ण

नमो मित्रस्य वरुणस्य चक्षसे महो देवाय तदृत॑ सपर्यत दूरेदृशे देवजाताय केतवे दिवस्पुत्राय सूर्याय श॑सत॥१–२–९॥

गर्भो अस्योषधीना गर्भो वनस्पतीनाम् । गर्भो विश्वस्य भूतस्याग्ने गर्भो अपामसि ॥ ४–२–३ ॥

अन्नपतेऽन्नस्य नो ह्यनमीवस्य शुष्मिण. । प्र प्रदातार तारिष

शुक्ल

नमो मित्रस्य वरुणस्य चक्षसे महो देवाय तदृत॑ सपर्यत । दूरेदृशे देवजाताय केतवे दिवस्पुत्राय सूर्याय श॑सत ॥ ४–३५ ॥

गर्भोऽ अस्योषधीना गर्भो वनस्पतीनाम् । गर्भो विश्वस्य भूतस्याग्ने गर्भोऽअपामसि ॥ १२–३० ॥

| | |
|---|---|
| ऊर्जं नो धेहि द्विपदे चतुष्पदे ॥ ४-३-१ ॥ | अन्नपतेऽन्नस्य नो देह्यन-मीवस्य शुष्मिण । प्र-प्र दातारं तारिषऽ ऊर्जं नो धेहि द्विपदे चतुष्पदे ॥ ११-८३ ॥ |
| हिरण्यगर्भ समवर्तताग्रे भूतस्य जात पतिरेक आसीत्। स दाधार पृथिवीं द्याम् (३) उतेमां कस्मैदेवाय हविषा विधेम ॥ ४-१-८ ॥ | हिरण्यगर्भ समवर्तताग्रे भूतस्य जात पतिरेकऽआसीत् । स दाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ॥१३-४॥ |
| अय ते योनिर्ऋत्वियो यतो जातो अरोचथाः । त जानन्नग्न आ रोहाथा नो वर्धया रयिम् ॥ ४-७-१३ ॥ | अय ते योनि ऋत्वियो यतो जातोऽअरोचथा । त जानन्न-ग्नआरोहाथा नो वर्धया रयिम् ॥ १५-५६ ॥ |

## पठणांत फरक

| कृष्ण | शुक्ल |
|---|---|
| इषे त्वोर्जे त्वा वायवस्थ व | इखे त्वोर्जे त्वा वायवस्थ व- |
| सहस्रशीर्षा पुरुष | सहस्रशीरिखा पुरुखा |
| त्र्यम्बकं यजामहे | त्र्यम्बक जजामहे |
| ओषधे त्रायस्व स्वधिते | ओखधे त्रायस्व स्वधिते |
| धियो यो न. प्रचोदयात् | धियो जो न प्रचोदयात् |
| यज्ञेन यज्ञमयजन्त देवाः | जज्ञेन जज्ञमयजत देवाः |

### ऋग्वेदाशीं संबंध

यानंतर ऋग्वेदाकडे वळून त्याचा संबध शुक्ल यजुर्वेदात किती व कसा आला आहे हे पाहूं. खुद्द ऋग्वेदात १०४७२ मंत्र असून त्याला जोडून असलेल्या वालखिल्यात ८० मंत्र आहेत. दोन्ही मिळून ऋग्वेदाची मंत्रसंख्या एकंदर १०५५२

भरते. आणि यजुर्वेदाची मंत्रसंख्या जवळ जवळ दोन हजार अगदी नक्की म्हणजे १९७५ भरते. त्यांत ऋग्वेदांतील मंत्र कोठें थोड्याफार फरकाने व कोठे जशाचे तसे मिळून एकंदरींत ६१५ आढळतात. एक गोष्ट सांगतां येईल ती अशी की; शुक्ल यजुर्वेदाचा घाट ऋग्वेदाच्या वळणावर अधिक झुकलेला आहे. ऋग्वेद, शुक्लयजुर्वेद व अथर्ववेद यांचे संहितास्वरुप जवळ जवळ सारख्याच वळणाचें आहे असें म्हटल्यास त्यात काही वावगें होणार नाही. असो, ऋग्वेद व शुक्ल यजुर्वेद यांच्या मंत्रांत कोठें व कसा फरक आहे हे दोन्ही वेदाचे तीन मंत्र नमुन्याकरता येथें उद्धृत करून दाखविले आहे.

### मंत्रात फरक

| ऋग्वेद | शुक्ल यजुर्वेद |
|---|---|
| महस्रशीर्षा पुरुष. सहस्राक्षः सहस्रपात् । स भूमिं विश्वतो वृत्वाऽत्यतिष्ठद्दशाङ्गुलम् ॥ १०-९०-१ ॥ | सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् । स भूमिं सर्वतः स्पृत्वात्यतिष्ठद्दशाङ्गुलम् ॥ ३१, १ ॥ |
| ये अग्निदग्धा ये अनग्निदग्धा मध्ये दिवः स्वधया मादयन्ते । तेभिः स्वराळसुनीतिमेतां यथावशं तन्वं कल्पयस्व ॥ १०-१५-१४ ॥ | ये अग्निष्वात्ता येऽअनग्निष्वात्ता मध्ये दिवः स्वधया मादयन्ते । तेभ्यः स्वराडसुनीतिमेतां यथावशं तन्वं कल्पयाति ॥ १९, ६०, ॥ |
| मा नस्तोके तनये मा न आयौ मा नो गोषु मानो अश्वेषु रीरिषः वीरान्मा नो रुद्र भामितो वधीर्हविष्मन्तः सदमित्त्वा हवामहे ॥ २-११४-८ ॥ | मानस्तोके तनये मा नऽआयुषि मा नो गोषु मा नोऽअश्वेषु रीरिषः । मा नो वीरान् रुद्र भामिनो वधीर्हविष्मन्तः सदमित्त्वा हवामहे ॥ १६, १६ ॥ |

## अथर्ववेदाशी संबध

अथर्ववेदात एकदर ५९८७ मत्र असून, त्यापैकी फक्त चाळीस वेचाळीसच मत्र काय ते शुक्ल यजुर्वेदात आढळतात. आणि त्यापैकी बहुतेक मत्र मुळात कमीअधिक फरक करून या वेदात घेतले आहेत. वाचकास त्याची थोडीशी कल्पना यावी म्हणून काही मंत्र येथे उध्दृत केले आहेत.

## मंत्रात फरक

| अथर्व वेद | शुक्ल यजुर्वेद |
|---|---|
| स वर्चसा पयसा सं तनूभिरगन्महि मनसा स शिवेन । त्वष्टा नो अत्र वरीयः कृणोत्वनु नो मार्ष्टु तन्वोऽ यद् विरिष्टम् ॥ ६–५३–३ ॥ | स वर्चसा पयसा सं तनूभिरगन्महि मनसा सं शिवेन। त्वष्टा सुदत्रो विदधातु रायोऽनुमार्ष्टु तन्वो यद्विलिष्टम् ॥ ८–१६ ॥ |
| यदा वध्नन् दाक्षायणा हिरण्य शतानीकाय सुमनस्यमाना. । तत् ते वध्नाम्यायुषे वर्चसे वलाय दीर्घायुत्वाय शतशारदाय ॥ १–३५–१ ॥ | यदा वध्नन्दाक्षायणा हिरण्यऽ शतानीकाय सुमनस्यमाना. । तन्म आ वध्नामि शतशारदायायुष्माञ्जरदृष्टिर्यथासम् ॥ ३४–५२ ॥ |
| नैनं रक्षांसि न पिशाचाः सहन्ते देवानामोजः प्रथमज ह्येऽतत् । यो बिभर्ति दाक्षायणं हिरण्य स जीवेषु कृणुतेदीर्घमायुः ॥ १–३५–२ ॥ | न तद्रक्षांसि न पिशाचा स्तरन्ति देवानामोज. प्रथमजं ह्येतत् । यो बिभर्ति दाक्षायणं हिरण्यं स देवेषु कृणुते दीर्घमायु स मनुष्येषु कृणुते दीर्घमायुः ॥ ३४–५१ ॥ |
| द्रुपदादिव मुमुचानः स्विन्नः स्नात्वा मलादिव । पूतं पवित्रेणैवाज्यं विश्वे शुम्भन्तु मैनसः ॥ ६–११५–३ ॥ | द्रुपदादिव मुमुचानः स्विन्नः स्नातो मलादिव । पूतं पवित्रेणेवाज्यमाप. शुन्धन्तु मैनसः ॥ २०–२० ॥ |

## मंत्रसाम्य

**अथर्ववेद**

ब्रह्म जज्ञान प्रथम पुरस्तात् वि सीमत सुरुचो वेन आव । स वुघ्न्या उपमा अस्य विष्ठा सतश्च योनिमसतश्च वि व ॥ ४–१–१ ॥

स्वर्यन्तो नापेक्षन्त आ द्या रोहन्ति रोदसी । यज्ञ ये विश्वतोधार सुविद्वासो वितेनिरे ॥ ४–१४–४ ॥

इदमाप प्रवहतावद्य च मल च यत् । यच्चाभिदुद्रोहानृत यच्च शेपे अभीरुणम् ॥ ७–८९–३ ॥

**शुक्ल यजुर्वेद**

ब्रह्मजज्ञान प्रथम पुरस्ताद्वि सीमत सुरुचो वेन आव । स वुघ्न्या उपमा अस्य विष्ठाः सतश्च योनिमसतश्च विवः ॥ १३–३ ॥

स्वर्यन्तो नापेक्षन्तऽआद्या रोहन्ति रोदसी।यज्ञ ये विश्वतो धार सुविद्वासो वितेनिरे ॥ १७–६८ ॥

इदमाप प्रवहतावद्यच मल च यत् । यच्चाभिदुद्रोहानृत यच्च शेपेऽअभीरुणम् ॥६–१७॥

याप्रमाणे यजुर्वेदाची स्वतन, सुबद्ध च, सुसगत माडणी असून त्याचा तोंडवळा इतर वेदाहून कांहीसा निराळा पण वैशिष्ट्यपूर्ण आहे, हे वाचकाच्या ध्यानात येण्यास अडचण पडणार नाही असो



# पुळी धरली

जनक राजाच्या वडिलांच्या यज्ञांत याज्ञवल्क्यांनी आपल्या नवीन शुक्लयजुर्वेदाची व प्रयोग कौशल्याची जी थोडीशी चमक दाखविली, तेव्हांपासून जनतेचे लक्ष त्याच्याकडे जास्त वेधले. लोकांत त्यांचा लौकिक वाढत चालला. शहाणे लोक त्यांचें कौतुक करूं लागलें. नवीन वेद असलातरी तो प्रभावी आहे, असा तज्ञांचा ग्रह होत चालला. अर्थात याज्ञवल्क्यांच्या कर्तृत्वावर लोकांची श्रद्धा बसून ते या सुधारक आचार्याकडे प्रेमादरानें पाहूं लागले.

तशात जनक राजाची तर श्रद्धा व भक्ति त्यांच्यावर विशेषच बसली. यज्ञांतील त्यांचें कर्मकौशल्य पाहून मनांत फारच कौतुक वाटलें व आनंदहि झाला. या यज्ञाचा परिणाम पुढे असा झाला कीं, जनकांचा तेव्हांपासून याज्ञवल्क्यांशीं संबंध व स्नेहभाव वाढीस लागला. कधी कधी ते स्वतः याज्ञवल्क्यांच्या आश्रमाकडे येत, तर कधी कधी त्यांना आपल्या राजवाड्यावर बोलावून घेत. जसजसा त्यांचा या उदयोन्मुख ब्राह्मणश्रेष्ठाशीं घरोबा दृढ होत चालला व त्याच्याशीं वादचर्चा वाढत गेली, तसतसे; याज्ञवल्क्यांची अगाध विद्वत्ता, वेदविद्येवरील प्रभुत्व, यज्ञविषयक खोल व सूक्ष्म माहिती, कर्मकौशल्य, वाक्चातुर्य, विषयप्रतिपादन शैली, दैवतज्ञान इत्यादि अनेक अलौकिक गुण पाहून, जनक राजे खरोखर आश्चर्यानें चकित झाले ! हे जनक म्हणजे कांहीं हौसी व चैनी राजे नव्हतें. ते मोठे विद्यासंपन्न व विद्याव्यासंगी तसेच कर्मनिष्ठ व

ज्ञानप्रिय, राजकारणपटु व प्रजाहित दक्ष असे महान भाग्यशाली राजे होते. तत्वज्ञानात त्याचा अधिकार फारच मोठा होता. अशा नृपतिश्रेष्ठाच्या प्रेमादरभावास ते पात्र ठरले, या पुरती याज्ञवल्क्याच्या योग्यतेची दुसरी साक्ष पाहिजे कशाला ?

एकदा असे झाले की याज्ञवल्क्य नेहमीप्रमाणे जनकाच्या भेटीस म्हणून राजवाड्यात सहज गेले होते. तेव्हा तेथे संभाषणाच्या ओघात अग्निहोत्रासंबंधी प्रश्न निघून जनकानी त्यास प्रश्न केला 'याज्ञवल्क्यजी ! आपण अग्निहोत्र जाणता काय ?'

याज्ञवल्क्य – होय राजा ! मी ते जाणतो

जनक – मग ते काय आहे ? अर्थात त्याचे हवन द्रव्य कोणते ?

याज्ञवल्क्य – सामान्यत दूध हे त्याचे हवन आहे.

जनक – दूध नसेल तर ? दुसरे काही आहे काय ?

याज्ञवल्क्य – होय, जनका ! दुसरे हविर्द्रव्यहि आहे.

जनक – मग ते काय आहे ?

याज्ञवल्क्य – दुधाच्या अभावी भात, नाही तर यव, ही हविर्द्रव्ये घ्यावीत

जनक – भात नि यव नसतील तर ?

याज्ञवल्क्य – मग अरण्यातील औषधि.

जनक – त्याही नसतील तर ?

याज्ञवल्क्य – मग उदक

जनक – तेंहि नसल्यास ?

याज्ञवल्क्य – मग जगात हवन करण्यासारखे असे काहीच राहिले नाही

जनक—मग कसे ? अग्निहोत्र बंद पाडावे की, काय ?

याज्ञवल्क्य—नाही, राजा ! नाही तसे करता येणार नाही हवन करण्यास काहीच जर मिळाले नाही, तर अखेर श्रद्धेमध्ये सत्याचे हवन करावे म्हणजे झाले

जनक (हसून) बरोबर, याज्ञवल्क्यजी ! आपण खरोखर अग्निहोत्र काय हे जाणता तुमच्या ज्ञानाबद्दल मी तुम्हाला शंभर गाई देत आहे (श प ११, ३, १, २, ३)

जनकाना अग्निहोत्र माहीत नव्हते असे नव्हे तर याज्ञवल्क्याच्या ज्ञानाची खोली त्याना अजमावयाची होती या दिवसापासून जनकानी शुक्लयजुर्वेदाचा उघड उघड स्वीकार करून, राजवाड्यात त्या वेद प्रक्रियाना आश्रय दिला ! व त्या वेदाचे ते पुरस्कर्ते झाले ।।

आतापर्यंत शुक्लयजुर्वेदाला राजाश्रय मिळाला नव्हता तो आता मिळून त्याला राजमान्यतेचा एक नवा अंकुर फुटला ! याज्ञवल्क्याचे चाहते म्हणजे जनकाचे प्रधान ' मित्र हे अगोदरच शुक्लयजुर्वेदाचे अनुयायी बनले होते आणि आता जनक राजानेहि त्या वेदाचा स्वीकार केला ही बातमी मिथिलेत दिनेदिन पसरत जाऊन जनताहि त्याला आश्रय देऊ लागली या सर्वांचा असा परिणाम झाला की मिथिलेत वाजसनेयाना मानाचे स्थान प्राप्त झाले !

अशा संधीस जनक राजानी गंगातीरी एक अश्वमेध यज्ञ करण्याचे ठरवून त्यात याज्ञवल्क्याना अध्वर्यूंची मानाची जागा दिली याज्ञवल्क्यानी तो महायज्ञ शुक्लयजुर्वेदाप्रमाणे अथपासून इतिपर्यंत यथासांग पुरा करून दाखविला व शुक्लयजुर्वेदाचा महिमा व आपले मंत्रसामर्थ्य आणि कर्मनैपुण्य जगास पटवून

दिले. त्याची ही कर्तबगारी पाहून जनक भारीच संतोषले व त्याचा यथोचित मानसन्मानहि केला. या यज्ञाची हकीकत ब्रह्मपुराणात थोडक्यात आढळते ती अशी :– 'अश्वमेधादिक कर्म चकार जनको नृपः । याजयामास विप्रेन्द्रो याज्ञवल्क्यश्च तं नृपम् ॥ २१ ॥ गंगातीरं समाश्रित्य यज्ञान्मुक्तिमवापराट् ॥२२॥ (ब्रह्म. पु. अ. ८८, २१ व २२ श्लोक ) 'जनकराजाने अश्वमेध यज्ञ केला. तो विद्वत्श्रेष्ठ याज्ञवल्क्याच्या पुरोहित्वाने गंगातीरावर पार पाडला. यज्ञामुळे राजा मुक्ति पावला.'



# राजा जनमेजय व वाजसनेय याज्ञवल्क्य

याज्ञवल्क्याचा कीर्तिपरिमळ पसरता पसरता तो आता थेट हस्तिनापुरात जनमेजयाच्या राजवाड्यात जाऊन थडकला त्याची अगाध विद्वत्ता, सुप्रिय राजाच्या मंदिरात घडलेला तो अद्भुत मंत्रप्रभाव, वैशंपायनांनी परत मागितल्याबरोबर तत्काल केलेला यजुर्वेदत्याग, अरण्यात जाऊन केलेली कडक तपश्चर्या, सूर्याकडून मिळविलेला वरप्रसाद, नवीन वेदाची आखणी व उभारणी, जनकराजाच्या यज्ञात दाखविलेले अपूर्व कर्मकौशल्य इत्यादि एकापेक्षा एक अद्भुत गोष्टी राजाच्या कानावर अधून मधून येत जाऊन, दिवसेंदिवस त्याचा ग्रह याज्ञवल्क्याविषयी अनुकूल बनत चालला तशात जनक राजाच्या यज्ञापासून तर त्याच्या विद्वत्तेची, कौशल्याची, व पौरुषाची सर्वत्र वाखाणणी होऊन, त्याच्याविषयीचा प्रेमादरभाव जनतेत वाढीस लागला जनमेजय हे गुणीजनांचे चाहते असल्यामुळ याज्ञवल्क्यांना जवळ करण्याची त्यांना बुद्धि झाली असल्यास त्यात नवल नाही

पूर्वी कथन केलेला सर्पसत्राचा अपुरा राहिलेला थोडासा वृत्तांत येथे देणे योग्य होईल जनमेजयाने सर्पसत्राचा मोठ्या ईर्षेने व धूमधडाक्यात प्रारंभ केला होताच, तो जोराने चालवून त्यात असंख्य नागांचा स्वाहाकार केला आता पूर्णाहुतीचा दिवस उजाडला पाळी खुद्द तक्षकाच्या आहुतीची होती पूर्णाहुतीची वेळ आली मात्र तेवढ्यात एक चमत्कार झाला ऐनवेळी तक्षक

नाहीसा झाला. आपल्या बचावासाठी तो इन्द्राजवळ गेला होता त्याच्या नावाचा स्वाहाकार उच्चारण्याचाच काय तो अवकाश, त्यास यज्ञमंडपात येणे भाग होते कारण मंत्राचा प्रभावच तसा दांडगा होता ! पुरोहित त्याच्या नावाचा स्वाहाकार उच्चारतात न उच्चारतात तो इतक्यात आस्तिक मुनि तेथें अचानक उपस्थित झाले आणि त्यानी ते सत्र थांबवून तक्षकास जीवदान देण्याविषयी त्यानी राजापाशी मोठ्या काकुळतेने विनति केली

आस्तिक मुनीची ती विनति ऐकून राजा विचारात पडला एकदम त्यास 'होय,' 'नाही' म्हणवेना. काय उत्तर द्यावे याविषयी त्यास काही सुचेना म्हणून त्याने तेथील ब्राह्मणाचा सल्ला विचारला ही गोष्ट आयतीच आस्तिकाच्या पथ्यावर पडली या संधीचा फायदा घेऊन त्यानी तेथील काही ब्राह्मणांची भेट घेतली आणि त्यास आपणाकडे वळवून घेतले. त्याचा परिणाम असा झाला की, अखेर त्या ब्राह्मणानी आस्तिकाची विनति मान्य करण्याचा सल्ला दिला त्याप्रमाणे राजाने तो सल्ला मान्य करून ते सत्र तेवढ्यावरच थांबविले व सत्राची परिसमाप्ति करण्यात आली अर्थात ज्याचेसाठी एवढा खटाटोप करून ते सत्र चालविण्यात आले होते, तो तक्षक मात्र त्या संकटातून सहिसलामत सुटला ! ( आदीपर्व अ. ५६ )

काही दिवसानी राजाच्या कानावर अशी गुणगुण येऊ लागली की, ते सर्पसत्र थांबविणेचा सल्ला देण्यात ब्राह्मणाचा काहीतरी स्वार्थ होता. प्रथम ही गोष्ट त्यास खरी वाटेना पण आपल्या बापाच्या—म्हणजे परीक्षिताच्या—बाबतीतहि असाच काहीसा प्रकार घडून आला होता. हा विचार त्याच्या डोळ्या-

पुढे येऊ लागताच त्याची मनस्थिति हळुहळू साशंक बनत चालली परिक्षित सात दिवसात सर्पदंशाने मरण पावणार, ही वातमी त्यावेळी एका काश्यप नावाच्या ब्राह्मणास कळल्यावरून तो आपल्या मन्त्रविद्येच्या जोरावर राजाचे प्राण वाचवून त्याच्याकडून खूप संपत्ति उकळावी, या हेतूने राजाकडे यावयास निघाला असता तक्षकाने त्यास मधेच गाठून, तो मागेल तितके द्रव्य त्यास देऊन त्याला परत लावून दिले होते ( आदिपर्व ४३ ) ही गोष्ट जनमेजयास आधीच कळून चुकली होती तो विचार आता जागृत होऊन येथेहि तसा प्रकार झाला नसेल कशावरून असा संशय येऊन तो बेचैन झाला दिवसेंदिवस राजाचे मन अधिकाधिकच संशयग्रस्त होऊ लागले आणि त्या मानाने जुन्या ब्राह्मणावरील त्याची श्रद्धा व भक्ति ढासळत जाऊन, तेथे अविश्वास व औदासिन्य याची दाट छाया पसरत चालली अर्थात ही झळहि थोड्याबहुत प्रमाणात त्याचे पुरोहित वैशंपायनासहि लागल्याशिवाय राहिली नाही

जनमेजय याप्रमाणे मनातून उदास व विषण्ण बनला असता जनकाच्या यज्ञातील हकीगत त्याच्या कानावर आली व तेथे याज्ञवल्क्यानी दाखविलेले कर्मकौशल्य व दक्षिणेच्या बाबतीतील तेजस्वीपणा ऐकून राजाची याज्ञवल्क्यावर श्रद्धा जडली व त्यास आमंत्रण पाठवून आपल्या घरी आदराने बोलावून घेतले

याज्ञवल्क्य राजाचे आमंत्रणावरून मिथिलेहून हस्तिनापुरास आले. याज्ञवल्क्याचे दर्शन होताच राजाच्या मनात त्याच्या विषयीचा आदरभाव अधिक उचंबळून आला केवढी शांत व तेजस्वी त्याची ती मूर्ति ! याज्ञवल्क्याची शरीरकांति व मुखसौंदर्य होतेच

तसे आकर्षक शांत व प्रसन्न मुद्रा, उच्च नि विशाल भाल, तेजस्वी व टपोरे डोळे, सरळ नाक, भरीव गाल, शुभ्र दंत, आणि मुखावर विलसणारे दिव्य ब्रह्मवर्चस्व तेज, तशांत तेजस्वी आकृतीला अलौकिक विद्येची, दिव्य मन प्रभावाची, आणि अपूर्व कर्मकौशल्याची सुंदर व स्वर्गीय जोड मिळाल्यामुळें गुणग्राहक जनमेजयाचें गुणी व उदार मन तेथें आकर्षित झाले.

या भेटीचा परिणाम असा झाला की, पुढे याज्ञवल्क्याचा सहवास जसजसा होत व वाढत गेला, तसतसा वैशंपायन यांच्या विषयीचा आदरभाव ढांसळत चालला जनक राजाच्या यज्ञात पदरी अपयश आले असूनहि वैशंपायनांनी दाखविलेला स्वार्थी व संकुचितपणा जनमेजयाच्या मनास बिलकूल आवडला नाही सुप्रिय राजाच्या घरी त्याने देऊ केलेली गजांत लक्ष्मी स्वाभिमानाभ डिवचल्यामुळें झिडकारून देणारे मानी याज्ञवल्क्य कोणीकडे आणि यज्ञसमारंभात अपयश आले तरी दक्षिणेसाठी डोक्यात राख घालून नमताहट्ट व त्रागा करणारे वैशंपायन कोणीकडे? गुरूची आज्ञा स्वतः कष्ट सोसून तडीस नेण्यास हिरीरीनें पुढें येणारे गुरुभक्तिपरायण आज्ञाधारक याज्ञवल्क्य कोणीकडे आणि रागाच्या भरात भलताच ग्रह करून घेऊन, दिलेली विद्या परत मागून क्षुद्रबुद्धीचें प्रदर्शन करणारे वैशंपायन कोणीकडे? दोघेहि ऋषितुल्य महापुरुषच खरे पण उभयतांच्या अंतरंगात केवढा फरक! अशा प्रकारचे तुलनात्मक विचार जनमेजयाच्या मनात अधून मधून येऊन सर्पसत्रातील अपयशाचा दोष त्यावेळच्या दरबारातील ब्राह्मणावर–विशेषत वैशंपायनावर–दिवसेंदिवस वळावत जाऊन, राजाचे मन एका परीने त्याच्याविषयी उदासीन बनत चालले

जनमेजय राजे व याज्ञवल्क्य या दोघामध्यें प्रेमादराचें निकट नाते वाढीस लागले. हे दृश्य वैशंपायनास मुळीच आवडले नाही, अजून राजपुरोहिताचे नाते त्यांचे राजवाड्यात कायम होतेच. त्यांचा

फायदा घेऊन व संधि साधून त्यांनी याज्ञवल्क्याशी संबंध ठेवणे हे बरे नाही, असे एकदोन वेळा सांगून पाहिले पण जनमेजयांनी तिकडे कानाडोळाच केला वैशंपायनाचे मन अधीर व बेचैन होत चालले पुन एकदा राजाला गाठून त्याची चांगली कानउघाडणी करावी या हेतून त्यांनी एकांतात राजाची भेट घेतली 'याज्ञवल्क्याला जवळ करणे म्हणजे लोकांत गैरसमज पसरविणे आहे, सनातन धर्माशी द्रोह करणे आहे व आपल्या उज्वल परंपरेला खीळ घालून धर्मात ढवळाढवळ करणे आहे ही गोष्ट राजकर्त्यास हिताची नाही लोकांच्या धर्मसमजुतींना डिवचले म्हणजे जनताक्षोभ कोणत्या थरास जाईल, याचा नेम सांगवत नाही ' असे म्हणून राजाच्या हितासाठीच आपण ही भेट घेतली असे त्यांना चक्क सांगून पाहिले

जनमेजय राजे मोठे सूज्ञ व मोठे धोरणी होते वैशंपायनाचा कावा त्यांनी चटदिशी ओळखला वैशंपायनाविषयी त्यांच्या मनात जे घोळत होते, तेच आता त्यांना प्रत्यक्ष अनुभवास आले. याज्ञवल्क्याचा दिलदार स्वभाव व या राजपुरोहिताची असहिष्णुवृत्ति या दोहोंचे चित्र त्यांच्यापुढें चक्क उभें राहिले याज्ञवल्क्याविषयी मान त्यांचा आदर-भाव आता अधिकच वाढला

पुढे त्यांनी काही दिवसानंतर एक पौर्णिमास यज्ञ आरंभून त्यात वैशंपायनास न बोलावता, याज्ञवल्क्यास बोलावले ही बातमी वैशंपायनास समजताच स्वारीचे पित्त खवळले ! रागाने लाल होऊन पाय आपटीतच ते यज्ञमंडपात आले आणि तो यज्ञसमारंभ पाहून राजास व याज्ञवल्क्यास अद्वातद्वा बोलून व शिव्याशाप देऊन, स्वारी तणतणतच तेथून निघून गेली ! ( वायु ९९, २५०–२५३ ) जनमेजय राजास हा प्रकार कसासाच वाटला नि तेव्हापासून पुढे त्यांनी त्या राजपुरोहिताचा नाद अजिबात सोडून दिला

# वृक्ष फोफावत चालला

जनमेजय राजे मनाचे मोठे थोर, स्वभावाने अत्यंत उदार, बुद्धिमान व सदाचरणी असून, शिवाय राजधर्माला शोभणारे शौर्य, धैर्य, पराक्रम इत्यादि गुणात ते सर्वांत वरचढ होते आपल्या पित्याला कपटाने मारणाऱ्या तक्षकाचा सूड घेण्यासाठी व सर्पजातीचा निःपात करण्यासाठी म्हणून सर्पसत्र आरंभून त्यात सर्पजातीचा धुव्वा त्यानी उडवून दिला होता शेजारच्या सर्व राजावरहि त्यानी मोठा दरारा बसविला असून त्यावेळी ते राज-राजेश्वर सार्वभौम सम्राट झाले होते याचा परिणाम असा झाला की, पुढें लवकरच त्यानी याज्ञवल्क्याचे कर्मकौशल्य व अगाध विद्वत्ता पाहून अत्यंत तुष्ट होऊन ते त्याचे पूर्ण अनुयायी व कैवारी बनले व त्यानी उघड उघड शुक्ल यजुर्वेदाचा स्वीकार व पुरस्कार केला।

अद्यापपर्यंत या नववेदाला थोर थोर आचार्यांकडून व राजे लोकांकडून मिळावी तशी मान्यता मिळाली नव्हती पण प्रत्यक्ष जनमेजय राजेच शुक्लयजुर्वेदाचे कैवारी व अभिमानी झाल्यावर मग त्या वेदाला नाव ठेवण्याचे धारिष्ट कोण कर-णार ? वैशंपायनानी मात्र या वेदामबधी कुत्सित बुद्धीने नाही नाही तीं किटाळें उपस्थित करून आकाशपाताळ एक केलें पण दुर्दैवाने ती सगळी विरली जाऊन अखेर योगीश्वराचा शुक्ल यजुर्वेद राजमान्यहि व लोकमान्यहि झाला तो झालाच।

याचा परिणाम म्हणजे मोठमोठ्यायज्ञप्रसंगी याज्ञवल्क्यास

अध्वर्यूंचे प्रतिष्ठित स्थान मिळू लागले व त्याचा शुक्लयजुर्वेद सूर्याप्रमाणे चमकू लागला जिकडे तिकडे राजदरबारात राजवाड्यात, व समाजात वाजसनेयाचा प्रवेश होऊन, तेथ त्याना मानमान्यता मिळू लागली ! जनमेजयानी खुद्द आपल्या मुलाला म्हणजे शतानीकाला शुक्ल यजुर्वेद पढवण्यास योगीश्वराच्या आश्रमात नेऊन ठेविले

याप्रमाणे त्यानी पुढें अनेक मोठमोठ्या यज्ञात अध्वर्यूंचे काम करून, ते सर्व यशस्वी करून दाखविले गोदावरी तीरावर पुण्यस्तभ क्षेत्रात एक मोठा यज्ञ झाला. त्यात याज्ञवल्क्यानीच अध्वर्यूची जागा मंडित केली होती पुढें नर्मदातीरावर मित्रविंद गावात तसाच एक मोठा यज्ञ झाला तोहि त्याच्या दिग्दर्शनानच झाला याप्रमाणे अनेक ठिकाणी अनेक यज्ञात प्रमुख भाग घेऊन ते सर्व लहान मोठे यज्ञ पूर्ण यशस्वी करून दाखविले (आन्हिक सूत्रावलि पृष्ठ ३८५ ) त्याच्या यज्ञकौशल्याची कीर्ति जगभर पसरून जो तो आता शुक्लयजुर्वेदाची महति वर्णन व कौतुक मुक्तकठाने करू लागला, याचा स्वाभाविक परिणाम असा झाला की, वैशंपायनाच्या यजुर्वेदाला कृष्णपक्षाची कळा येत चालली आणि त्याबरोबरच याज्ञवल्क्याच्या यजुर्वेदाला शुक्लपक्षाची कांति सुलू लागली चद्र निस्तेज पडत चालला व सूर्य झळकू लागला ! कालाय तस्मै नम हेच तत्त्व येथेंहि खरे ठरले.



# सत्यानृताची अदलाबदल

अशाच एका यज्ञप्रसंगी याज्ञवल्क्यांनी एक बोधप्रद गोष्ट सांगितली, ती अशी – देव व असुर हे प्रजापतीचे मुलगे असल्यामुळे त्याच्या जिंदगीचे म्हणजे वाणीचे वारस झाले सत्य व अनृत यांच्या मिश्रणाने वाणी झाली असल्यामुळे प्रथम देव व असुर दोघेहि खरे खोटे बोलत असत निर्भेळ असत्य असे दोघांच्या ठिकाणीहि नव्हते म्हणजे ते प्रसंगी खरेहि बोलत व प्रसंगी खोटेहि बोलत म्हणून ते दोघेहि सारखेच होते

तथापि देवांचा ओढा सत्याकडे अधिक असे असुरांची गोष्ट याच्या अगदी उलट होती. पुढें पुढें दिवस जसजसे जात चालले, जसतसा देवांना असत्याचा तिटकारा येऊ लागला व त्यांनी असत्य टाकून देऊन संपूर्ण सत्याचीच काम धरली असुरांनी याच्या उलट वर्तन केले त्यांना सत्याचा कंटाळा आला आणि म्हणून त्याचा त्याग करून संपूर्ण असत्याचीच बाजू त्यांनी धरली याचा परिणाम पुढं असा झाला की, असुरांमध्यें जें सत्य होतें, त्यानं विचार केला की, असुरांनी आपणास अजिरात टाकून दिलें असून देव मात्र सर्वस्वी सत्यास चिकटून आहेत. ज्या अर्थी देवाकडे निर्भेळ सत्यच आहे तेव्हा आपणहि तिकडेच जावे हे बरे असे म्हणून, असुराकडे जं सत्य होतें, ते त्यांना सोडून देवास जाऊन मिळाले ।

आता देवाकडे जें असत्य होते, त्यानें असा विचार केला की, 'असुरांनी सत्याचा त्याग करून ते असत्यालाच पूर्ण चिकटून

आहेत शिवाय देवानी आमचा त्याग केल्यामुळे, तेथ आता अधिक राहण्यात स्वारस्य नसून, असुराजवळ जाऊन राहणे यातच मौज आहे ! ' यामुळ देवाकडील असत्य त्याना सोडून असुराकड येऊन राहिले.

एकदरीत देवाकडे ज राहिले त पूर्ण सत्यच राहिले अर्थात् देव सत्यच बोलू व आचरु लागले व असुर ह असत्यच बोलू व आचरू लागले ! तेव्हापासून देव हे सत्य व असुर हे असत्य असे म्हणण्याचा परिपाठ पडला ( सत्य देवा अनृत असुरा ' श प )

आता याचा परिणाम असा झाला की, देव हे सत्यव्रत असल्यामुळ ते प्रथम क्षुद्र व दरिद्री असेच राहिले आणि म्हणून जो दक्ष राहून नेहमी सत्यच बोलतो, तो प्रथम क्षुद्र व दरीद्रीच राहतो, पण पुढें मात्र तो खात्रीने योग्यतेस चढून भरभराट पावतो देवहि पुढ मोठ्या योग्यतेस चढून तत्त्वाप्रमाणे अखेर भाग्यवान व सुखसपन्न झाले

आता असुराची गम्मत पहा त्यानी फक्त असत्याचीच बाजू उचलली तरीदेखील 'सुरवातीस त्याची चागली भरभराटहि झाली जे खोट बोलतात त्याचीहि प्रथम अशीच भरभराट होत असते पण शेवटी मात्र त्याचा अध पात हटकून होतो असुराचा शेवटी तसाच अध पातच झाला !

बोधार्थ हा की, जे देववृत्तीचे आहेत ते सर्व सत्यच बोलतात व जे असुरवृत्तीचे आहेत ते सर्व असत्यच बोलतात. ( श प ९-५-९ ते १६ )

# सम्राट जनमेजयांचा अश्वमेध यज्ञ

याज्ञवल्क्याचा आता मिथिलेत काय अगर हस्तिनापुरात काय जिकडे तिकडे गौरव व जयजयकार चालला असताना जनमेजय सम्राटांनी एक मोठा अश्वमेध यज्ञ करण्याचे योजून त्याप्रमाणे कामास सुरुवातहि केली अर्थात ही सर्व तयारी प्रत्यक्ष याज्ञवल्क्याच्या सल्ल्याने व त्याच्याच देखरेखीखाली करण्याचे ठरविण्यात आले, आणि पुढे थोड्याच अवधीत सर्व सिद्धता झाली लागलीच अश्वमेध जाहीर करण्यात आला या खेपेस राजपुरोहित वैशंपायन यास अजिबात वगळण्यात आले होते

अश्वमेध यज्ञ फक्त सार्वभौम राजालाच करता येतो, इतराना तो करता येत नाही राजा जेव्हा पृथ्वीपति असेल अथवा महाबलाढ्य असून शत्रूवर मोठा विजय संपादन करील,अशा वेळीच तो करावयाचा असतो हा यज्ञसमारंभ म्हणजे वैदिक लोकांची एक महापर्वणीच असते देशातील सर्व लहान थोर मांडलिक राजेरजवाडे, मोठमोठे सरदार–जहागिरदार, शेट–सावकार, शास्त्रीपंडित, पाठक–पुरोहित वगैरे सर्व प्रसिद्ध लोक या समारंभात हटकून उपस्थित असावयाचे शिवाय चांगले गवई, नामांकित कलावंत, कुशल कारागीर, जादूगार, कलावंत इत्यादि अनेक व्यवसायांच्या व अनेक प्रकारच्या लोकांची गर्दी यावेळी उसळलेली असते मग प्रेक्षकांचा व इतरेजनांचा केवढा प्रचंड लोंढा लोटत असेल, याची नुसती कल्पना केलेलीच बरी.

दुर्दैवाने हा प्रचंड राष्ट्रीय महोत्सव आज आपल्यातून अदृश्य झाल्यामुळें त्याच्या ऐश्वर्याची, वैभवाची व समारंभाची वाचकास यावी तशी कल्पना येणे शक्य नाही म्हणून प्रत्यक्ष जरी नसलीतरी निदान शब्दचित्र रेखाटून तरी त्याची अंशतः पण अचुक अशी ओळख करून द्यावी, या उद्देशाने त्याची आम्हीं थोडक्यात माहिती करून देत आहोत

वैदिक धर्मांत जशी देवोपासना आहे तशीच तेथें ऐहिक समाजकारण व राजकारण हेहि आहेत तो धर्म जागतिक व पारमार्थिक या दोनहि विषयावर नजर ठेवणारा असून यथा-प्रमाण त्या त्या विषयावर त्याचा विशेष भर व कटाक्ष असतो तो विश्वव्यापी व विश्वसंग्राहक धर्म असून त्याचा तेजस्वीपणा व अष्टावधानीपणा हे गुण अद्वितीय व अतुलनीय आहेत त्याची सर्व शक्ति व तेजस्वी वृत्ति एका यज्ञसंस्थेत केंद्रित झाली असून अश्वमेध हा त्यातला प्रमुख यज्ञ आहे या वैदिक धर्मातील यज्ञसंस्थेकडे बौद्ध अगर जैन यांच्या दूषित भावनेच्या दृष्टीने न पहाता, तेजस्वी वैदिक आर्यदृष्टीने पहाण्यास शिकले पाहिजे कारण असे की, बौद्ध किंवा जैन धर्म हे राजकारणी धर्म नव्हेत त्याना राजकारण नावडें आहे. ते संन्यासवृत्तीचे, शांत व सात्विक असे धर्म आहेत वैदिक धर्माची गोष्ट तशी नाहीं तो अष्टावधानी व अष्टपैलू असा परिपूर्ण धर्म आहे. त्यात प्रपंचहि आहे नि परमार्थहि आहे. त्यात समाजकारण,राजकारण, व्यक्तिगत विकास आणि सामाजिक धारणा ही सर्व आहेत. *व्यक्तीच्या, समाजाच्या व राष्ट्राच्या उत्कर्षाला व उद्धाराला* ज्या गोष्टींची, विचाराची व आचाराची अपेक्षा व आवश्यकता असते, त्या सर्वाची बीजभूत तत्त्वे या यज्ञसंस्थेत पूर्ण सामावलेली

आहेत, हे सूक्ष्मदृष्टीने व समतोल बुद्धीने त्याचा अभ्यास करणाऱ्या विचारवंताना तेव्हाच दिसून येईल आणि म्हणूनच 'यज्ञे सर्वम् प्रतिष्ठितम्' असे वैदिक ऋषीनी आव्हान दिले आहे ते सार्थच आहे याची प्रचीति पहावयाची असल्यास वाचकानी प्रस्तुत ग्रंथाच्या लेखकाचे याज्ञवल्क्य दर्शन ( शतपथ परिचय) हा ग्रंथ अवश्य पहावा

हा अश्वमेध वैदिक आर्यांचा इहलोकातील सर्वश्रेष्ठ धार्मिक समारंभ व राजकीय महोत्सव होय या महायज्ञात राष्ट्रातील सर्व वैभव, सर्व संपत्ति, सर्व सौन्दर्य, सर्व सामर्थ्य, सर्व कलाकौशल्य फार काय सर्व दर्शनीय व प्रेक्षणीय गोष्टी एकत्र पहावयास सापडतात वैदिक धर्माचे श्रेष्ठ व तेजस्वी स्वरुप प्रकट होते ते येथेच अर्थात हा अश्वमेध म्हणजे वैदिक लोकाच्या विद्वत्तेचे, सामर्थ्याचे व ऐश्वर्याचे एक मनोहर प्रदर्शनच होय असे म्हणता येईल 'राजा वा एष यज्ञाना यदश्वमेध' असे म्हटले आहे ते उगीच नव्हे. हा समारंभ थेकश चाळीस दिवस सतत चालू असतो

या अश्वमेध यज्ञाचा मुख्य मंडप मोठा विस्तीर्ण असून तो ध्वजपल्लवानी सुशोभित केलेला असतो हा मंडप अग्निष्टोम अगर सोमयज्ञ मंडपाच्या धर्तीवरच उभारलेला असून तो निरनिराळ्या प्राचीनशाळा, हविर्धान, आग्नीध्रीय व मार्जालीय अशा पाच लहान मोठ्या मंडपाचा मिळून अेक सलग झालेला असतो. प्राचीन शाळेत आहवनीय, गार्हपत्य व दक्षिणाग्नि या तीन श्रौताग्नीच्या तीन वेदी स्थापन केलेल्या असतात या प्राचीन शाळेच्या पूर्वेस सदोमंडप असून तेथे यज्ञपुरोहित व इतर विद्वान ब्राह्मण मंडळीस उठा बसावयाची व्यवस्था केलेली असते.

सचारार्थ सोडलेला घोडा यथेच्छ सचार करून वर्षाअखेर पुन स्वस्थानी परत आल्यावर अश्वमेधाच्या मुख्य अनुष्ठानास सुरवात होत हे अनुष्ठान सत्तावीस दिवस चालते सुत्याह दिवशी ह्या अश्वमेधातला मुख्य दिवस–राजा सुवर्णालकाराने शृगारलेल्या रथात उची व उत्तमोत्तम वस्त्रें परिधान करून शृगारलेल्या चार घोड्याच्या रथात चढून बसतो अश्वमेधीय घोडा सुवर्णालकाराने नखशिखात शृगारलेला असतो तो रथ मिरवीत पूर्वेस एका ठराविक अतरापर्यंत जाऊन पुन परत फिरतो

परत आल्यावर त्यास रथापासून मोकळे करण्यात येते नतर त्या अश्वमेध घोड्यास राजाच्या राण्यानी तुपाने चागले माखून व चोळून काढल्यावर त्यास प्रोक्षण करून, त्याचे पर्यग्निकरण करण्यात येत याचवेळी इतर पशूचेहि प्रोक्षण व पर्यग्निकरण विधि आटपून घेण्यात येतो पर्यग्निकरण झाल्यावर घोड्याचे सज्ञपन करण्याच्या ठिकाणी दर्भ पसरून त्यावर सुवर्णाचा पत्रा ठेवून त्यावर वस्त्र पसरतात आणि त्या वस्त्रावर घोड्यास आणून निजविण्यात येते घोड्याला मारण्याचे शस्त्र सोन्याचे, पर्यग पशूना मारण्याचे रुप्याचे व इतर पशूना मारण्याचे लोखडाचे असते

यज्ञमडपात हे सवनीय पशु बाधण्यासाठी एकवीस खाब पुरलेले असतात त्यापैकी मधल्या खाबाला अग्निष्ठ अशी सज्ञा आहे या अग्निष्ठ यूपास सतरा पशु बाधलेले असून बाकीच्या वीस यूपास प्रत्येकी सोळा सोळा याप्रमाणे एकदर तीनशे वीस पशूची योजना केलेली असते या सवनीय पशूमध्ये घोडा, बैल, बोकड, हरीण, कोल्हा, मुगूस, हस, बक, गरुड, चक्रवाक, तित्तिर, घुबड, बेडूक, साप, वाघ, सिह, सुसर,

मासे; कांसव इत्यादि नाना जातींचे, नाना तऱ्हेचें व नाना रंगाचे ग्राम्य व वन्य असें अनेक प्राणी असतात. या सर्व पशूंची संख्या एकंदरींत सहाशें नऊ भरते. अश्वमेधाच्या मुख्य म्हणजे मधल्या दिवशींच एकंदर ६०९ पशूंची योजना केली जाते. तथापि त्यांना संस्कार केल्यावर त्यांतील सारे वन्य व कांहीं ग्राम्य पशू व पक्षी सोडून दिले जातात. या यज्ञास फाल्गुन शुद्ध अष्टमीस सुरवात करतात. आणि शेवटच्या दिवशीं अवभृत स्नानाचा यादाचा समारंभ होऊन, यज्ञसमाप्ति होते. ( महीधर भाष्य ).

प्रथम अश्वमेधीय घोडा प्रजापति देवतांसाठीं मारण्यांत येतो. त्याच सुमारास इतर पशूहि मागेंपुढें निरनिराळया देवतांप्रित्यर्थ मारण्यांत येतात. फक्त या अश्वमेध यज्ञांतच ही एवढी पशुसंख्या आहे. इतर ठिकाणी अगदी वेताचीच असते. इतरवेळीं अधिकांत अधिक म्हणजे सतरा पशू असतात. आणि तेंहि सर्व बोकडच ( अज ) असतात. बुद्धवाङमयांत तिखटमीठ लावून जें यज्ञविषयक वर्णन करण्यांत आलें आहे तें खरें नाहीं. तें सर्वच अतिशयोक्तिनें व विपरीत भावनेनें भडक रंगांत सांगण्यांत आल्यामुळें तें वैदिक यज्ञाचें यथार्थ वर्णन नव्हें. फक्त त्यावेळी सामान्य जनतेचें यज्ञविषयक मन दूषित करून तत्संबंधीं घृणा उत्पन्न करण्याचा व बौद्धधर्माची नसत्ती प्रौढी व महति गाण्याचा तो एक स्वार्थी व दुष्ट कावा आहे.

हा अश्वमेध यज्ञ म्हणजे सर्व यज्ञांचा राजा आहे. ' राजा वा एष यज्ञानां यदश्वमेधः' असें शतपथांत म्हटलें आहे; तें अगदीं यथार्थ आहे. हा यज्ञसमारंभ एकूण एक वर्ष व चाळीस दिवस चालतो. यावरून या यज्ञाचें विशाल स्वरुप तेथील अनेक प्रकारचें

विधि, व अपरिमित यज्ञसाधने याची अधुक कल्पना करता येण्यासारखी आहे थोडक्यात म्हणजे तेथील तेजस्वी वृत्तीचे, अगाध कर्मोपासनेचे, विविध देवतोपासनेचे, अपार औदार्याचे, अद्भूत कल्पनाशक्तीचे, अपूर्व साहसाचे, सूक्ष्म सृष्टिज्ञानाचे, प्रभावी राजकारणाचे, अजिक्य राष्ट्रसामर्थ्याचे, अपार ऐश्वर्याचे, विविध कलाकौशल्याचे, सुदर प्रदर्शन डोळ्यापुढें उभे राहून वैदक आर्यांच्या लोकोत्तर कर्तबगारीबद्दल व पौरुषाबद्दल अभिजात हिंदू अत करणात क्षणभर तरी आश्चर्य,आनद व कौतुक याच्या मधुरलहरी उमटल्याशिवाय राहणार नाहीत अश्वमेधाचे हे जे एवढे लाबलचक विवेचन केलेले आहे, ते आधुनिक भारतीयाना प्रत्यक्ष जरी नाही, निदान शब्दचित्र रेखाटून तरी त्याना प्राचीन पूर्वजाच्या प्रभावी व तेजस्वी जागतिक व पारमार्थिक जीवनाविषयी अशत तरी कल्पना यावी म्हणून केले आहे

आता जाता जाता या यज्ञाची फलश्रुति सागून हा विषय हातावेगळा करतो. 'तरति सर्वपाप्मान, तरति ब्रह्महत्या यो अश्वमेधेन यजने' – जो अश्वमेध करतो, तो सगळी पातके तरून जातो एवढेंच नव्हे, तर ब्रह्महत्या दोषापासूनहि तो मुक्त होतो. व त्याच्या सर्व कामना पूर्ण होतात, असे श्रुतीत सागितले आहे. ( श प. १३-३-११ )



# वैशंपायनांचा कुत्सित डाव !

येवढा मोठा अश्वमेघ ! तो सम्राट जनमेजय करतात आणि राजपुरोहित वैशंपायनांना तेथें कोणीच विचारीत नाहीत हे आहे तरी काय ? शिष्य याज्ञवल्क्य तेथे सर्वाधिकारी आणि गुरु वैशंपायन म्हणजे कोणीच नव्हे ? केवढें हे धाडस ! आणि कोण हा याचा अपमान ! सार्वभौम जनमेजयाच्या अश्वमेधासारख्या सर्वश्रेष्ठ यज्ञात आपल्या प्रतिस्पर्ध्याला अध्वर्युत्वाचें श्रेष्ठ स्थान आणि आपल्याला अजीबात छाट केवढा हा जनमेजयाचा उद्दामपणा नि केवढें हे वैशंपायनांना लाछन !

वैशंपायन म्हणजे काही लहानसहान प्रस्थ नव्हते त्यांची पकड तत्कालीन ब्रह्मवृंदावर अत्यंत जबरदस्त होती हा यज्ञ होता होईतो हाणून पाडावा व याज्ञवल्क्याचे नाक ठेचून काढावे, असा मनात कुत्सित विचार करून त्या रोखाने त्यांचे कारस्थान आता गुप्त रीतीने चालू झाले राजसत्तेच्या जोरावर जें काही करता येण्यासारखें होतें त्याचा तेथें निरुपाय होता पदरी नालस्ती येण्याचा तो प्रसंग होता म्हणून वैशंपायनांनी शहाणपणाने निराळाच डाव टाकला यज्ञात पुरोहित लागतात, त्याशिवाय यज्ञच होऊ शकत नाही हे मर्मस्थान त्यांनी अचूक ओळखले व तेथे प्रहार करण्याचे ठरवून, त्याप्रमाणे त्यांनी ते स्वत राजपुरोहित असल्यामुळें त्यांचे वजन वाजसनेयाखेरीज इतर ब्राह्मणावर चांगले होते हस्तिनापुरातील व आसपासच्या प्रदेशातील ब्रह्मवृन्दाशी गुप्तरीतीने खलबतें करून ऐनवेळी या सर्व सनातनी

ब्राह्मणानी जनमेजयाच्या यज्ञावर कडकडीत बहिष्कार पुकारला. आणि अेका वाजसनेयाखेरीज इतर कोणत्याहि शाखेचे ब्राह्मण यज्ञास जाणार नाहीत अशी व्यवस्था केली आपला अपमान व अपराध करणाऱ्या या जनमेजय व याज्ञवल्क्य या उभयताना जवळ जवळ कायमचे वाळीतच टाकल्यासारखे त्यानी आता करुन सोडले

राजे जनमेजय व याज्ञवल्क्य झाले तरी तितकेच खंबीर व निश्चयी होते. आणि याज्ञवल्क्य म्हणजे तर प्रत्यक्ष मेरुचा अवतार.' ते अशा पुरोहिती धाकाला थोडेच भीक घालणार होते हस्तिनापुरातील ब्राह्मणानी ऐन वेळी दगा दिला म्हणून ते काही कचरले नाहीत की, डगमगले नाहीत हस्तिनापुरात व आसमंतातील प्रदेशात जसे वैशंपायनाचे वजन होते, तसेच त्याचेहि वजन काशी, कोसल व विदेह प्रातातील ब्राह्मणावर होते. शिवाय जनकराजे त्याचे परममित्र आणि जनमेजय हे तर त्याच्या पूर्ण वचनात होते त्यानी आपल्या शिष्य मडळीतूनच निरनिराळी यज्ञकर्माकरिता लागणारी ऋत्विज मडळी तयार केली, आणि इद्रोतदेवाप यांस आपल्या बाजूस वळवून घेऊन, त्याची होतृस्थानी नेमणूक केली थोड्याच अवधीत रात्रदिवस खपून यज्ञसमारभाची सर्व सिद्धता जय्यत तयार करुन ठेवली

यज्ञाचा मगल दिवस उजाडला, आणि यज्ञमडपाच्या महा-द्वारावर पहाटेस चौघडा मगल सुरात आलापू लागला. पुरोहित मडळी जमू लागली याज्ञवल्क्य इद्रोतदेवापास बरोबर घेऊन मडपात उपस्थित झाले अनेक राजराजेश्वर व जनमेजय महाराजहि मागोमाग आलेच सर्व तयारी सिद्ध झाली आणि यज्ञसमारभास मोठ्या उत्साहाने प्रारंभ झाला.' तसाच तो पुढे एक वर्ष आणि

चाळीस दिवस पर्यंत मोठ्या थाटानें, नेटानें व उत्साहानें चालून यशस्वी रीतीनें पूर्ण करण्यांत आला. याज्ञवल्क्यांनी तो पूर्ण करून दाखविला म्हणून जनमेजय राजे खुष झाले. वाजसनेयांच्या यशाची नौबत झडूं लागली. याज्ञवल्क्य विजयी झाले. आणि सम्राटांनीं त्यांचा मोठा गौरव केला.

आतां इंद्रोतदैवाप हा जनमेजयाच्या अश्वमेध यज्ञांत पुरोहित होता, याला आधार शतपथांत पुढीलप्रमाणे दिला आहे. 'एतेन हेन्द्रोतो दैवापः शौनकः। जनमेजयं पारिक्षित याजयाञ्चकार तेनेष्ट्वा सर्वां पापकृत्यां सर्वां ब्रह्महत्यामपजघात सर्वां ह वै पापकृत्यां सर्वां ब्रह्महत्यामपहन्ति योऽश्वमेधेन यजते। (१३-५-४-१) इंद्रोतदैवाप याने पारिक्षित जनमेजयाकडून अश्वमेध यज्ञ करविला. ह्या वचनाला महाभारतांतूनहि पुष्टि मिळते. भारतांत म्हटलें आहे कीं,– ' एवमुक्त्वा तु राजानमिन्द्रोतो जनमेजयम्। याजयामास विधिवद्वाजिमेधेन शौनकः ॥ ' (महाभारत, अ. १४९) या दोन वचनांवरून इंद्रोतदैवाप यानें जनमेजयांकडून अश्वमेध यज्ञ करविला हें निर्विवाद स्पष्ट होत आहे.

हा अश्वमेध यज्ञ सफल व यशस्वी झालेला पाहून जनमेजयाला फार आनंद झाला. वैशंपायनांच्या बहिष्काराला दाद न देतां, एकट्या याज्ञवल्क्यांनीं आपल्या जबाबदारीवर तो महायज्ञ आपल्या कर्मकौशल्यानें व अपूर्व बुद्धीचातुर्यानें पूर्ण यशस्वी करून दाखविला, हें पाहून जनता त्यांचें कौतुक करीत त्यांना धन्यवाद देऊं लागली. जनक राजालाहि या गोष्टीनें मोठा आनंद वाटला. हस्तिनापुर तर त्यांच्या जयजयकारानें व आनंदघोषानें सर्वत्र दुमदुमून गेलें होतेंच या अश्वमेधाचा समारंभ व्यवस्थित व यथासांग पार पडल्यामुळें आणखी एक तसाच यज्ञ करून

दाखविण्याची सम्राटाला इच्छा झाली आणि लवकरच पुन दुसरा यज्ञहि करण्याच जाहीर करण्यात आले.

या यज्ञातहि अध्वर्यवत्वाची माळ अर्थात् पुन याज्ञवल्क्याच्या गळ्यातच पडली पण या खेपेला इद्रोतदैवापाऐवजी तुरकावषेय हे होतृस्थानी होते याविषयी ऐतरेय ब्राह्मणात दाखला आढळतो तो असा 'एतेन ह वाऽऐद्रेण महाभिषेकेण तुर कावषेयो जनमेजय पारिक्षितमभिषिषेच तस्मादु जनमेजय पारिक्षित समत सर्वत पृथ्वी जयन्परियायाश्वमेध्येनेजे।' ( ऐ ब्रा ८ २१) या वचनावरुन पहाता जनमेजयानी एक अश्वमेध केला ही गोष्ट निखालस सिद्ध होत आहे वायु व मत्स्य पुराणातूनहि नि सशय यास पुष्टी मिळत आहे वायुपुराणातील 'परिक्षित्तनयश्चापि पौरवो जनमेजय । द्विरश्वमेघमाहृत्य ततो वाजसनेयकम् । प्रवर्तायित्वा तद्ब्रह्म निखर्वी जनमेजय ॥ (अ ९९, २५४ ) असे सागितले आहे पारिक्षित यात जनमेजयान दोन अश्वमेध यज्ञ केले, असे म्हणून त्यात वाजसनेयक म्हणजे याज्ञवल्क्य याचा सबधहि दाखविण्यात आला आहे, पूर्वीप्रमाणेच हाहि यज्ञ अथपासून इतिपर्यंत यथासाग पार पडला वैशपायनाचा बहिष्कार मात्र फुकट गेला धन्य जनमेजय राजे आणि धन्य त्याची सत्वनिष्ठा व कर्मनिष्ठा !



# स्त्रीचें सख्य हें सख्यच नव्हे !

यज्ञानुष्ठानांत विश्रांतीच्या वेळी पुरोहित लोक सदा-मंडपांत विश्रांतीकरतां म्हणून येऊन बसतात. त्यावेळी यज्ञांतील कांही विषयावर प्रश्न निघून त्यांवर चर्चा चालत असते. अर्थात केव्हां ती गंमतीदार असते; तर केव्हा गंभीर असते. केव्हा केव्हां अत्यंत महत्वाचा विषयहि वादविवादाकरतां निघतो. असाच एक प्रसंग घडला. अग्निमंथनाच्या विषयावरुन गोष्ट निघाली असता; अरणी कशाची असावी हा प्रश्न उपस्थित झाला. याज्ञवल्क्यांनी ती अरणी अश्वत्थवृक्षाचीच असावी असें प्रतिपादन करून त्यासंबंधी असलेली एक गोष्ट त्यांनी सांगितली. ती मोठी बोधप्रद आहे.

ती थोडी लांब असली तरी येथे देत आहोत. तीवरुन याज्ञवल्क्याचे साहित्य शास्त्रातील कुशलत्व, भाषाप्रभुत्व व रसपरिपोषाची हातोटी याची प्रचिति येते.

उर्वशी ही स्वर्गलोकातील एक प्रसिद्ध अप्सरा होती. मग तिचे रुपलावण्याचें काय वर्णन करावें ? मोहक चेहरा, नाजूक शरीर, गौर, कांति, सुबक ठेवण व नवतारुण्य पुरुषाना वेड लावायला मग आता आणखी काय पाहिजे ? खरोखर उर्वशी म्हणजे सौन्दर्याची मूर्तिमंत व मनोहर अशी पुतळीच होती.

ती एकदा सहज स्वर्गलोकांतून खाली मृत्युलोकी आली, आणि इकडे तिकडे फिरत असता अकस्मात मृत्युलोकांतील मदनाचा पुतळा पुरुरवा तिच्या नजरेस पडला. तिला त्यांच्या-सारखे सौन्दर्य आतापर्यंत कोठेंच पहावयास मिळालें नव्हते. राजाकडें तिनें प्रथम पाहिले. पुन: पाहिलें दोघांची दृष्टादृष्ट झाली आणि पुढें ? तिचा तोल सुटला आणि ती संपूर्ण प्रेमवश झाली.

पुरुरवा अत्यंत सुंदर नि देखणा होता. उंच बांधा, तेजस्वी चेहरा, विशाल भालप्रदेश, पाणीदार नेत्र, आणि त्याची आनंदी वृत्ति होती. अशी मूर्ति पाहून कोणती तरुणी मोहवश होणार नाही? गंधर्व लोकांतील अप्सरा झाली म्हणून काय झाले ? तिला स्त्रीहृदय होतेच. शिवाय ती तर तरुण व विलासी होती. सुईचें लोहचुंबकापुढे काय चालणार ? तिच्या अंत:करणात पुरुरवाच्या दर्शनाने चलबिचल झाली. व ती प्रेमवेडी बनली. तिच्या सौंदर्याने पुरुरवाहि मोहवश झाला.

या प्रसंगाचें पर्यवसान पुढे गोड प्रेमविवाहांत झाले. पण कांही अटीवर त्या अटी अशा होत्या. १. पुरुरव्याने तिला दिवसातून फक्त तीनच वेळां आलिंगन द्यावयाचें. २. तिच्या संमतिशिवाय तिच्याजवळ जावयाचें नाही. ३. एकान्ताशिवाय इतर वेळी तिने त्यास केव्हांहि नग्न स्थितीत पहावयाचें नाही. यापैकी कोणतीहि एक अट मोडली गेली की, उर्वशी पुरुरवा-जवळ राहूं शकणार नाही. पुरुरवाने या अटी कबूल केल्यामुळें प्रेमाचा संसार थाटण्याचें उर्वशीने कबूल केलें; व ती त्याच्या बरोबर गेली.

या प्रेमी जोडप्यांचा संसार मधुर, मोठया सुखांत व आनंदात चालूं लागला. निरनिराळया सुखविलासांत व आमोद-प्रमोदांत ते प्रेमी जोडपें इतके रंगून गेलें की; उर्वशीला गंधर्व लोकाचें पूर्ण विस्मरण झालें. पुरुरवाची राज्यकारभाराची व घरच्या इतर प्रेमळ माणसांची आठवणसुद्धां सपशेल बुजून गेली. पुरुरवाला उर्वशी व उर्वशीला पुरुरवा या पलिकडे निराळें जग असें राहिलेंच नाही.

अशा प्रेमरंगांत दिवसांमागून दिवस, महिने, वर्षे लोटली.

काही दिवसानी गधर्वाना तिची आठवण झाली ते म्हणू लागले- ' अरे हे काय झाले? उर्वशी गेली कोठे ? ती मृत्युलोकातच रगून बसली की, काय? कितीतरी काळ लोटला, तिला आमची आठवण होत नाही, गधर्व लोकाची शोभाच गेली त्यात एकजण म्हणाला, ' अहो ' कसची येते आता ती ! तिने राजा पुरुरवाशी विवाह केला आहे मात्र काही अटी आहेत त्यातली एखादी मोडली गेल्याशिवाय तिची तेथून सुटका होणे शक्य दिसत नाही

दुसरा म्हणाला–छें, तें काही नाही तिला येथ आणलीच पाहिजे एखादी युक्ति लढवू म्हणजे झाले ' काही विचार करुन ते त्या उद्योगास लागले

तुम्ही काही म्हणा, स्त्रियाचा स्वभाव विचित्र खरा तशात मूलबाळ नसले की, मग तो भारी विलक्षणच होतो प्रसगी एखादा कुत्रा, माजर, नाहीतर एखादा पोपट असा कोणतातरी एखादा प्राणी जवळ बाळगून त्यावर मातृवात्सल्याची तहान भागवून घ्यावयाची अशी त्याची स्थिति होते उर्वशी काही याला अपवाद नव्हती तिने एक सुदर बकरा व दोन गोमटीं कोकर बाळगली होती त्याजवर ती जीव की, प्राण करी पुरूरवा जवळ नसला म्हणजे ती याना जवळ घेऊन, त्याच्याशी चाळे करीत बसायची रात्रीसुद्धा ती त्याना विसरत नसे जवळ तिच्या पलगाशेजारीच ती निजत असत प्रत्यक्ष पोटच्या गोळ्याप्रमाणे ती त्याच्यावर जीव की, प्राण करीत असे

एके दिवशी रात्री पलगावर ती स्वस्थ पडली होती खाली शेजारीच कोकरे पोटात मान खुपसून स्वस्थ झोपी गेलीं होती रात्र बरीच झाली होती, तरी का कोण जाणे तिचा काही त्या दिवशी डोळा लागेना या कुशीवरून त्या कुशीवर व

त्या कुशीवरून त्या कुशीवर याप्रमाणे तिची सारखी चुळबुळ सुरू होती चैन पडेना व झोप येईना, म्हणून ती सहज पलगावर उठून बसली, तो तिला कोणीतरी त्यातील एक कोकरू पळवून नेत असल्याचे दिसले

लगच 'धावा कोणीतरी लवकर धावा!' असे म्हणत ती मोठ्याने आक्रोश करू लागली 'माझ्या बाळाना (कोकराना) कोणीतरी पळवून, नेत आहे' इतक्यात दुसरे कोकरूहि लांबविण्यात आले मग तर ब्रह्मांडच कोसळून पडल्यासारखें तिला झाले रडून व ओरडून सर्व राजवाडा उठविला तिनें

पुरूरवा त्यावेळी गाढ झोपी गेला होता तिच्या आरडाओरड्याने व आक्रोशाने तो जागा झाला इतक्यात तिची दुसरी किंकाळी आली चटकन् तो उभा राहिला व चोराना पकडावे म्हणून मोठ्या आवेशाने त्याच्यामागें लागला पण या गडबडीत अगावर वस्त्र नव्हतें, तें लपटून घ्यावयाचे राहून, स्वारी नागडी उघडीच धावत सुटली

त्या चोराना काय, हेच पाहिजे होतें चोर म्हणजे दुसरे तिसरे कोणी नसून प्रत्यक्ष गधर्वच होते त्यानी ह्या सधीचा फायदा घेतला त्यानी पुरूरवावर वीज चमकावून सूर्याप्रमाणे चक्क प्रकाश पाडला व उर्वशीला तें दृश्य स्पष्ट दिसले. कराराचा भग झाला. तिला गधर्व लोकाची आठवण होऊन चटकन् तिने पुरूरवाला तेथेंच सोडून, क्षणाचा विलब न करता आपल्या घराचा रस्ता सुधारला- जाताना त्याची भेट घेतली नाही की, त्याच्याशी भाषणहि केलें नाही जणू तो तिचा कोणीच नव्हे विजेप्रमाणे ती तेथून निघाली; आणि सरळ गधर्वलोकी येऊन दाखल झाली

'हा मी इथं आहे, हा मी इथ आहे, उर्वशी ! घाबरूं नकोस. हा पहा मी आलों' असे ओरडत तिला धीर देऊन तिचे सांत्वन करण्यासाठी म्हणून, त्या चोरांना सोडून, तो तिच्या पलंगाकडे वळला आणि तेथे येऊन पहातो तो पलंग रिकामा. इकडे तिकडे वळून पाहिले तर खोलीहि रिकामी. चोहोकडे तपास केला पण तिचा पत्ता लागला नाही.

तो दिवस गेला. दुसरा गेला. आठवडाहि लोटला. पण उर्वशी काही दिसेना त्याला. तेव्हा त्याची खात्री झाली की, आपणास दगा देऊन ती पसार झाली. त्यामुळें तो घाबरला, दु:खी झाला, कष्टी बनला. तिचा वियोग त्याला पुढें इतका जाणवला की, त्यामुळे तो वेडापिसा बनला. घर, दार, अन्नपाणी सोडले. राज्यवैभव सगळे काही टाकून देऊन राजवाड्यांतून बाहेर पडून, सारखा तिच्या नावानें टाहो फोडीत व शोक करीत कुरुक्षेत्रभर तो वेड्यासारखा भटकत सुटला.

त्या कुरुक्षेत्रात 'अन्यतः प्लक्ष' नांवाचें कमलाच्छादित असें एक सुंदर सरोवर होतें. त्याच्या कांठांवर विशाल वृक्षांची दाट झाडी पसरली होती. एके दिवशी जलविहार करण्यासाठीं म्हणून गंधर्वलोकांतील काही अप्सरा तेथे आल्या. अंगावरची वस्त्रे उतरवून काठावर ठेवली आणि शुभ्र राजहंसाप्रमाणे गंधर्व लोकांच्या त्या कर्पुरधवल सुंदर अप्सरा जलविहारासाठीं पाण्यात उतरल्या. हंसत खेळत एकमेकींवर पाणी उधळत आनंदानें त्या जलक्रीडा करूं लागल्या.

याप्रमाणें त्या सरोवरांत त्यांचा सुरस विलास चालला असतांना कांठावरुन एक उघडा बोडका वेडापिसा माणूस इकडे तिकडे बघत व गमत हळूंहळूं चालला होता. दिसावयाला

सुंदर पण चाळे वेड्याचे. त्या अप्सरांपैकी अेकोची नजर सहज त्याच्याकडे वळली. त्याला पाहून तिला मोठी गम्मत वाटली. म्हणून तिनें आपल्या जवळच्या मैत्रिणीला हाक मारून म्हटलें ' अग अे, तुला अेक गमत दाखविते ये. ते तिथ झाडाखाली बघ. दिसतय ना ? काय विलक्षण ध्यान आहे ग तें ' ती असें म्हणाली

ती मैत्रीण म्हणाली अय्या ! खरंच की:
जवळ जवळ दिगंबर मूर्तिच दिसते !

इतक्यात तिसरी त्याना येऊन मिळाली आणि त्याच्याकडे 'पहात म्हणाली– अग तो वेडा दिसतोय.

कोणत्यातरी पाखरानं त्याच्या हातावर तुरी दिल्या असाव्यात. तेच वेड हे, बरं का मेनके.

तो चागला दिसतोय नाही? कोणीतरी खानदानी असावा.

आणखी दोनचार अप्सरा तेथे जमल्या. तेव्हां त्यातील एक म्हणाली " चला ग, तिथें जाऊन त्याची थोडीशी गम्मत करूं. "

" संभाळ हो, पृथ्वीवरत्र माणूस, तशात वेडं.

" म्हणून काय झालं ?

" काय झालं ? जवळ जा म्हणजे समजेल.

" येईल धावूनं आणि मारेल मिठी. मग समजेल गंमत.

"छे. नको ग बाई ! इथुनंच काय पहावयाचं ते पाहू. जवळ जायला नको नि फजिति व्हायला नको. नव्हे का ग, तिलोत्तमे ?

" भारीच गडे भित्री तूं ! इतकं ग काय भ्यायचं त्यांत.

शब्दानें तरी विचारायचें आतांतरी क्षणभर जवळ ये कशी!"

असें म्हणून तो तिला मिठी मारावयास म्हणून धांवला.

सर्व अप्सरा घाबरून सरकून जरा दूर झाल्या. उर्वशी दोन पावलें सरकून पुढे झाली. तिला उद्देशून तो वेडा म्हणाला. उर्वशी ! अशी अगदीच निर्दय होऊं नकोस माझ्या मनांत कितीतरी तुला सांगावयाचें आहे, चल मजबरोबर कां उगाच उभयतांस दुःखांत पाडून घेतेस?

हे सर्व त्या वेड्याचें भाषण ऐकून त्या सर्व अप्सरांमध्यें खळकन् एकच हंशा पिकला.

इतक्यांत उर्वशी त्या वेड्याला उद्देशून – "पुरुरव्या ! तुझ्याशी माझा पूर्वसंबंध विसरुन जा मागें झालं तें होऊन गेलं. मी आतां गंधर्व लोकीची अप्सरा आहे. पूर्वीची तुझी उर्वशी नव्हे ! मागील सगळ विसरून जा.

"कसं विसरुं ? उर्वशी ! कसं विसरुं ?

"उषांपैकी पहिली उषा जशी निघून गेली, तशीच मीहि तुला केव्हांचीच सोडून गेले आहे. राजा! आतां जा. वाऱ्याप्रमाणे मी आतां तुला दुर्धर आहे. माझी आशा आतां व्यर्थ आहे. माझ्याशी लगट करूं नकोस !"

"उर्वशी ! तुला सोडून मी कुठं जाऊं ? मला अशी झिडकारून देऊं नकोस. तूं जर तुझ्या मित्राचा सुदेवाचा असा धिक्कार करशील तर तो घरीं जाणार नाही.

"मग कुठं जाईल ?

"दूर, अति दूर जाईल. तो पुनः तुला भेटणार नाहीं. तेव्हां त्यापैकी एक अप्सरा म्हणाली "पृथ्वीवरील

सारेंच पुरुष असे वाईलवेडे असतात का ग तिलोत्तमे ? क्सा अगदी प्रेमाने नादान झाला आहे !

दुसरी म्हणते "त्यात काय आहे एवढा मोठा विश्वामित्र केवढा तपस्वी ! तो नव्हता का या मेनकेचा कुत्रा होऊन तिच्या मागें लागला ?

उर्वशी पुरुरव्याला उद्देशून पुन म्हणाली, पुरुरव्या ! आता माझा नाद सोड शहाणा हो आणि घरी जा

"नाही, उर्वशी मी घरी जाणार नाही तुझा सुदेव तुला सोडून जाणार नाही असाच तो रानावनात भटकत फिरेल लांडगे त्याला फाडून खातील किंवा तो प्राणहि देईल पण तुला सोडून तो जिवत रहाणार नाही "

"राजा तू मरू नकोस ,लांडगे तुला फाडून न खावोत! तुझें अमगळ न घडो !

आम्हा स्त्रियाची एक गोष्ट सागते ऐक तुला स्पष्टच सागायच म्हणजे आम्हा स्त्रियाच सख्य ह सख्यच नव्ह आमचे अन्त करण म्हणजे लांडगीचे अन्त करण म्हणून म्हणते, माझा नाद सोड आणि घरी जा

"हाय हाय ! काय अैकतो ह मी ! सुदर स्त्रीच्या मयूर जिव्हेंतून फुलासारख्या कोमल स्त्री देहात वज्रासारखे कठोर अत करण कुठून आल ?

"राजेश्वरा असा भ्रमिष्ट का बरहोतोस ? मी तुला खरी वस्तुस्थिति सागते आम्हा स्त्रियाचा स्वभावच हा, आम्हा स्त्रियाच प्रेम, हे खरें प्रेम नव्हे ? आणि सख्य हें सख्य नव्हें ! म्हणून म्हणते घरी जा आणि सुखी हो !

त्या प्रेमवेड्या पुरुरव्यांची स्थिति आतां काय वर्णन करावी ?

उर्वशी त्याला तशी कठोर बोलून गेली हें खरें. आणि बंधनापलिकडे रहाणाऱ्या उदंड कुमारीचें स्वतंत्र अंत:करण ती सरळ बोलून चुकली, हेंहि तितकेंच खरें. पण किती झालेंतरी स्त्रीच ती. पुरुरव्याची ती करुण व हीनदीन मूर्ति पाहून तिला कळवळा आला. आणि ती त्याला म्हणाली. राजा असा कष्टी होऊ नकोस ! तुझी इच्छा अेक वेळ मी पुरी करीन. पण आज नाहीं.

" केव्हा ? "

" आजपासून अेक वर्षानं "

" खरं ? कां थाप ?

" अगदी खरं. वर्ष अखेरच्या रात्री तूं इथं ये. मीहि येते. फक्त अेकच रात्र तुझ्याजवळ राहीन. तेव्हां तुझा मुलगाहि माझ्या पोटी जन्मास आलेला असेल. जातांना तोहि बरोबर घेवून जा. आतां हे वेड टाक, शोक आवर नि घरीं जा.

त्या वेड्या पुरुरव्यावर ही जणू अमृतवृष्टिच झाली; त्याचें वेड उतरलें. आणि तो घराकडे परतला.

पुढें ठरल्यावेळी तो परत तेथें आला. तों काय चमत्कार तेथें एक सुंदर राजमहाल आणि त्यांत उर्वशी. उभयतांची भेट झाली व राजा आनंदित झाला,

दोघांची वियोग होण्याची वेळ जवळ आली, तेव्हां उर्वशी राजाला म्हणाली. " राजा उद्यां सकाळी गंधर्व तुला अेक वर देणार आहेत. त्यावेळी तुला काय मागायचें असेल तें मागून घे.

" काय मागूं ? माझी लाडकी उर्वशी मला कायमची द्या म्हणूं ?

" तें शक्य नाहीं ! आम्हा अप्सरांना या मृत्युलोकीं कायमच्या येऊन राहतां येत नाही.

" मग काय मागूं तूंच सांग.

" तूं इतकंच म्हण कीं, मलाहि तुमच्यापैकी एक होऊं द्या ;

पुरुरवा ( आनंदून ) " फार छान ! चांगली गोष्ट सांगितलीस बघ तूं ! म्हणजे मला गंधर्वलोकी राहावयास सांपडून तुझ्याशीं मनसुराद विलास करावयास मिळेल. उर्वशी किती शहाणी आहेस ग तू ! मोठी चाणाक्ष खरी. स्त्रियांना केव्हां केव्हां सुंदर गोष्टी सुचतात त्या अशा.

इतक्यांत उजाडलें आणि गंधर्व तेथें आले. त्यांनीं राजास वर मागण्यास सांगितल्यावरून त्यानें उर्वशीनें आधीच शिकवून ठेवल्याप्रमाणें वर मागितला. ते म्हणालें, " राजा ! तें शक्य नाहीं. तुम्हां मनुष्यामध्यें अग्निसारखें पवित्र शरीर एकाचेंहि नाही कीं, ज्यामध्यें हवन केलें असतां त्याला आमच्यासारखें होतां येईल. असें म्हणून त्यांनी त्याला एका पात्रांत अग्नि दिला आणि म्हटले; 'या अग्नीत हवन कर म्हणजे तूंहि आमच्यासारखाच व आमच्यांतलाच एक होशील."

पुरुरव्यानें तो अग्नि घेतला. व उर्वशीनें राजापासून तिच्या उदरीं झालेला पुत्र त्याच्या स्वाधीन केला. दोन्हीं घेऊन राजा परत घरीं आला. त्या अग्नीत यथाविधि हवन करून अग्निनारायणाच्या कृपाप्रसादानें तो शेवटीं गंधर्वांपैकी एक झाला.

बोध – 'न वै स्त्रैणानि सख्यानि'

'सालवृकाणां हृदयान्येता' ( श. प. ११–५–१ ते ९ )

ही उर्वशीची कथा ऐकून यज्ञमंडपांतील विद्वान मंडळीस मोठें कौतुक वाटलें व आनंद झाला.

---

# हे परिक्षित जनमेजय कोण ?

योगीश्वर याज्ञवल्क्याच्या समकालीन असणारे असे परिक्षित जनमेजय कोण या प्रश्नावर प्रकाश पाडणे हे अत्यत आवश्यक आहे हा प्रश्न प्रथमदर्शनी अत्यत गुतागुतीचा वाटतो या विषयावर आधुनिक विद्वानात मतभेद पडून मोठी खडाजगी माजून राहिली आहे म्हणून या प्रश्नाचा उलगडा आम्ही शतपथ व इतर ग्रथाधारे अगदी थोडक्यात करणार आहोत आम्ही ज्यावेळी याज्ञवल्क्य चरित्र ग्रथ प्रथम प्रसिद्ध केला, तेव्हापासून म्हणजे सन १९३६ सालापासून या प्रश्नाला महाराष्ट्रात तोंड फुटले केसरीचे बहुश्रुत विद्वान श्री ज स. करदीकर यानी प्रथम केसरीत हा प्रश्न उपस्थित करुन त्याला चालना दिली. पुढे नाशिकचे सुप्रसिद्ध पडित म म श्रीधरशास्त्री वारे यानी आपल्या याज्ञवल्क्य चरित्रात श्री करदीकराच्या मतालाच साथ दिली त्यानतर प्रो विष्णु वळवत आठवले यानीहि त्याच्याच पावलावर पाऊल टाकून आमच्यावर घसरून आमच्या विचारसरणीस खोटॆं मोडली तेव्हा या सर्वाचा विचार समाचार घेणे आम्हास प्राप्त झाले आहे आम्ही आमची विचारसरणी शतपथ व इतिहासपुराण दृष्टचा किती सुसगत व तर्कशुद्ध आहे, हे आमच्या 'याज्ञवल्क्य दर्शन ' या ग्रथात शेवटी शेवटी ' याज्ञवल्क्य याचें ऐतिहासिक समालोचन ' या प्रकरणात दाखविले आहे. आणि तेव्हापासून से आमचे विवेचन साधार व समर्पक खोडून काढण्याच्या भरीस

आतापर्यंत कोणीच पडले नाहीत! 'याज्ञवल्क्य दर्शन' सर्वांसच वाचावयास उपलब्ध असेल, अशी खात्री नसल्यामुळें येथें या विषयासंबधी थोडक्यात द्विरुक्तीचा दोष पत्करून चर्चा केली आहे.

वादाचा मुख्य मुद्दा 'याज्ञवल्क्य कालीन जनमेजय कोण, हा आहे आमच्या मते पांडवाचा पणतू व सर्पसत्र करणारा पारिक्षित जनमेजय तोच याज्ञवल्क्याच्या समकालीनचा ठरतो. वैदिक वाङ्मयात याज्ञवल्क्य जसे चार आहेत, तसे जनमेजय हे तीन आहेत त्यात पारिक्षित जनमेजय हा एकच आहे नामसादृश्यावरून वरील संशोधकाची दिशाभूल झाली असून, याज्ञवल्क्य–कालीन जनमेजय कोण याविषयी सर्वच गोंधळात पडले आहेत. हा प्रश्न सोडविण्यासाठी नुसत्या पुराण ग्रथावरच सगळी भिस्त ठेवून चालण्यासारखें नाही त्याच्या जोडीला शतपथाचें साहाय्यहि अवश्य आहे शतपथ हाच ग्रंथ त्याच्या चरित्राची खरी साक्ष देणारा आहे त्याला धरून असलेली पौराणिक वचनें येवढीच ग्राह्य असून, त्याला विरोध करणारी वचने अग्राह्य व इतिहास-दुष्ट आहेत, असे आमचे स्पष्ट व प्रांजल मत आहे.

पांडवाचा नातू जो परिक्षित त्याला तक्षकाच्या सर्पदंशाने दुर्मरण आले आपल्या बापाच्या दुर्मरणास कारणीभूत झालेल्या तक्षकाचा सूडबुद्धीनें निर्वंश करण्यासाठी म्हणून परिक्षिताचा मुलगा जो जनमेजय त्याने सर्पसत्र प्रारंभिले त्याला श्रुतसेन उग्रसेन व भीमसेन असे तिघे बंधु होते तीन जनमेजयांपैकी सर्पसत्र करणारा जनमेजय हा एकच असून, तो पांडव वंशातला परिक्षिताचा मुलगा होता हे महाभारतावरून सिद्ध होते ( म. भा आदिपर्व, ३–१) तेथें 'जनमेजयः पारिक्षितः सहभ्रातृभिः कुरुक्षेत्रे दीर्घसत्रमुपासते! असे वचन असून, तेथील 'जनमेजयः

पारिक्षित ' हा शब्द मननीय आहे. त्या शब्दप्रयोगाने अर्जुनाचा नातू जो परिक्षित त्याचाच मुलगा जनमेजय हा सर्पसत्र करणारा होय हे स्पष्ट होते

यानतर त्या सर्पसत्रात कोण कोण सदस्य होते, हे त्या सदस्याचा उल्लेख आदिपर्वात सापडत असून, त्यापैकी उद्दालक, श्वेतकेतु, देवल, कहोड, व्यास व वैशपायन या व्यक्ति महत्त्वाच्या आहेत. त्याचा सबध इतरत्र योगीश्वर याज्ञवल्क्याशी आला असून, तो कोठे, केव्हा व कसा आला, हे या चरित्र ग्रथात आम्ही त्या त्या प्रसगी दाखविलेच आहे. परतु पुन आम्ही त्याचे दिग्दर्शन येथें थोडक्यात करीत आहोत. ( आ. प ४८, ७–१० )

या जनमेजयाच्या सर्पसत्रात कृष्णद्वैपायन व्यास हे आपले शिष्य वैशपायनयासह जातीने हजर असून, त्या सर्पसत्रालच जनमेजयाने आपल्या पूर्वजाचे चरित्र ऐकण्याची व्यासापुढे आपली इच्छा प्रदर्शित केल्यावरून व्यासाच्या सागण्यावरून वैशपायनानी त्याला भारत कथन केले हा मजकूर महाभारतात आदिपर्वातील अध्याय २१ श्लोक २२ मध्यें आला आहे.

यावरून ही सर्व मडळी पारिक्षित जनमेजय याच्या सर्पसत्रातच एकत्र आलेली होती, असे स्पष्ट दिसून येते

याज्ञवल्क्य देखील कोणते या विषयावर स्पष्ट प्रकाश पाडणारे वचन विष्णुपुराणात आढळते ते असे :– 'यजुर्वेदतरोः शाखा सप्तविंशन्महामति । वैशपायन नामासौ व्यासशिष्यश्चकार वै ॥१॥ शिष्येभ्य प्रददौ ताश्च जगृहुस्तेप्यनुक्रमात् । याज्ञवल्क्यस्तु तस्याभूद ब्रम्हरातसुतो द्विज ॥ २ ॥ (विष्णु, अ ३–५–१ व २) या वचनात एकाच ठिकाणी व्यास, त्याचा शिष्य वैशपायन व त्या वैशपायनाचा शिष्य ब्रम्हराताचा मुलगा याज्ञवल्क्य या

त्रिवर्गाचा संबंध आला आहे. चार याज्ञवल्क्यांपैकी वैशंपायनाचा शिष्य याज्ञवल्क्य कोण याचें स्पष्टीकरण ब्रम्हरातसुत, हें शब्द घालून त्यावरून इतर याज्ञवल्क्याचा निरास केला आहे.

आतां यापुढे वैशंपायन व याज्ञवल्क्य यांच्यांत खटका उडून वैशंपायनांनी आपली विद्या परत मागितली ही गोष्ट पुढील वचनात स्पष्ट केली आहे. 'ततः क्रुद्धो गुरु'प्राह याज्ञवल्क्यं महामतिः। मुच्यतां यत्त्वयाधीतं मत्तो विप्रावमन्यक ॥' (विष्णु, ३–५–८) वैशपायनाच्या रागाच्या वचनामुळें त्याची विद्या टाकून देऊन याज्ञवल्क्यानी सूर्याराधन करुन शुक्ल यजुर्वेद मिळविला. परत घरी आल्यावर जनकांच्या यज्ञांत त्याची व वैशंपायनांची पुनः गांठ पडून तेथें दक्षिणेसाठी त्या दोघांमध्यें भांडण चाललें असतां देवल ऋषींनी मध्यस्ती करून त्याचे भांडण मिटविले. हा मजकूर महाभारतातील शांतिपर्वात आलेला आहे. 'ततः सशिष्येण मया सूर्येण गभस्तिभिः। व्यस्तो यज्ञो महाराज पितुस्तव महामनः ॥ १८ ॥ मिषतो देवलस्यापि ततोऽर्धं हृतवान्वसु। स्ववेददक्षिणार्थे विमर्दे मातुलेन ह ॥ १९ ॥ (शांतिपर्व ३२३– १८ व १९) येथें वैशंपायनाना मातुल असें म्हटले आहे. शिवाय देवल ही व्यक्ति मननीय आहे. कारण हे देवलच जनमेजयाच्या सर्पसत्रात सदस्य असून, त्यांचा संबध ब्रह्मरातसुत याज्ञवल्क्याशी जनकांच्या वरील यज्ञांत आलेला आहे; तेव्हा देवल हे पांडववंशज पारिक्षित जनमेजय व ब्रह्मरातसुत याज्ञवल्क्य म्हणजे योगीश्वर याज्ञवल्क्य यांना जोडणारा एक महत्वाचा दुवा आहे. त्याचप्रमाणें वैशंपायन यानी पारिक्षित जनमेजयाला सर्पसत्रांत भारत कथन केलें असून ते योगीश्वर याज्ञवल्क्याचें मातुल लागतात. तेव्हां पारिक्षित जनमेजय व वैशंपायन शिष्य

याज्ञवल्क्य म्हणजे योगीश्वर याज्ञवल्क्य या दोघाना जोडणारा हा दुसरा दुवा होय.

यानतर सर्पसत्र करणारे पारिक्षितजनमेजय व योगीश्वर याज्ञवल्क्य याना जोडणारा तिसरा महत्वाचा दुवा म्हणजे उद्दालक आरुणी हा होय कारण जनमेजयाच्या सर्पसत्रात ते सदस्य असून, त्याचा सबध याज्ञवल्क्याकडे त्याचे गुरु या नात्याने येतो

शतपथातील 'त हैतमुद्दालक आरुणि ।वाजसनेयाय याज्ञवल्क्यायान्तेवासिन उक्तोवाच' (श ब्रा. १४–९–३–१५) या वचनात याज्ञवल्क्याना 'अन्तेवासिन' म्हणजे शिष्य असे म्हटले असून, शिवाय त्याना 'वाजसनेयाय' हे विशेषण लावून उद्दालकानी मोठी बहार केली आहे यावरून वाजसनेय म्हणजे योगीश्वर याज्ञवल्क्यच ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होते पुन दुसऱ्यादा उद्दालक आरुणि व याज्ञवल्क्य याचा सबध जनकराजाच्या विद्वत्सभेतहि आला आहे ( श ब्रा १४–६–७–१)

या उद्दालका नतर कहोड हा चौथा दुवा आहे कारण तो सर्पसत्रात जसा सदस्य होता, तसाच जनकसभेत तो याज्ञवल्क्याचा प्रतिस्पर्धी होता (श ब्रा १४–६–४–१)

पुढला पाचवा दुवा श्वेतकेतु आरुणेयाचा हा श्वेतकेतु म्हणजे उद्दालकाचा पुत्र तो सर्पसत्रात एक सदस्य होता त्याचप्रमाणे तो याज्ञवल्क्य, व शोमशुष्म हे मिळून चालले असता त्याची वाटेंत जनकाशी गाठ पडली हा मजकूर शतपथात आला आहे 'जनको ह वै वैदेहो समाजगाम श्वेतकेतुनारुणेयेन सोमशुष्मेण सात्ययज्ञिना याज्ञवल्क्येन तान्होवाच कथमग्निहोत्र जुहोति । (श. ब्रा ११–६–२–१) या वचनावरून श्वेतकेतू व याज्ञवल्क्य याचा सबध उघड होतो.

शिवाय आणखी दोन दुवे सांपडतात.ते म्हणजे इंद्रोत दैवाप व तुरकावषेय हे होत यापैकी इंद्रोत दैवाप यांचा संबंध शतपथांत आला आहे. तो असा :– एतेन हैन्द्रोतो दैवापः शौनको जनमेजयं पारिक्षितं याजयाचकार (श, प. १३–५–४–१)– भावार्थ– इंद्रोत दैवाप यानें पारिक्षित जनमेजयाकडून एक यज्ञ करविला. त्याचप्रमाणे तुरकावपेय यांनीहि जनमेजयाला एका यज्ञांत ऐंद्र अभिषेकाने अभिषिक्त केले. असा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणांत (ऐ. ब्रा. ८–२१) आलेला आहे.

यावरील दोन वचनांवरून पारिक्षित जनमेजयराजांनीं आणखी दोन यज्ञ केले होते. ही गोष्ट शाबीत होते. या दोन यज्ञांत योगीश्वर याज्ञवल्क्यांचा संबंध आल्याचा सुगावा लागतो की, काय हें पाहूं या. सुदैवाने वायुपुराराणात हा उल्लेख सांपडतो. तेथे जो उल्लेख आहे तो असा– ' पारिक्षित्तनयश्चापि पौरवो जनमेजयः। द्विरश्वमेधमाहृत्य ततो वाजसनेयकम् ॥२५४॥ प्रवर्तयित्वा तद्ब्रह्म त्रिखर्वी जनमेजयः। विपादाद्ब्राम्हणै. सार्धमाभिशस्तः क्षयं ययौ ॥२५५॥ (वायु ९९,२५४–२५५) भावार्थ– पारिक्षिताचा मुलगा जनमेजय यानें वाजसनेयाला ब्रह्मांच्या जागी नेमून दोन अश्वमेध यज्ञ केले. आणि पुढें ब्राह्मणांच्याकडून शापित होऊन तो राज्य सोडून निघून गेला. येथें ' वाजसनेयक ' हा शब्द फार अर्थबोधक आहे. 'वाजसनेयक ' हे विशेषण फक्त ब्रह्मरातसुत याज्ञवल्क्यांनांच लागू आहे. इतर याज्ञवल्क्यांना नाही. तें विशेषण शतपथात उद्दालकांनी योगीश्वर याज्ञवल्क्यानाच लावले आहे. तेथें त्यांनी वाजसनेयाय याज्ञवल्क्याय' ( श. ५–१४–९–३–१५ ) असें स्पष्ट म्हटलें आहे. त्यावरून वाजसनेयक म्हणजे दुसरा तिसरा, कोणी

नसून फक्त आमचे चरित्रनायक योगीश्वर याज्ञवल्क्य हेच होत. याविषयी संशयाला आता जागाच राहात नाही.

हीच गोष्ट अधिक स्पष्टतेने मत्स्यपुराणावरून सिद्ध होते. 'अभिमन्योः परिक्षित्तु पुत्र परपुरंजयः। जनमेजय पारिक्षित. पुत्र. परधार्मिकः। ५७। ब्रम्हाण कल्पयामास स वै वाजसनेयकम्। स वै वैशंपायनेनैव शप्तः किल महर्षिणा ।५८। ( मत्स्य. ५०, ५७–५८) हे वचन तर फारच स्पष्ट आहे. अभिमन्यूचा मुलगा पारिक्षित, त्याचा मुलगा जनमेजय याने वाजसनेयाला ब्रम्हाच्या जागी नेमल्यामुळे वैशंपायनाकडून तो शापित झाला. येथे वाजसनेयकाच्या जोडीला वैशंपायनाचाहि उल्लेख आलेला असून तो लक्षात घेण्यासारखा आहे. यावरून पारिक्षित जनमेजय व योगीश्वर याज्ञवल्क्य यांना जोडणारे इंद्रोतदैवाप, व तुरकावषेय हे दोन खात्रीचे दुवे आहेत यात संशय नाही.

आणखी एक दुवा देता येतो. तो शतानीकाचा आहे. शतानीक हा पारिक्षित जनमेजयाचा मुलगा असून, तो योगीश्वर याज्ञवल्क्याचा शिष्य होता. 'जनमेजयः शतानीक पुत्र राज्येऽभिषिक्तवान्' असे मत्स्यपुराणात ( ५२–६५ ) म्हटले असून विष्णुपुराणात 'तस्यापर शतानीको भविष्यति योऽसौ याज्ञवल्क्याद्वेदमधीत्य परं निर्वाणमाप्स्यति ।' (विष्णु अ ४–२१–२) असे म्हटले आहे. या दोन वचनावरून पारिक्षित जनमेजय याचा शतानीक हा मुलगा जनमेजय व याज्ञवल्क्य यास जोडणारा इतराप्रमाणेच महत्त्वाचा आठवा दुवा आहे.

याविषयी साग्र स्पष्ट कल्पना यावी म्हणून पुढील नकाशा उद्बोधक ठरेल.




हीं नांवें वरील नकाशावरून पारिक्षित जनमेजय व योगीश्वर याज्ञवल्क्य हे उभयता समकालीन होते, हे दाखविण्यास निर्विवाद सुस्पष्ट आहेत.

एकंदर विवेचनावरून आम्ही पांडववंशज पारिक्षित जनमेजय व ब्रह्मरातसुत योगीश्वर याज्ञवल्क्य यांचा जो संबंध दाखविला आहे, तो किती व कसा सुसंगत, संयुक्तिक व इतिहास-पुष्ट आहे, याविषयीं वाचकांचें समाधान करण्यास पुरेसा आहे, असें आम्हांस वाटतें. ही आमची साखळी उखडून काढल्याशिवाय उगीच आमच्यावर गैर टीकाचे नसते शितोडे उडविल्यास ते फक्त हास्यास मात्र कारण होईल. नामसादृश्यावरून विरोधकांची दिशाभूल झाली असून या निरनिराळ्या दुव्यांचा त्यांनीं साकल्यानें विचार केलेला दिसून येत नाहीं.

याविषयीं सविस्तर माहिती पाहिजे असल्यास आमचें "याज्ञवल्क्य दर्शन" या ग्रंथांत पहावयास मिळेल.

पारिक्षित जनमेजय दोन आहेत म्हणून वर सांगितलें ..हे

त्यापैकीं अभिमन्यूचा मुलगा जो पारिक्षित, त्याचा मुलगा सर्पसत्र करणारा जनमेजय याविषयीं आतांपर्यंत विवेचन केलें. आतां दुसरा एक पारिक्षित जनमेजय आढळतो, पांडवांचा मूळवंश ह्या पुरुपासून प्रारंभ होतो.तो वंश कथन करतांना माहिती सांपडते ती अशी–पुरूचा एक मुलगा पारिक्षित असून त्याचा मुलगा जनमेजय नांवाचा होता. असें वायुपुराणांत अ. ९९, श्लोक २१३ ते २५६ व विष्णु पुराणांत अंश ४, १९, २० या ठिकाणीं सांगण्यांत आलें आहे. हा पारिक्षित जनमेजय पांडवाच्या पूर्वीचा १५ वा पूर्वज ठरतो. महाभारतांत संभवपर्वांत ९५ व्या अध्यायांत पुरुचा वंश दिला आहे. त्यांत परिक्षित जनमेजय हा अर्जुनापासून ७ वा पूर्वज ठरतो. भागवतांमध्यें स्कंद ९, २६ येथें त्याच पुरुची वंशावळ आहे. त्यांत पारिक्षित जनमेजय म्हणून सांगितलेंच नाहीं ! भारताचें वचन सत्य मानून चाललें तरी तो पांडवांचा ७ वा पूर्वज ठरत असून नांवापलीकडे त्याचा इतिहास कोठेंच उपलब्ध नाही. मग त्याच्याकडे तो याज्ञवल्क्य कालीन म्हणून बोट दाखविण्यांत काय स्वारस्य आहे ? तिसराहि एक जनमेजय आहे तो पुरुचा मुलगा असून त्याचा प्रस्तुत विषयांत कांहींच संबंध नाहीं. असो. असा हा जनमेजय व याज्ञवल्क्य याचा इतिहास आहे.



# मत्सराचा कडेलोट

## राज सिंहासन गडगडलें

वैशंपायनांचा केवढा हा अपमान, निराशा नि फजिति.त्यांनीं केले एक, नि झाले भलतेंच. वशिला व वजन खर्च करुन वहिष्कार पुकारला, पण तो यशस्वी झाला नाहीं. अश्वमेध व्हावा तसा होऊन गेला. सगळीच मसलत फसली; वाजू अंगावर उलटली. पदरीं अपवाद आला आणि लोकांत अप्रतिष्ठा झाली. प्रतिस्पर्धी विजयी झाले आणि दुराग्रहाला थप्पड बसली. तरी पण स्तब्ध बसणें झालें नाहीं.

वैशंपायनाचा पारा आतां अर्थात चढू लागला. आणि त्यांत आश्चर्य कसलें? याज्ञवल्क्यांचें तें अलौकिक कर्मकौशल्य, प्रलोभनीय वर्चस्व आणि त्यावरोवरच त्यांचा वहुजन समाजांत होत असलेला गौरव नि जयजयकार पाहून आगींत तेल पडलें. वैशंपायनाची मनस्थिति मोठी चमत्कारिक झाली. त्यांचा तोल सुटत चालला. विवेकानें ताळ सोडला. मत्सरानें उचल खाल्ली. शिष्टाचारास पायबंद बसला आणि क्रोधानें ब्रह्मांड पेटलें. याज्ञवल्क्यांना येन केन प्रकारेण खालीं ओढून उलथून पाडण्याचा या श्रीमदाचार्यांनीं आतां जणूं कांहीं विडाच उचलला आणि तो हेतु तडीस नेण्यासाठीं म्हणून गुप्त खवलतें चालूं झालीं.

जनमेजय राजे जोपर्यंत याज्ञवल्क्यांच्या पाठीशीं आहेत, तोपर्यंत त्यांना कमीपणा आणण्यांत यश येण्याची आशा नसल्यामुळें वैशंपायनांचा मेंदू आतां त्या पुण्यश्लोक राजाला प्रथम

चरकात ओढण्याच्या कारस्थानात घुटमळू लागला जनमेजय राजाविरुद्ध आता गुप्त कारस्थाने चालू झाली वैशंपायनांना हस्तिनापुरात अपयश आले होते, तरी त्यांचे वजन बाहेर जगात पूर्वीप्रमाणेच प्रभावी होते

त्यांचा शिष्यसमुदाय व स्नेह परिवार मोठा दांडगा व ठिकठिकाणी पसरलेला असल्यामुळे त्यांचा हेतु साध्य होण्यास फारसे अवघड झाले नाही त्यांचे काही शिष्य देशात इकडे तिकडे भटकत होते यांच्याकरवी जनमेजयाविरुद्ध विष पेरण्यात येऊन, राजद्रोहाचे सुरंग ठिकठिकाणी पेरून ठेवण्याचा त्यांनी सपाटा चालविला आणि पुण्यश्लोक जनमेजयाचें राजछत्र उलथून पाडण्याचा राक्षसी कट सिद्ध केला

मत्सराने पछाडलेली पण मोठ्या विचाराची सुविद्य व सुबुद्ध माणसेदेखील इरेस पडून प्रसंग विशेषी कशी भडकतात व त्यामुळें विवेकाला व न्यायनीतीला कशी पारखी होतात, याचे प्रतीक पहावयाचे असल्यास ते येथें प्रत्यक्षच पहावयास मिळेल आचार्य वैशंपायन म्हणजे काही अशी तशी व्यक्ति नव्हती बोलून चालून व्यास महर्षींचे पट्टशिष्य, यजुर्वेद विद्यापीठाचे मुख्य कुलगुरु जनमेजयाचे पुरोहित, भारत महाग्रंथाचे संपादक, राष्ट्रातील वजनदार पुरोहित, ब्राह्मणवर्गाचे अग्रणी मग आता त्यांची प्रतिष्ठा व योग्यता आणखी काय वर्णावी? अशा सुज्ञ, सुविद्य व सुप्रष्ठित महात्म्यालादेखील मत्सराने ग्रासल्यामुळें आपण हे काय करीत आहो यार्चे भानहि राहू नये, ही किती दुर्दैवाची गोष्ट आहे? असाच प्रकार मागें एकदा वसिष्ठ विश्वामित्र यांच्यामध्येहि घडून आलेला आम्ही ऋग्वेदात पहातो दोघेंहि ब्रम्हर्षिच- अत्यंत ज्ञानी व महान विभूति पण या पौरोहित्यापायींच त्यांच्यात केवढा वणवा

पेटला! सुदासाचे पौरोहित्य विश्वामित्राकडून जाऊन ते वसिष्ठांच्या गळयात पडताच विश्वामित्राने दावा साधला एक नव्हे, दोन नव्हें वसिष्ठाचे शभर पुत्राचे बळी विश्वामित्राने निर्दयपणे मोजून घेतले! ही कथा काय लोकविश्रुत नाही ? तरी विश्वामित्राची शांति झाली नाही आणि वसिष्ठाची ढळली नाही तोच प्रकार येथेंहि दृष्टोत्पत्तीस येतो वैशपायनानी जटा आपटून आकाश पाताळ एक केले तरी याज्ञवल्क्याची शातवृत्ति अगदी चळली नाही.

काय चमत्कार पहा राग सगळा याज्ञवल्क्यावर आणि संधान रोखले ते राजर्षि जनमेजयावर. पाडवकुलभूषण अर्जुनाच्या पुण्यश्लोक प्रपौत्रावर राजपुरोहित वैशपायन आता विवेकास पारखे झाले ते आता क्रोध व मत्सर याच्या पूर्ण आहारी गेले. आणि एके दिवशी ज्वालामुखीसारखा एकदम स्फोट होऊन, जिकडे तिकडे वडाचा भडका उडाला. जनमेजयावर ब्राह्मणाच्या शापाची अग्निवृष्टि कोसळली हरहर. पुण्यश्लोक धर्मराजाचे सिंहासन गडगडले आणि राजराजेश्वर स्थानभ्रष्ट झाले, जिकडून तिकडून सनातनी ब्राह्मणाची कोपाग्निवृष्टि झाली आणि त्रैलोक्यवीर अर्जुनाचा पणतु सर्व कपटनाटक पाहून वैतागून अरण्यात निघून गेला, आणि वैशपायनाच्या डोळयाचे पारणे एकदाचें फिटले.

. धन्य जनमेजय राजे ! आणि धन्य त्याची शातवृत्ति ! वड झाले म्हणून ते कचरले नाहीत. किंवा वैशपायनाच्या रोपाला डगमगले नाहीत. राजपुरोहिताचा हा खोडसाळपणा व वाम कारस्थाने पाहून त्याना शिसारी आली व खुषीने राजपदावर पाणी सोडून आनंदानें ते वनवासी झाले. तथापि याज्ञवल्क्याच्या स्नेहभावात व आदरनिष्ठेंत लवमात्रहि त्यानी कमी-

-पणा दाखविला नाही. परमधार्मिक असल्यामुळें सूडबुद्धीला थारा न देता, दुष्ट व मत्सरी जमाचा सपर्क नको म्हणून त्यानी आपण होऊन काढता पाय घेतला. केवढा तो स्वार्थत्याग नि केवढी ती समाधानावृत्ति ! वैदिक राजे पराक्रमात जसे श्रेष्ठ तसेच ते सत्व रक्षणातहि अत्यत दक्ष असत राज्यच काय, प्राण गेला तरी आपल्या सत्वाला ते धक्का पोचू देणार नाहीत

राजमुकुटावर तुळशीपत्र वाहून गृहत्याग, नव्हे राज्यत्यागहि केला पण सूडबुद्धीला तिलप्रायहि थारा दिला नाही वैराग्यवृत्ति धारण करून अखेरपर्यंत अरण्यातच त्यानी दिवस काढले त्याना धन्यवाद असोत याविषयी मत्य पुराणात मजकूर आढळतो तो असा —

'ब्रह्माण कल्पयामास सर्वं वाजसनेयकम्
स वै वैशपायनेनैव शप्त किल महर्षिणा ॥५८॥
पारिक्षित सुतो सो वै पौरवो जनमेजय ।
द्विरश्वमेधमाहृत्य महावाजसनेयक ॥६३॥
प्रवर्तयित्वा त सर्वमृषि वाजसनेयक ।
विवादे ब्राह्मणे सार्धमभिशप्तोवन ययौ ॥ ६४ ॥
(मत्स्य ५०, ५७–६५)

याच अर्थाचा वायुपुराणातहि उल्लेख सापडतो
'पारिक्षित्तनयस्यापि पौरवो जनमेजय ।
द्विरश्वमेधमाहृत्य ततो वाजसनेयकम् ॥ २५४ ॥
प्रवर्तयित्वा तद्ब्रह्म त्रिखर्वा जनमेजय ।
विषादाद्ब्राह्मणे सार्धमभिशप्तो क्षय ययौ ॥२५५॥
(वायु ९९ २५४-२५५)



# डाव फसला

किती झालें तरी वड तें बडच त्याचा रग तीनच दिवस, फार तर राज्यात चार दिवस गोंधळ आणि बेबदशाही माजून राहील इतकेंच ! या पलीकडे काही नाही आणि येथेंहि असाच प्रकार झाला जनमेजयानी लोकाचा रागरग पाहिला आणि राजपद सोडायची तयारी दाखविली हे पाहून बडाची वावटळ आपोआप ओसरत चालली पण यापासून वैशपायनास जें साधावयाचे होत, तो हेतु मात्र साध्य झाला नाही ज्या उद्देशाने त्यानी हा डाव टाकला होता, तो त्याचा उद्देश सपशेल फसला त्यापासून याज्ञवल्क्याच्या लौकिकाला अगर वर्चस्वाला काडीमात्रहि धक्का लागला नाही इतकेंच नव्हें, तर त्याच्या इभ्रतीला व लोकप्रियतेला उलट भरतीच आली हस्तिनापुरच्या गादीवर पुन त्याचा परमशिष्य शतानीक विराजमान झाला

जनमेजयाचा ज्येष्ठ पुत्र जो शतानिक तोच जनमेजयानतर गादीवर आला यासबधी ऐतिहासिक पुरावा देण थोडेसें जरूर आहे हा जो शतानिक आहे तो पाडवप्रपौत्र पारिक्षित जनमेजयाचा मुलगा पाडव पूर्वज पारिक्षित जनमेजयाचा नव्हें, याबद्दल भविष्य पुराणातील एक सूचक पण महत्त्वाचा उतारा देणे योग्य होईल 'शतानिक उवाच अजलि शिरसा ब्रह्मन् कृतोऽय पादयोस्तव । ब्रूहि मे धर्मशास्त्र तु येनाह पूज्यता व्रजे ॥२८॥ समुद्धर सवादस्मार्तत्कीर्तयित्वा कथा शुभाम् । यया न्मम पिता पूर्व कीर्तयित्वा तु भारतम् ॥२९॥ तस्य तद्वचन श्रुत्वा

व्यासो वचनमब्रवीत् । एष शिष्यः सुमन्तुर्मे कथयिष्यति ते प्रभो ॥३०॥ यथा वैशंपायनेन पुरा प्रोक्तं पितुस्तव। महाभारत-माख्यानं ब्रह्महत्याव्यपोहनम्॥३१॥ (ब्रह्मपर्व. अ. १, २८–३१)

हें वचन आमच्या मते अत्यंत महत्त्वाचे आहे येथें एकाच ठिकाणी व्यास, सुमतु, वैशंपायन, जनमेजय व शतानिक यांचा एकत्र संबंध स्पष्ट दाखविण्यांत आला असून, त्यावरून प्रस्तुत शतानिक हा पांडव वंशज जनमेजयाचा पुत्र ठरतो. शिवाय व्यास शिष्य वैशंपायनांनीं सर्पसत्र करणाऱ्या पारिक्षित जनमेजयांस भारत कथन केलें. तसेंच व्यासपुत्र शुका-चार्यांनी जनमेजयाच्या पित्यास पारिक्षितास भागवत कथन केलें. आणि व्यासाचें दुसरे शिष्यसुमंतु यांनी जनमेजयपुत्र शतानिकास म्हणजे वरील पारिक्षिताच्या नातवास भविष्यपुराण श्रुत केलें. तेव्हां यावरील पुराणवचनावरून शतानिक हा पांडव प्रपौत्र जनमेजयाचा पुत्र ठरतो. आणखी पुष्टी पाहिजे असल्यांस 'जन-मेजयाच्छतानिकस्तस्माऽऽजज्ञे स वीर्यवान् । जनमेजयः शतानिकं पुत्रं राज्येऽभिषिक्तवान् ॥ (मत्स्य. ५०–६५). हा श्लोक देईल. व जवळ जवळ याचाच अनुवाद वायुपुराणांतहि केलेला आढळतो. (पहा, वायु. ९९,२५४ते२५६.) या सर्व पुराव्यावरुन शतानिक हा जनमेजयांचा पुत्र ठरतो. याविषयीं शंका घेण्यास आतां जागा नाहीं.

शतानिक वाजसनेय याज्ञवल्क्य यांचा शिष्य होता. याचा उल्लेख पूर्वी केलाच आहे. हा आधार भागवतांतला आहे. 'तस्य (जनमेजयस्य) पुत्रः शतानिको याज्ञवल्क्यात् त्रयी पठन्। अस्त्रज्ञानं क्रियाज्ञानं शौनकात् परमेष्यतिच' (भागवत ९, २२ ३८) कंसांतील अक्षरें आमची असून ती वाचकांस 'तस्य' याचा अर्थ-

बरोबर समजण्यासाठी घातला आहे. या भागवत वचनाला विष्णुपुराणातूनहि पुष्टि मिळते. 'अत पर भविष्यानह भूपालान्कीर्तयिष्ये योऽय साप्रतमवनीपतिस्तस्यापि जनमेजयश्रुतसेनाग्रसेनभीमसेना पुत्राश्चत्वारो भविष्यति ॥१॥ तस्यापर शतानीको भविष्यति योऽसौ याज्ञवल्क्याद्वेदमधीत्य कृपादस्त्राण्यवाप्य विषय विरक्तचित्तवृत्तिश्च शौनकोपदेशादात्मविज्ञानप्रवण. परनिर्वाणमाप्स्यति ॥२॥ (विष्णु, अ ४-२१-१ व २) यात जनमेजय पुत्र शतानीक हा याज्ञवल्क्याकडून वेद शिकला असा उल्लेख आहे अर्थात तो त्याचा शिष्य ठरला.

जनमेजयानतर शतानीक गादीवर आल्यावर त्याने वैशपायनास जवळ न करता याज्ञवल्क्याची बाजू घेऊन शुक्ल यजुर्वेदाची तळी उचलून धरली आणि दरबारात व राजवाड्यात वाजसनेयास थारा दिला कारण तो स्वत याज्ञवल्क्याचा शिष्य असून शुक्ल यजुर्वेदाचा पाठ त्यान घेतला होता अर्थात् त्याती गुरुची बाजू घेतली हें स्वाभाविकच झाले यामुळ वैशपायनाचा व्यूह सगळा कोलमडून पडला व मनातील माडे मनातच जिरले त्याची मसलत फिसकटून वर्चस्वाला झपाट्याने ओहोटी लागली. हस्तिनापुरच्या राजदरबारात व क्षत्रियसमाजात शुक्ल यजुर्वेदाला मानाचे स्थान मिळून वाजसनेयाचे प्रस्थ व प्राबल्य वाढत चालले व त्यामानानें वैशपायनाची पकड ढिली पडत चालली शुक्ल यजुर्वेदाला वसत काळ लागला व कृष्ण यजुर्वेदाला शिशिर ऋतूची बाधा झाली.

काही कालानतर जनमेजय राजे अरण्यात कालवश झाल्याची दु खद बातमी हस्तिनापुरात येऊन थडकली. ती ऐकून राजधानीत एकच हाहा कार उडाला या दुरत्तानें द्वापर माजी

पुरोहितावर फोडण्यात येऊन, लोकात विशेषतः क्षत्रिय समाजांत त्याच्या विषयीचा प्रेमादरभाव पार आटून जाऊन, बहुजन समाज त्याच्याकडे पाठ वळवून बसला. याचा परिणाम असा झाला की, पुढे पुढे क्षत्रियात व सनातनी गटात तेढ व विरोध वाढत जाऊन वैशंपायन कपू क्षत्रियास पाण्यात पाहू लागला. तेव्हांपासून क्षत्रियाचे पौरोहित्य जुन्या ब्राम्हणाकडून सुटून ती जागा वाजसनेयाकडे येत चालली. आणि व्यवहारतः वैशंपायनाचा अस्त झाला.



# स्वजनकलह म्हणजेच राष्ट्रनाश

याज्ञवल्क्यांच्या आश्रमांत यज्ञविषक चर्चा चालली असतां स्वजनद्वेष हा मुद्दा निघाल्यावरून त्याचें उदाहरण देऊन स्पष्टीकरण करण्याकरितां म्हणून पुढील गोष्ट त्यानी सांगितली :–

'पूर्वी एकदां असें झाले कीं, नेहमी एकोप्याने राहाणाऱ्या व वागणाऱ्या देवांत काय झालें कोण जाणें भयंकर तेढ वाढून भांडण जुपलें. असें मागें कधीच झालें नव्हतें. पण आता त्यांच्यांत भेद पडून निरनिराळे पक्ष निर्माण झाले. अग्नि व वसु यांचा एक गट होऊन अग्नि त्याचा पुढारी झाला. सोम व रुद्र याचा एक गट बनून त्याचें अग्रेसरत्व रुद्राकडे आलें. वरुण व आदित्य यांचा एक गट बनून त्याचें आधिपत्य वरुणाकडे आणि इंद्र व मरुत यांचा एक गट होऊन त्यांत इंद्राला अग्रस्थान देण्यात आलें. पुढें पुढें त्यांच्यात इतकें वितुष्ट माजलें कीं, त्यांच्यात्यांच्यांत देखील विस्तव आडवा जाईनासा झाला. कोणी कोणाचें ऐकेना की, कोणी कोणाला जुमानीना. जो तो आपापल्यापुरतां पाहूं लागला व प्रत्येक गटात त्या त्या गटाचें म्हणणेंच खरें, आपणच काय ते शहाणें, आपलेंच सर्वांनी ऐकावें व त्याप्रमाणें वागावें असा दुराभिमान व दुराग्रह वाढीस लागून इतरांस तुच्छ व क्षुद्र मानण्याची प्रवृत्ति वळावत चालली. यामुळें चौघाची तोंडें चार दिशांस होऊन एकमेक एकमेकास पाण्यांत पाहूं लागले व एकमेकापासून दूर व अलिप्त राहूं लागले.'

अर्थात ही गोष्ट पुढें प्रसिद्ध पावून देवांचे शत्रू जे असुर व राक्षस यांच्या कानावर गेली. त्यांना तेवढेंच हवें होतें. आपल्या शत्रूंची जितकी शक्ति कमी होईल, तितकी त्यांच्या पथ्यावरच

होती. तशात सुंदर स्वर्गावर व तेथील दिव्य ऐश्वर्यावर राक्षसाचा प्रथमपासूनचा डोळा होता देवात फूट पडली असून त्याच्या त्याच्यात भयकर तेढ वाढली आहे ही बातमी कानी येताच त्यानी एक मोठा कट केला आणि 'दोघाचे भाडण तिसऱ्याचा लाभ' या सुभाषिताचा फायदा घेण्याचे ठरवून त्याप्रमाणे त्यानी स्वर्गावर स्वारी केली चोहोबाजूनी निकराचा हल्ला चढविला शेवटी व्हावयाचे तेच आले देवाची धादल उडून त्याचा पराभव झाला व असुर विजयी झाले

आता देवाचा सुंदर व ऐश्वर्यसपन्न स्वर्ग दुष्ट व स्वार्थी असुराचा झाला आणि स्वर्गाचे खरे मालक परतत्र नि परवश बनले ! तरी देवाचे डोळे एवढ्यावरच उघडले नाहीत स्वजन-द्वेषाचा मोठा उन्माद त्याना चढला होता द्वेषामुळे त्याचे डोके जागेवर राहिले नाही कशी झाली इद्राची फजिती ? कसा बसला अग्निला मार ? कसा उतरला रुद्राचा नक्षा ? वरुणाची कशी फजिती उडाली. याप्रमाणे एकमेक एकमेकास टोमणे मारून प्रत्येक गट आपआपसात समाधान मानू लागला !

होता होता राक्षसदिवाना पिसा व शिरजोरपणा वाढत चालला असुराचा राज्यकारभार सर्व देवाना त्यामुळे जाचक व मारक होऊ लागला देवाची धुदी उतरत चालली

ते आता आपापसात कुजबुज लागले आणखी काही दिवस लोटले तर खात्रीने असुर आम्हास कायमचे निर्वीर्य करून अखेर नामशेषहि करून टाकतील हे काही ठीक लक्षण नाही आपआप-सातील भाडण व तुटकपणा हीच आमच्या दु खास, अपमानास व हालअपेष्टास कारणीभूत आहेत ! तडजोड काढून तेढ व दुही मिटवून पूर्वीप्रमाणे आपण सर्वजण एक होऊ या मग त्या मूठभर असुराची आमच्यावर सत्ता गाजविण्याची काय बिशाद आहे ? आपला दुराभिमान व दुराग्रह टाकून देऊन एका हुकमती

खालीं सर्वांनीं राहूं या यांशिवाय तरणोपाय नाही. असें झालें तरच आमची घडगत लागून स्वर्ग पुनः परत मिळेल.

असा विचार करून सर्व देव आपापसांतील तेढ विसरून व भेद मोडून पुनः पूर्ववत एक झाले. त्यांनी शक्तिमान व पराक्रमी इंद्राला आपला पुढारी केला. पुढें ऐक्याचा प्रभाव जसा व्हावा तसाच झाला. देवदानवांत पुन. लढाई जुंपली आणि देव त्यांत विजयी झाले! असुरप्रभृति दुष्ट लोक पराभूत होऊन पळून गेले आणि देवांचा स्वर्ग देवांना मिळाला.

हा सुंदर बोध लक्षांत घेऊन भारतीयांनीं आपापसात भांडण्याची व किरकोळ कारणावरून फटकून राहण्याची घातुक वृत्ति सोडून दिल्यास भारतमातेकडे वक्र दृष्टीनें पाहण्याची कोणाची छाती आहे? 'देवानां पंथामनुचरेम' अशी वैदिक आर्यांची तेजस्वी घोषणा होती. म्हणूनच ते धन्य व सुखी झाले. भांडखोर वृत्तीनें कोणाचेंच कल्याण साधण्यासारखें नाही. कारण अशा भांडखोर लोकाचा शत्रु किती जरी दूर असला तरी या त्यांच्या भांडणाचा व बेकीचा येनकेन प्रकारेण फायदा घेऊन अचूक झडप घालून त्याचा देश पळकावून बसल्याशिवाय राहणार नाहीत. आपापसांत भांडत बसणे म्हणजे शत्रूला घरांत शिरण्यास आमंत्रण देण्यासारखेंच होय. नंतर ते शत्रूच्या आहारीं जाऊन पडल्याशिवाय राहात नाहीत. म्हणून शहाण्यांनीं आपापसांत भांडत बसूं नये. हें तत्व समजून जो स्वजनांशी भांडत नाहीं तो शत्रूच्या पोटांत तिडिक उत्पन्न करतो व त्याच्या आहारीं मुळींच जात नाही. (श. प. ३-४-२-१-ते ३)

या गोष्टीचा बोध म्हणून याज्ञवल्क्यांनी ' तस्मादु ह न स्वा ऋतीयेरन्। यो हैवं विद्वान्नर्तीयतेऽप्रियं द्विषतां करोति न द्विषद्भ्यो रध्यति, तस्मान्नर्तीयेत। (श. प. ३-४-२-३) असें यथार्थ उद्गार काढलेलें आहेत.

# योगीश्वरांचा पुण्याश्रम

पुण्यश्लोक जनकराजाचें राज्य म्हणजे त्यावेळचा एक अत्यंत सुपीक व सुमृद्ध देश होता प्रजा सुखी, सतुष्ट व सत्कर्मनिष्ठ होती. राज्यव्यवस्था चोख व अधिकारीवर्ग सरळ व सालस होता अर्थात दुष्काळ, चोऱ्या, वडवखेडे याचे नाव नव्हते. जिकडे तिकडे शातता, सुबत्ता व समाधान यानी वातावरण खुलून गेलेले होते. मनुष्याला सुधारणेच्या नावाखाली दुर्बल व अल्पायु बनविणारे ते विज्ञानयुग नव्हते तर त्याला उद्योगप्रवण, समर्थ व दीर्घायु करणारे ज्ञानयुग होते. प्राचीन वैदिक आर्याचा तो भरभराटीचा काळ होता.

खुद्द मिथिला नगरीकडे पाहिले म्हणजे जेये तेथे मोठमोठे वाडे, मनोहर गोपुरे, सरळ रस्ते आणि प्रशस्त बागबगीचे असत. सर्वच सुदर आणि मनोहर होते. खुद्द जनक राजाचा राजवाडा म्हणजे प्रत्यक्ष इद्रभुवन असून त्या भव्य वाड्यावर चकाकणारे सोन्याचे सुदर कळस, चारी दिशाच्या चारी वेशीवर मोठ्या तोऱ्याने हवेत फडफडणाऱ्या सुर्यबिंबाकित कर्पूरधवल पताका आणि त्याच्यासमोर झुलणारे पाढरे शुभ्र हत्ती, या वैभवाचे कोण वर्णन करू शकेल ?

अशा वैभवसपन्न मिथिला नगरीजवळच पण काही अतरावर योगीश्वराचा विख्यात आश्रम समुद्राप्रमाणे पसरलेला होता. त्याची शोभा म्हणजे काही विलक्षण होती. जिकडे तिकडे उच विशाल व सुदर वृक्षानी तो आश्रम सर्वत्र नटलेला होता. मधून मधून फलपुष्पाच्या लहानमोठ्या बागा, भाजीपाल्याचे ताफे, सुपीक शेते व गायीची हिरवीगार कुरणे, अशा अनेक गोष्टींनी तो पुण्याश्रम जिकडे तिकडे अगदी सूलून गेला होता.

त्याचप्रमाणें चोहिकडे गोशाळा, यज्ञशाळा, पाठशाळा, भोजनशाळा, सभागृहे, अतिथिगृहे इत्यादि पसरलेली होती. मध्यभागीं योगीश्वराचें निवासस्थान असून दारा समोर कर्मयोगाचा सूर्यबिंबाकित शुभ्र ध्वज नभोमंडलात उंच फडफडत होता. हा आश्रम म्हणजे त्यावेळचें सरस्वतीचें एक मुख्य क्रीडोद्यान व कर्मयोगाचें महाक्षेत्रच बनून गेला होता. येथेंच शुक्ल यजुर्वेद जन्मास आला आणि येथेंच शतपथ ब्राह्मण प्रकाशांत आलें. येथेंच अनेक यज्ञसमारंभ झाले आणि येथेंच अनेक ऐतिहासिक गोष्टी घडल्या.

जनक राजे वेदविद्येचे अत्यंत शोकी, अभिमानी, महाज्ञानी, मोठे कर्मयोगी व अत्यत उदार असे होते. राजनीतीचे कुशल कर्णधार व अध्यात्म शास्त्राचे सूक्ष्म चिकित्सक असे होते. शुक्राचार्यासारख्या ज्ञानी पुरुषाला देखील उपदेश करण्याची ज्याची योग्यता; अशा त्या थोर पुण्यश्लोक राजर्षीची थोरवी काय वर्णन करावी ? (म. शा. प. अ. ३२६) अशा उदार व उदात्त नृपतीचा व योगीश्वर याज्ञवल्क्यांचा स्नेह व सलोखा अत्यंत वाढला तर त्यात नवल तें काय? गुणी जनाचा तो सहज स्वभाव आहे.

शिवाय याज्ञवल्क्य व जनक याच्यात गुरुबंधूचे नातें होतें. दोघेहि तत्कालिन सुप्रसिद्ध योगाचार्य हिरण्यनाभ यांचे शिष्य होते दोघेहि योगविद्या तेथेंच शिकले. त्यामुळें साहजिकच प्रेम व स्नेह यांची अभिवृद्धि झाली. या ब्रह्मर्षीच्या पुण्याश्रमाला जें एवढे विशाल व स्वर्गीय स्वरुप प्राप्त झाले, होतें त्याला कारण म्हणजे या कृतिजनकाचें थोर व उदार अंत:करण हेंच होय. त्यावेळी ब्राह्मण व क्षत्रिय दोघेहि वेदमाऊलीचें -परमभक्त व अनन्य उपासक होते. तेथें आजच्या सारखें वेदोक्ताचें

आत्मघातकी खूळ माजले नव्हते आर्यांच्या वेदविद्येचा उत्कर्ष करणारे जसे ब्राह्मण तसेच या आर्यभूमीला सुवर्णभूमि बनविणारे वीरबधु क्षत्रियच होते. वैदिक आर्यांचा विजयी झडा जगभर नाचविणारे लोकोत्तर शूरवीर क्षत्रियच भारत भूमीच्या स्वातंत्र्य लक्ष्मीच्या सरक्षणार्थ आर्यशत्रूबरोबर प्राणाची पर्वा न करता अखड झुजन तिला परशत्रूपासून अलिप्त ठेवणारे व तिला जिवापाड जपणारे हे क्षत्रिय बघूच नव्हेत तर कोण ? विद्वान ब्राह्मणाला उदार आश्रय देऊन वेदविद्येचे सवर्धन व सगोपन या उदार वर्गाने केले म्हणूनच आज वेदविद्येला व वैदिक सस्कृतीला अग्रपूजेचा मान मिळत आहे

याज्ञवल्क्यानी या ब्राह्मणक्षत्रिय सख्याला मातापुत्राचे नाते जोडले आहे 'ब्रह्मणोहि क्षत्र जायते'— ब्राह्मणापासूनच क्षत्रिय जन्मतो असे शतपथात स्पष्ट म्हटले आहे येथ ज्ञान या अर्थी ब्राह्मण व कर्म या अर्थी क्षत्रिय अशी ही शब्दयोजना आहे हे लक्षात घेतले पाहिजे अर्थात् ज्ञानापासूनच कर्माची उत्पत्ति ही गोष्ट शास्त्रशुद्ध व अनुभवसिद्ध असून ती योगीश्वराना अवगत होती म्हणूनच त्यानी 'यन्मनसा चिंतयति तत्कर्मणा करोति' असे शतपथात घोषित केले आहे कर्माचे मातृस्थान ज्ञानाकडे असल्यामुळें व ब्राह्मण हे ज्ञानमूर्ति व क्षत्रिय हे कर्ममूर्ति असल्यामुळें ब्राह्मणापासून क्षत्रियाची उत्पत्ति असे लक्षणेने म्हणता येतें या उभयतात मातृपुत्र सबध दाखविण्यात त्याचे व्यवहारकौशल्य प्रतीत होते त्यानी म्हटले आहे की, ('न माता पुत्र हिनस्ति न पुत्रो मातरम्— माता ही मुलाचा घात करीत नाही म्हणजे त्याला दुखवीत नाही आणि मुलगा हा मातेचा घात करीत नाही म्हणजेच तिला दुखवीत नाही.) एक प्रेमानें व दुसरा

आदरानें एकमेकाकडे पहातात वैदिक आर्यांचा असा हा दंडक आहे याच भावनेने 'न मातृसमो गुरु' असे भारतात म्हटले असून 'मातृदेवो भव' असे श्रुतिवाक्य आहे त्या धोरणानें मातृस्वरूप ब्राह्मणाला क्षत्रियाचा गुरु म्हटले यात कोठेंही चुक्ले नाही भारतीय सस्कृतिचा द्वेष करणारानी वाटल्यास ब्राह्मणावर बोटें मोडावीत पण त्यात मातृद्रोहाचे पातक आहे असे श्रुतिमाऊली सांगत, हे आत्मकल्याणेच्छुनी अभिजात भारतीयानी विसरू नय तात्पर्य एका बाजूला प्रेम तर दुसऱ्या बाजूला आदर असा त्यावेळी ब्राह्मण-क्षत्रिय संबंध होता जेथें व जेव्हा या दोन प्रभावी वर्गात ऐक्य व सख्य नांदेल तेव्हाच व तेथेच ब्राह्मणाला मान व क्षत्रियाला राज्य असा रमणीय व स्पृहणीय देखावा दृष्टीस पडावयाचा हे बीज वाक्य प्राचीन वैदिक लोक पूर्ण, अगदी पूर्ण ओळखून होते आणि म्हणून त्याच्या राजवटीत स्वातंत्र्य कामधेनु आनंदानें नांदत होती राष्ट्र सुखी व संपन्न असे असा इतिहासाचा दाखला पाहण्यास मिळतो

या आश्रमातच अनेक विषयाची सूक्ष्म व गंभीर चर्चा झाली अनेक सिद्धांत वसविले गेले व अनेक विषयाची समन्वय सुसंगति लावण्यात आली तेथें जे वादविवाद होत अगर झाले ते सर्व तात्त्विक स्वरूपाचे असून, आजहि त्याना विचारप्रणालीत महत्वाचे स्थान असून, मागें झालेल्या धर्मसंस्थापकाना ते मार्गदर्शक व उपकारक असे ठरले आहेत भगवान बुद्धानी तर ठिकठिकाणी याज्ञवल्क्याच्या पावलावर पाऊल टाकून याज्ञवल्क्याच्या शिकवणीचा भरपूर फायदा घेऊनच आपला धर्म रंगविला व सजविला आहे ज्यानी शतपथाचा विशेषत ऱ्या ग्रंथातील बृहदारण्यकाचा सूक्ष्म व सखोल अभ्यास केला आहे

त्याना आजहि हे सहज कळून येण्यासारखे आहे.* याज्ञवल्क्याची शिकवण किती सुंदर नि समर्पक आहे याची कल्पना यावी म्हणून आजच्या राष्ट्रवादाचे एकच उदाहरण येथें दिले आहे राष्ट्र सुखी व संपन्न कसे व केव्हा होईल म्हणजे ते कसे असावे, याचे लक्षण त्यानी शुक्ल यजुर्वेदातील एका मंत्रात सूचित केले आहे, ते आम्हा भारतीयाना आजहि मननीय आहे

भारतीय राष्ट्राची त्यानी कल्पना मांडून ती रंगवून दाखविली आहे, ती अशी – 'आ ब्रह्मन्ब्राह्मणो ब्रह्मवर्चसी जायतमा राष्ट्रे राजन्य शूर इषव्योऽतिव्याधी महारथो जायतां दोग्धी धेनुर्वोढानड्वानाशु सप्तिः पुरन्धिर्योषा जिष्णू रथेष्ठा सभेयो युवाऽस्य यजमानस्य वीरो जायतां निकामे निकामे नः पर्जन्यो वर्षतु फलवत्यो न ओषधयः पच्यन्तां योगक्षेमो नः कल्पताम् ॥ (शु. य. २२–६२) भावार्थ – हे ब्रह्मन् ! आमच्या राष्ट्रात ज्ञानतेजाने चमकणारे असे तेजस्वी ब्राह्मण निपजोत तसेच आमच्या देशात पराक्रमी, धनुर्धारी व महारथी असे शत्रूला धूळ चारणारे शूर क्षत्रिय निपजोत. आमच्या देशात धष्टपुष्ट अशा चांगल्या दुभत्या गाई निपजोत अत्यंत चपल असे उमदे घोडे निपजोत सर्वांग रमणीय व सद्गुणमंडित अशा लावण्यसंपन्न स्त्रिया उत्पन्न होवोत. अखंड विजयशाली असे अतिरथी, महारथी वीरश्रेष्ठ निपजोत आमच्या यजमानाला म्हणजे राजाला सर्वसमर्थ, सभापंडित व पराक्रमी असा युवराज प्राप्त होवो आमच्या इच्छेप्रमाणे मेघराज आमच्या राष्ट्रावर वेळोवेळी जलवृष्टि करो आणि आम्हा प्रजाजनाचा योगक्षेम सुरळीत चालो' ही प्रार्थना

* याचे सविस्तर विवेचन आमच्या 'बुद्धदर्शन' या ग्रंथात पुढे करणारच आहोत ते वाचकानी अवश्य पहावें.

केवढी सुंदर व भावनामधुर आहे वरें ! यात ब्राह्मण क्षत्रियांचा जो उल्लेख आहे तो लाक्षणिक अर्थानें आहे. सर्व मानव कुलाला तो अनुलक्षून आहे. राष्ट्रांतील प्रत्येक मनुष्य आपापल्यापरी कार्यकुशल व सद्गुणसंपन्न असावा असा त्याचा अर्थ आहे. अशा स्वरूपाचे राष्ट्र ज्यांना लाभलें आहे, 'ते लोक धन्य होत.' असे उद्गार सहजच निघतील. यापेक्षां सुदर राष्ट्राची कल्पना इतक्या थोड्या शब्दांत अद्यापपर्यंत जगांत कुठेंच स्फुरलेली दिसून येत नाहीं.



# याज्ञवल्क्यांची सामाजिक दृष्टि

वैदिक आर्यांची सामाजिक दृष्टि कशी काय होती, याचें सुंदर चित्र योगीश्वराच्या मार्मिक शिकवणीत पहावयास सांपडते. मानवकुलाकडे -- विशेषत भारतीय समाजाकडे वैदिक ऋषींची पहावयाची प्रापंचिक व पारमार्थिक आणि आजच्या भाषेत सांगावयाचें म्हणजे व्यावहारिक व राष्ट्रीय दृष्टि कशी होती, हे नजरेस आणून व तात्विक दृष्ट्या ती कशी असावी, या विषयी योगीश्वरानी जें सुंदर विवेचन मानवजातीला गुण्या-गोविंदानें नांदण्यासाठी म्हणून केले आहे ते विचारवंताला खरो-खर चिंतनीय व अनुकरणीय असेंच आहे. जगातला अत्यंत प्राचीन असा सुधारलेला व प्रगतिपथावर चाललेला मानव समाज म्हणजे वैदिक आर्यसमाज होय. याबद्दल ऐतिहासिक दृष्टचा जगांतील तज्ञ विद्वानांत पूर्ण एकमत आहे. तेव्हां महर्षिच्या स्वानुभावशुद्ध विचारप्रणालीकडे सूक्ष्म, शांत व समतोल दृष्टीनें पाहणें व त्याचें अनुकरण करणें यातच भारतीयाचें उदंड कल्याण आहें असें आम्ही समजतों. भारतीय आचार, अर्थात् भारतीय संस्कृति ही स्वतंत्र, स्वयंपूर्ण व स्वयंजीवि अशी चिरजीव संस्कृति असून, त्या तेजस्वी परंज्योतीवर कालमानानुसार आलेली काजळी झाडून टाकणें, इतकेंच सूज्ञ समाजनायकांचें कर्तव्य आहे. तिची उलथापालथ करूं पाहणें म्हणजे भारताचा सर्वनाश करण्यासारखें आहें. या सामाजिक प्रश्नावर वैदिक ऋषींचा कौल काय मिळतो, तो पाहूं या. अर्थात त्याकरतां योगीश्वरांच्या शतपथ ग्रंथाकडे दृष्टि दिली की, तें पुरे आहे.

एकपेशी प्राण्यापासून विकास पावत पावत जसा मनुष्य-प्राणी पूर्णावयवी बनला. तद्वत् एकावयवी वैदिक आर्यसमाजाचा क्रमानें विकास होत गेला आहे. आणि ही गोष्ट योगीश्वरानीं शतपथांत अत्यंत सुंदर रीतीनें ग्रथित करून ठेवली आहे. ती आजदेखील कोणत्याहि समाजशास्त्रवेत्त्याला कबूल करावी लागेल.

भारतीय वैदिक समाज हा प्रथमारंभीं एकवर्णात्मक म्हणजे ब्राह्मणविशिश्ट असा एकावयवीच होता. ('ब्रह्म वा इदमग्र आसीत्तेदकमेव' श. प. १४-४-२-२३) तो एकटाच असल्यामुळें जागतिक सर्व व्यवहार परिणामकारक रीतीनें घडवून आणण्यास समर्थ होईना. त्या एकांग स्थितींत समाजाचें शारीरिक, बौद्धिक व आत्मिक संवर्धन, संपोषण व संरक्षण जसें व्हावयास पाहिजे तसें त्यास करता येईना म्हणून समाजाचें संरक्षण अधिक सुसूत्र सुव्यवस्थित व्हावें, या उद्देशानें त्यानें आपल्यांतूनच प्रभावी व प्रशस्त असा क्षत्रियवर्ण निवडून तयार केला. ('तच्छ्रेयोरूपम त्यसृजत क्षत्रम' श. प. १४-४-२-२३) हा वर्ण उत्पन्न झाल्यावर समाज सुरक्षित झाला. ही गोष्ट खरी. पण वाढत्या समाजाचें संगोपण करण्याचें कार्य त्याच्याकडून होईना. तो हेतु साधण्यास म्हणून त्यानें आतां पुनः आपल्यातूनच कृषि व वाणिज्य संवर्धक असा वैश्यवर्ण निर्माण केला. ('स विशमसृजत' १४-४-२-२४) पुनः अडचण भासूं लागली ती लागलीच. तीन अवयव झालें तरी ते कार्यक्षम होईनात. म्हणून आतां शूद्र म्हणजे सांगकामे यांचा वर्ण निर्माण केला. इतकें करूनहि कर्तव्यव्यवस्था नीट व नियमित नसल्यामुळें सर्वांना उपकारक व हितकारक होईल असा बंधनात्मक श्रेयोरूप धर्म निर्माण करण्यांत आला. अर्थात्

हा धर्म म्हणजे क्षत्रियाचा देखील नियता आहे म्हणून राजाज्ञे-पेक्षा धर्माज्ञा ही श्रेष्ठ प्रतीची आहे त्यात पुष्कळ तथ्यांश आहे, असे आज जगाकडे पाहून म्हणण्यास काही धर्मांचे प्रमाण आहे हा भारतीय समाज जव्हा चतुर्वर्णात्मक झाला तेव्हा तो सर्वांग परिपूर्ण होऊन समर्थ व कार्यक्षम झाला हा भारतीय समाजाचा विकास मानवतेचा नैसर्गिक व स्वाभाविक विकास असून त्याची छाप जगातील कोठल्याहि मानववंशावर कमी अधिक प्रमाणात पडलेली दिसून यते वैदिक आर्यांचे जे निरनिराळे वर्ण झाले त्याचा परमार्थाशी फारसा संबंध नसून जगातील सर्वमानव समाजाचे जीवन सुंदर व सुखकर व्हावं एवढाच त्यात उद्देश आहे असे आम्हास वाटते हे सर्व वर्ण प्रपंचात परस्परास उपकारक व हितकारक होऊन सर्वांना त्यात ऐहिक व पारमार्थिक अभ्युदय व नि श्रेयस यथाशक्ति व यथामति साधता येऊन त्याचा हा मानवजन्म कृतकृत्य व्हावा अशी उदात्त योजना या वर्णव्यवस्थेच्या बुडाशी गर्भित आहे

गुलाबाच्या पाकळ्या जरी भिन्न भिन्न दिसल्या तरी फूल जसे एक, दाणे वेगळे वेगळे असले तरी डाळिंब जसे एक, मोती वेगळे असले तरी हार जसा एक, तद्वत वर्ण अगर जाति जरी व्यवहार दृष्टया भिन्न भिन्न असल्या व दिसल्या तरी परमार्थत भारतीय मानवकुल एक व अखंड, ही दिव्य भावनाच पूर्वी स्फुरत होती आणि म्हणूनच वैदिक राष्ट्र त्यावेळी जगात प्रभावी व तेजस्वी म्हणून गाजून गेले शरीरातील निरनिराळ्या अवयवाना सर्वत्र खेळून चैतन्य व सामर्थ्य देणारे शरीरातील रक्त जसे एक तद्वत् भारतसमाजोद्यानातून निरनिराळ्या ताटव्यातून वाढलेल्या लहान थोर विविध जातिरूप झाडझुडपाना सुंदर टवटवी व मधुर

तजेला देणारे अमृतसदृश धर्मरूपी पवित्र जीवनहि एकच असल्यामुळें तो धर्म एके काळी स्वर्गातील नंदनवनाप्रमाणे फुलून व खुलून दिसत असला तर त्यात नवल ते काय ?

हें आम्ही आज काहींतरीच सांगतो असें मात्र कोणी समजू नये योगीश्वरानीच ही गोष्ट आज पाच हजार वर्षांपूर्वीच स्पष्ट सांगून टाकली आहे समाजात हा वर्णोत्पत्ति व्यवहार व्यवसायमूलक अस्तित्वात आलेला असला तरी तो समाज काही परमार्थत भिन्न व तुटक नाही, धर्म व संस्कृतिदृष्ट्या तो एक नि अखंड आहे, असे वैदिक ऋषीचे स्पष्ट मत आहे 'इदं ब्रह्म, इदं क्षत्रं इमे लोका इमे देवा इमानि भूतानि इदं सर्वं यदयमात्मा' ( श प १४–५–६ ) हे ब्राह्मण, हे क्षत्रिय, हे देव, हे भूतजात, हीं सर्व आत्माच प्रत्यकाच्या अतर्यामी राहणारा हा परमात्माच आहे म्हणजे हा सर्व मानवी समाज व्यवसायत भिन्न दिसला तरी वस्तुत आत्मरूपच–अर्थात् एकच आहे यापेक्षा स्पष्ट आणि सरळ असे आणखी अधिक त काय सागावयाचे राहिले ? विविधत्वात एकत्व, अविभक्त विभक्तेषु पाहण्याची पारमार्थिक दृष्टि काय ती ही हिलाच आधुनिक भाषेत राष्ट्रीय दृष्टि म्हणतात. मानव्य दृष्टि म्हटल तरी चालेल ही धर्मभावना, ही प्रेमभावना, ही ऐक्यभावना, ही विश्वभावना, ही आत्मभावना जर मदावली, बिघडली, मावळली तर तेथें लाभप्रेरित, स्वार्थप्रचुर जातीयतेचा, प्रातीयतेचा, अराष्ट्रीयतेचा भस्मासुर हटकून त्या समाजाचा अगर राष्ट्राचा सर्वनाश केल्याशिवाय राहणार नाही हा इशारा वरील वचनात गर्भित आहे, हें शहाण्यानी विसरू नये

अनेक लहान थोर व्यक्तींचे मिळून एक कुटुंब होते. अशा अनेक कुटुंबाची समान व्यवसायामुळें एक ज्ञात बनते आणि

अशा अनेक जातीचा मिळून एक गाव होतो अशा अनेक गावाचा एक प्रात व अनेक प्राताचा एक देश अगर एक राष्ट्र होते. प्रपचात वैयक्तिक अगर कौटविक हिताहिताच्या दृष्टिने विचार करणे इष्ट व योग्य असले, तरी ज्यावेळी गाव, प्रात, देश अगर राष्ट्र अशा सामुदायिक दृष्टिने विचारविनिमय करावयाचा असतो तेव्हा व्यक्ति, कुटूंब अगर इतर घटकाचा पृथक्श विचार करीत न बसता, व्यापक व सामुदायिक हिताहिताच्या दृष्टीनेच तो केला पाहिजे आणि हीच वैदिक भाषेत परमार्थदृष्टि होय आणि यालाच आज आपण राष्ट्रीय दृष्टि म्हणतो ही दृष्टि मनुष्यान जसजशी विकास पावत जाईल तसतशी त्याची योग्यता व अधिकार परमार्थानहि वाढत जातो आणि होनाहोता शेवटी तो विश्वकुटुंबी होऊन,' हे विश्वचि माझ घर ' अशी दिव्य घोषणा करू लागतो हाच महात्मा नि हाच महर्षि 'इद सर्व यदयमात्मा' हे महर्षि योगीश्वराचे विश्वसग्राहक व विश्वप्रेमात्मक दिव्य वचन सतत डोळ्यापुढें ठेवून आम्ही आत्मोपम्य दृष्टीने राष्ट्रीय व सामाजिक प्रश्न सोडवावयास बसू तर खरोखर केवढी बरे मौज होईल

ही वर्णोत्पत्ति व वर्णव्यवस्था समाजाच्या व राष्ट्राच्या हिताकरता, कल्याणाकरता, उत्कर्षाकरता व उद्धाराकरता म्हणून निर्माण करण्यात आलेली आहे, ही मगल भावना डोळ्यापुढे न ठेविता जर कोणी स्वार्थनिष्ठ विशिष्ट वर्गीय जातीयतेचें भूत उठवू पाहील तर त्यापासून कोणाचेंच हित न साधता, सर्वात्राच नाश मात्र ओढवेल, ही गोष्ट समाजनेते म्हणविणाऱ्यानी ढळढळीत आपल्या डोळ्यापुढें सदैव ठेवली पाहिजे

याज्ञवल्क्य असा गभीर इशारा देतात की, 'ब्रह्म तू परादद्यायोऽन्यत्रात्मनो ब्रह्म वेद' आपण वेगळे आणि ब्राह्मण

वेगळे असें जे समजतात त्यास ब्राह्मण दूर करतात (श प १४–५–४–५) आणि आपण वेगळे आणि क्षत्रिय वेगळे असे जे समजतात त्यास क्षत्रिय दूर करतात ('क्षत्र त परादाद्योऽन्यत्रात्मन क्षत्र वेद' १५–५–८–५ ) आणि याच न्यायाने आपण वेगळा व वैश्य वेगळे असे जें समजतात त्यास वैश्य दूर करतात व आपण वेगळे व शूद्र वेगळे असे जे समजतात त्यास शूद्र दूर करतात ('लोकास्त परादुर्योऽन्यत्रात्मनो लोकान्वेद' १४–५–४–५ ) आणि आपण वेगळा आणि हे सर्व जग वेगळें असे जो समजतो त्यास सर्व जगच व हे सर्वभूतजात दूर करते ही याज्ञवल्क्याची पथ्यकर व विश्वमगल शिकवण डोळेझाक करून, क्षुद्र जातीयतेच्या व सकुचित प्रातीयतेच्या वेडाने भडकून जाऊन भलते सलते चाळे करीत गल्यास समाजस्वास्थ्य कोलमडून पडून राष्ट्राचा सर्वस्वी घात मात्र होईल भारतीय समाजाचा हा जो स्वाभाविक वर्णविकास झाला आहे त्याच्या बुडाशी विराट पुरुषाची देहकल्पना आहे त्या विराट पुरुषाला मुख, बाहू, माड्या, पाय इत्यादि जसे अवयव आहेत, तद्वत भारतीय समाजपुरुषाचे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे चार प्रमुख अवयव असून त्याच्या परस्पर सहकार्याने व सहानुभूतीने तो समाजपुरुष जगणारा व कार्यक्षम होणारा आहे हे न समजण्याइतका भारतीय समाज निर्बुद्ध झाला आहे असे अजून आम्हास वाटत नाही. 'सर्वे सुखिन सन्तु' ही मगल भावनाच भारतीय वर्णव्यवस्थेच्या बुडाशी स्फुरत आहे योगीश्वराची ही शिकवणूक इतकी तेजस्वी, प्रभावी, व्यापक व शास्त्रशुद्ध आहे की, सर्व विद्वज्जग त्यास हिंदु तत्वज्ञानाचे जनक (Father of Hindu Philosophy या महनीय नावाने ओळखते

---

# सुशील आर्यगृहिणीचा आदर्श

एका प्रसगी याज्ञवल्क्यानी पुढील गोष्ट सागितली ती मोठी उद्‌बोधक आहे

भृगु ऋषि हे स्वर्गास गेले तेव्हा त्यानी आपल्यापैकीच भार्गवच्यवन ऋषीस बरोबर न घेता त्याला येथच पृथ्वीवर ठेऊन आपण एकटेच त्या दिव्य लोकावर निघून गेले अरेरे विचारा च्यवन जख्खड म्हातारा, अगदीच गळाठलेला, जवळ जवळ पिशाच्च- रूपच बनला होता,असेच का म्हणाना ! एकटाच कसावसा कालक्रमणा करीत होता मात्र एवढी गोष्ट खरी की, तो महा तपस्वी होता शरीराने अगदीच थकला भागला असला तरी त्याचे तप सामर्थ्य मात्र फार प्रखर होते आपल्या तप प्रभावाने बसल्याबसल्याच तो आपली इच्छा तृप्त करून घेत असे

एकदा असे झाले की, शर्यात मानव हा काही लोकानिशी फिरत फिरत जेथे च्यवन राहत होता, तेथे जवळच काही अतरावर येऊन काही दिवस तळ देऊन राहिला एके दिवशी त्याची मुले सहज फिरत फिरत त्या म्हाताऱ्यापाशी आली च्यवनाचे ते अभद्र व विचित्र रूप पाहून त्यानी त्याची पोरस्वभावाला अनुसरून टिंगल व टवाळी चालविली व मधुन मधून मातीच्या ढेकळाचा त्याजवर वर्षावहि करण्यास काही कमी केले नाही !

विचारा च्यवन, अगदी म्हातारा, जणु काही पिकलेले पान, एकटाच, जवळ कुणी नाही अशी जरी परिस्थिति होती तरी तो साधासुधा नव्हता त्या आडमुठ्या मुलांनी केलेली थट्टा-कुचेष्टा व खोड्या पाहून ब्राह्मण भयकर चिडला व सतापला वैदिक ऋषी हे जितके शात, तितकेच ते तापट, जितके दयाळू

तितकेच कठोर असतात. प्रसन्न झाले तर वाटेल तें देतील नि रुष्ट बनले तर पाताळात दडपतील. त्यांची वाणीही तशीच प्रखर नि प्रभावशाली असे. मुलानी केलेल्या या अपराधाचे उट्टें शर्यातीवर काढण्याचें ठरवून त्यांनी शर्यातीच्या परिवारांत व वरोवरच्या लोकांत तपःसामर्थ्याने नसतें भांडण उपस्थित केलें.

शिबिरांत पहावें तिकडे भांडणच भांडण झाले. भावाभावात भांडण, वहिणीवहिणीत भांडण, भावावहिणीत भांडण, बापामुलांत भांडण, मायलेकीत भांडण, नवराबायकोंत भांडण, वायकावायकात व पुरुषापुरुषांत भांडण घरोघर भांडण! यामुळें त्याचे सर्व व्यवहार जवळजवळ बंद पडून अखेर अन्नपाण्याचीसुद्धा भ्रांत पडली. कोणी कोणाचें ऐकेना व कोणी कोणाला जुमानी ना. सगळा एकच गोंधळ नि एकच गडबड उडाली!

हा चमत्कारिक प्रकार पाहून शर्यातास मोठा विचार पडला. आतांपर्यंत सर्व लोक गुण्यागोविंदाने नांदत असतां ही मधेंच भांडण्याची धावटळ अशी कां उद्‌भवावी, याचें गूढ त्याला उकलेना. आपल्याकडून कोणातरी सत्पुरुषाचा छळ वा अवमान तर झाला नसेल ना, किंवा देवांचा कांहीं अपराध तर घडला नसेल ना, अशी शंका मनात उद्‌भवून, पुढें त्यानें त्याप्रमाणें चौकशी चालविली. कांही गोपालांच्या व धनगरांच्या मुलांकडून आपल्या मुलांनी एका म्हाताऱ्याची टिंगल करून त्यास ढेंकळांनी मार दिल्याचे समजलें. तो मनांत फारच चपापला. कारण च्यवनऋषीचा आश्रम जवळच होता व त्याची खात्री झाली की, तो म्हातारा म्हणजे दुसरा कोणी नसून महातपस्वी च्यवन ऋषिच होय.

लागलीच त्याने आपला रथ जोडला व बरोबर आपली मुलगी सुकन्या हिला घेऊन, च्यवन होता तेथें तो आला दुरूनच च्यवनास पाहून तो रथावरून खाली उतरला व पायीच त्या ऋषीजवळ गेला शर्याति राजा म्हणजे मोठा विद्वान व तसाच कर्मयोगी असल्याने च्यवनाची योग्यता तो जाणून होता जवळ गेल्यावर हात जोडून तो ऋषीस म्हणाला, 'महर्षे, नमस्कार असो. माझ्याकडून एक मोठा अपराध झाला आहे तो आपण क्षमा करून पोटात घालावा माझ्या मुलानी आपली योग्यता न जाणता पोरबुद्धीने आपला अपमान व अपराध केला आहे टवाळी करून अनादर केला आहे तो सर्व माझाच अपराध आहे ती माझीच चूक आहे हे जे पातक मजकडून घडले, त्याची मला क्षमा करा. माझ्या अनुयायात जी वडाळी व भांडण माजली आहेत ती सर्व थांबावीत व ते सर्व पूर्वीप्रमाणे गुण्यागोविंदान नांदावयास लागावेत अशी विनती आहे

च्यवन–त्याबद्दल तू मला काय देशील ?

शर्याति–ही माझी मुलगी सुकन्या आपणास देत आहे ती चांगली उपवर झाली असून तिचा आपण पत्नी म्हणून स्वीकार करावा आणि मला धन्य करावे आपल्याजवळ दुसर कोणी माणूस नसल्यामुळे असा प्रकार घडतो पुन आता असे घडू नये व आपली सेवाचाकरी योग्यरीतीने व्हावी या इराद्याने ही माझी कन्या आपणास अर्पण करीत आहे ती दक्ष राहून आपली सेवा-चाकरी करील

असे म्हणून त्याने तिला च्यवनाच्या स्वाधीन केले व त्याचा अनुग्रह घेऊन तो तेथून निघाला सुकन्या तेथेंच राहिली स्वस्थानी परत येऊन राजा पहातो, तो मौज ही की, लोकाचे सर्व व्यवहार पूर्वीप्रमाणेच सुरळीत व सुसूत्र चालेले होते.

या सुमारास अश्विनीकुमार हे रोगग्रस्तांचे रोग बरे करीत त्या प्रदेशांतून संचार करीत होते. फिरत फिरत ते च्यवनाच्या आश्रमास आले व तेथें त्यांना सुकन्येची गांठ पडली. बोलून चालून सुकन्याच ती. सौंदर्याची मोहक पुतळी होती. तिच्या त्या अप्रतिम लावण्याकडे पाहून ते मोहित झाले व तिची प्रेमयाचना करूं लागले. अश्विनीकुमार म्हणजे तितकेच सुंदर व अत्यंत मनमोहक होते हें सांगायला नकोच.

ते तिला म्हणाले–सुकन्ये, तूं इतकी सुंदर व तरुण असून इथें अशी एकटीच काय म्हणून ? तो पलीकडे थेरडा डोळे झांकून झोंपा काढीत आहे, तो तुझा कोण ? आजा कां पणजा ?

सुकन्या–आजाहि नव्हे नि पणजाहि नव्हे.

अश्विनीकुमार–मग कोण तर ?

सुकन्या–माझे पतिदेव.

अश्विनीकुमार–आं ! तो तुझा पति, तुझा प्रेमदेव ! ! काय म्हणतेस तरी काय तूं सुकन्ये ?

सुकन्या–अहो तो माझा प्राणवल्लभ आहे. पतिदेव आहे.

अश्विनीकुमार–छे ! भलतंच कांहीं तरी ! तुला आईबाप आहेत कीं नाहींत ? कां तूं एकटीच आहेस ?

सुकन्या–मला आईहि आहे. बापहि आहे.

अश्विनीकुमार– नांव त्यांचें ?

सुकन्या–बापाचें नांव शर्याति.

अश्विनीकुमार– राजा शर्याति का ?

सुकन्या–हूं. तोच माझा बाप !

अश्विनीकुमार–मग तूं राजकन्या ?

सुकन्या–हो तसंच.

अश्विनीकुमार–मग इथ काय म्हणून ?

सुकन्या–मला इथ दिली म्हणून.

अश्विनीकुमार–त्यानी तुला या थेरड्याला दिली ?

सुकन्या–अहो अस बोलू नका. माझ्या देखत तरी बोलू नका. ते माझे पतिदेव आहेत.

अश्विनीकुमार–अहाहा ! काय पतिदेव. कसला प्राणनाथ. वेडीतर नाहीस ना तू

सुकन्या–मला वेडीच समजा.

अश्विनीकुमार–नाही तर काय ? अहाहा, काय रूप, काय ध्यान, पिशाचच आहे, पिशाच्च ! असल्या मढ्याशी कसला ग तुझा संसार ? कसला प्रेमव्यवहार ! तो काय सुखाचा म्हणावा? सुकन्ये, शाहणी असलीस तर दे त्या थेरड्याला टाकून नि चल आमच्या बरोबर. आपण खूप मौजेत राहू व चैनच चैन करू.

सुकन्या–तुम्ही कोण ?

अश्विनीकुमार–आम्ही होय ? आम्ही अश्विनीकुमार.

ती खरी आर्य स्त्री व खरी पतिव्रता होती. तिने हे सर्व ऐकून घेतले आणि शातपणे उत्तर दिले.ज्याला,माझ्या पित्याने पति म्हणून मला एकदा दिली, तो कसा जरी असला तरी तो माझा देवच. तोच माझा प्राणनाथ. आणि तोच माझा प्रेमदेव.. तो जिवंत असेतोपर्यंत त्याला मी सोडणार नाही. त्याला मी टाकणार नाही. तुम्ही येथून मुकाट्याने चालते व्हा. हे तिचे खणखणीत उद्‌गार ऐकून बिचारे हिरमुसले होत्साते आल्यावाटेने परत निघून गेले.

अश्विनीकुमार तेथून निघून गेल्यावर च्यवन सुकन्येला हाक मारून म्हणाला, 'सुकन्ये, आतां आलेले पुरुष कोण ? त्यांनीं तुला काय विचारलें ?' तिनें घडलेली सर्व हकीकत त्यास पूर्ण निवेदन केली. ती सर्व ऐकून घेऊन अश्विनीकुमारांची योग्यता जाणून, आपला फायदा व त्यांची फजीति होईल, अशी एक युक्ति योजून तिला म्हणाला–सुकन्ये, हें वघ, ते पुनः तुझ्याकडे केव्हां तरी येतील नि पुनः असाच लोचटपणा करतील. तर त्यावेळीं तूं त्यांना एकदम अशी धुडकावून देऊं नकोस. त्यांच्याशी बोल. असें म्हणून च्यवनानें सुकन्येला पुढें काय बोलावयाचें याचें मार्गदर्शन केलें.

सुकन्येनेंही त्याबद्दल अनुमति दिली.

कांही दिवसांनी च्यवनानें म्हटल्याप्रमाणें पुनः ते तिच्याकडे आले आणि पुनः तिला तेच प्रश्न विचारूं लागले. तेव्हां ती त्यांना म्हणाली–' कुमार हो, काय म्हणावें तुम्हांला ? माझ्या पतीची निंदानालस्ती करतां, उणंपुरं काढतां, पण तुम्ही तरी असे कुठें सर्व-संपन्न आहा. तुमच्यांतहि व्यंग आहेच कीं नाहीं ?

अश्विनीकुमार–आं ! व्यंग, आमच्यांत व्यंग, काय म्हणतेस हें तूं सुकन्ये ! आम्ही अश्विनीकुमार म्हणजे–मनुष्यांतीलच नव्हे, तर देवांतले सुंदरांतील सुंदर, कमलासारखे मोहक नि मदनासारखे मनोहर आहोंत. अशांना नांव ठेवतेस,काय म्हणावं तुला ? तूं आंधळी तर नाहींस ना ?

सुकन्या–नाही. मी आंधळी नाही. मला सर्व कांहीं दिसते आहे. पण तें राहूं द्या. तुमची स्तुति मला नको. कृति पाहिजे. असेल सामर्थ्य तर दाखवा माझ्या पतीला आधी तरुण करून. आणि मग सांगेन तुमच्यांत काय उणें आहे तें.

अश्विनीकुमार–आमच्यात काय उण पाहिलेस तू ?

सुकन्या–उगीच ताडदेखल बोलून फसण्याइतकी मी काही वेडी नाही आपल्यात तसे सामर्थ्य असेल, तुम्ही खरोखरच देवाप्रमाण सर्वसपन्न असाल तर मी सागितलेल करून दाखवायला काय हरकत आहे ?

अश्विनीकुमार–तुझ्या पतीला तरुण करून दाखवाव, इतकेच ना ? त्यात ग काय मोठस आहे

सुकन्या–बढाई नको, कृति पाहिजे शितावरून भाताची परीक्षा मग कळू दे की आपला प्रताप पडू दे उजेड

अश्विनीकुमार–तर तुझ्या म्हणण्याप्रमाणेच कृति करून दाखवितो या अश्विनीकुमाराचा प्रभाव तर पहा आणि तो चमत्कार आम्ही आताच करून दाखवितो तो पलीकड तलाव आहे ना ? त्या तलावात तुझ्या पतीला नेऊन बुडव चागल्या पाण्यात बुडव म्हणजे ज्या वयाचा व ज्या रूपाचा त त्याला होऊ इच्छिशील, त्या वयाचा व त्या रूपाचा होऊन तो वर येईल ! सुकन्ये, खोट नाही जा आणि आमच्या म्हणण्याची प्रतीति पहा तुला आमची कृति हवी ना ? जा तर

सुकन्येन त्याप्रमाणे केले आणि काय चमत्कार ! तो जरखड म्हातारा च्यवन खरेखरच मदनाचा पुतळा होऊन वर आला ! ते त्याचे अलौकिक तारुण्य आणि तेज व मधुर दृश्य पाहून सुकन्या हर्षाने स्तंभितच झाली तिचे डोळे धन्य झाले ती आनदित झाली व तिच्या ओठावर मधुर हास्य झळकले

इतक्यात कुमार तेथे आले व म्हणाले, " सुकन्ये, आमची परीक्षा पाहिलीस ना ? तुझी अट आम्ही पूर्ण करून दाखविली आता साग आमच्यात काय उणे पाहिलेस तू,

ती विचारी काय सांगणार ? पतीनें सांगितलें होते तेवढें ती बोलून गेली. पुढचा रस्ता तिला काय माहीत ? हसत हसत च्यवनाकडे पहात ती स्तब्ध उभी राहिली. च्यवनानें हें ओळखले व लगेच पुढे होऊन म्हटलें, "कुमार, मी सांगतो तुमच्यात काय उणें आहे ते. तिकडे पलीकडे कुरुक्षेत्र आहे. तेथें देव हल्ली यज्ञ करीत आहेत. त्या यज्ञात त्यांनी तुम्हाला बहिष्कृत केले आहे. अर्थात तेथे तुम्हांला हविर्भाग मिळत नाही. मग हे व्यंग काय कमी समजता ? या दृष्टीने तुम्ही 'अपूर्णच आहात.' असर्व आहांत. तेव्हा दुसऱ्याना हिणविण्याचें कारण नाही." हे ऐकून बिचारे अश्विनीकुमार निरुत्तर झाले व तोंड आंबट करून आले तसे चालते झाले.. (श. प. ४-१-५ ते ९)

# योगीश्वरावर एक संकट

एके दिवशी याज्ञवल्क्य हे अगदी पहाटेस उठून सहज बाहेर फिरावयास म्हणून आश्रमाच्या बाहेर पडले पहाटेची वेळ होती. सुगध व शीतल असा वायुराज मद मद वाहत होता पक्ष्याच्या विविध किलकिलाटाने आसमतातील सर्व भाग दुमदुमून गेलेला होता आकाशात आरक्त अरुणकाति नुकतीच डोकावत होती जिकडे तिकडे प्रसन्नतेने वातावरण खुलून राहिले होतें अशा प्रशात वेळी ते एकटेच फिरत फिरत मिथिला नगरीच्या बाहेर पडले. थोडयाच अतरावर वृक्षाच्छादित अशी एक लहान टेकडी असून तिच्या सभोवती वन्य वृक्षाची गर्द झाडी पसरली होती. याज्ञवल्क्य टेकडीवर चढून आसमतातील सृष्टिसौन्दर्यावर दृष्टी फिरवीत थोडावेळ एका झाडाखाली उभे राहिले तेथे त्यास समाधि लावून बसण्याची ल्हर आली मग विलब कसला ? प्रशस्त जागा पाहून तेथे त्यानी बैठक घातली व लवकरच समाधि लावून तल्लीन झाले.

तो प्रदेश झाडाझुडपानी अत्यत गजबजलेला असल्याने वन्य श्वापदाचे जणु ते एक माहेरघरच बनले होतें. दिवसासुद्धा तेथें फिरकावयाची मोठी भीतीच ! पण याज्ञवल्क्याना काय ल्हर आली कोण जाणे, ते आज तिकडे गेले व तेथेंच समाधिस्थ होऊन बसले. सगळा निर्जन प्रदेश, सभोवती क्रिर झाडी, मनुष्यप्राण्याचा सचार नसायचा समाधि लावून बसल्यावर योगायोगाने म्हणा एक हिंस्र श्वापद सावज शोधीत शोधीत तेथें आले व त्याची क्रूर नजर योगिराजावर गेली. नरमास भक्षणास चटावलेला तो एक मोठा वाघ होता वाघासारखा क्रूर व हिंस्र असा भयंकर

प्राणीच नाही. मनुष्याचा वास येतांच याज्ञल्क्याकडे टक लावून व शेपूट वळवीत नखें उगारून शिकार साधण्याची तयारी त्यानें चालविली. त्याला तें मधुर मिष्टान्न होते खरे पण ते याज्ञल्क्यावरील प्राणसंकटच !

' वाघ आतां शेपूट वळवीत व अंग हलवीत अचूक झेंप घालण्यासाठी वर उठणार इतक्यात एक तीर सू सू करीत त्या झाडीतून त्याच्याकडे आला व नेमका त्याच्या एका डोळयात शिरून बसला. तसाच दुसराही एक तीर मागोमाग येऊन अचूक त्याच्या दुसऱ्या डोळयाचा त्याने ठाव घेतला. पुढें लागोपाठ एकामागून एक असे तीन बाण येऊन त्याच्या शरीरात रुतून बसले ! वाघाने एक भयंकर डरकाळी फोडली ! आणि अंतकालच्या असह्य वेदनामुळें व्यथित होऊन तो तेथून सावज सोडून सैरावैरा रानात धावत सुटला व अरण्यात नाहीसा झाला. योगीश्वराकडून यापुढें पुष्कळच कार्य व्हावयाचे होते आणि म्हणूनच ते या प्राणसंकटातून बचावले.

वाघाच्या मरणवेळेच्या किंकाळीने योगीश्वराची समाधि भंग पावली. डोळे उघडून पाहतात तो सूर्यनारायण उदयगिरीवर चमकू लागला होता. डोळयाला वाघ दिसत नव्हता. पण त्याची प्राणांतक किंचाळी मात्र ऐकू येत होती चटकन् ते वर उठून उभे राहिले तो इतक्यात प्रधानजी 'मित्र' झाडीतून आपणाकडेच येत असलेले दिसले त्यांना पाहून हळु हळु पावले टाकीत ते पुढें चालूं लागले. दहा पांच पावलें पुढें गेले असतील नसतील तोच प्रधानजी त्यांना येऊन मिळालेच.

मित्राच्या मागून दोन क्षत्रिय वीर ( अर्थात् हे प्रधानजीचे शरीररक्षक होते. ) हातात धनुष्यबाण घेऊन आपापसात कांहीं

कोम्हत चालत येत होते, त्यानीच वाघाला दुरून पाहून चटकन् खांद्यावरचे धनुष्य उचलून त्यावर बाणाचा अचूक प्रयोग केला होता या शिकारीबद्दलचे त्याचे सभाषण चालले होते मित्र जवळ आल्यावर त्यानी वाघाची शिकारीची हकीकत याज्ञवल्क्याना सांगितली व त्या क्षत्रीय वीराच्या नेमराजीचे कौतुक करून त्याच्या कौशल्याचे वर्णन केले. ही हकीकत ऐकून याज्ञवल्क्याना मोठा आनद झाला व आपले प्राण वाचविल्याबद्दल त्यास त्यानी कृतज्ञतापूर्वक धन्यवाद दिले. सर्व मिळून मिथिलेच्या रस्त्यास लागले. याज्ञवल्क्य एका मोठ्या आपत्तीतून निभावले, हा दैवयोगच म्हणायचा



# कुमारी मैत्रेयी

कुमारी मैत्रेयी ही जनक राजाच्या 'मित्र' प्रधानजीची मुलगी ती अजून अविवाहितच होती. प्रसिद्ध विदुषी गार्गी वाचक्नवी ही तिची मावशी म्हणजे तिच्या आईची बहीण. ही आजन्म कुमारीच होती तिने मैत्रेयीस जवळ ठेवून घेऊन मोठ्या वात्सल्याने तिला वाढविले होते व तिला धार्मिक शिक्षण देऊन सुविद्य व सुचरित्र केले होते ती या सुमारास आपल्या बापाच्या घरी रहावयास आली होती

त्याकाळी मुली प्रौढ झाल्यावरच त्यांचा विवाह होई. बालविवाह प्रचारात नव्हता सुकन्या, सुभद्रा, रुक्मिणी, द्रौपदी, सीता वगैरे मुली विवाहाच्या वेळी चागल्या नवतरुणीच होत्या. अशी इतिहास पुराणाची ढळढळीत साक्ष आहे मैत्रेयी जरी उपवर झाली होती तरी तिचे मन अजून विवाहसुखाकडे झुकावें तसे झुकले नव्हते मावशीजवळ राहून ते जवळजवळ मावशीच्या वळणावरच गेले होते आणि ससारसुखाचा ध्यास तितकासा तिला लागलेला नव्हता

अरण्यातील वाघाच्या प्राण-सकटातून सुटल्या दिवसापासून याज्ञवल्क्य व मित्र प्रधानजी याच्यात एकमेकाकडे ये जा होऊन त्याचा घरोबा वाढत चालला. प्रथमपासूनच मित्र प्रधान हे याज्ञवल्क्यांचे मोठे चाहते व अभिमानी असून अधूनमधून सवडी-प्रमाणे ते याज्ञवल्क्याकडे जात येत असत. स्वत मित्र हे मोठे वेदज्ञ व शास्त्रज्ञ होते प्रसगोपात ते याज्ञवल्क्याशी ग्रथरचना कार्यात वेळोवेळी चर्चा करून त्याना उपयुक्त सूचनाहि देत. याज्ञवल्क्यांचे अगाध वेदज्ञान, सूक्ष्म व सखोल अध्यात्मपरिचय,

ग्रथरचना कौशल्य, विविध शास्त्रीय माहिती व प्राचीन इतिहास पुराणादिकाचे मार्मिक ग्रहण या सर्व आश्चर्यकारक गोष्टी पाहून ते फार चकित व आनदभरित झाले होते तसेच याज्ञवल्क्याचे विविध ज्ञानभाडार, प्रतिभासौंदर्य, कर्मकौशल्य, वर्चाप्टुत्व पाहून प्रधानजीच्या भाविक अत करणात त्याच्याविषयी नितात प्रेम, भक्ति व श्रद्धा रुजून राहिल्यास त्यात आश्चर्य नाही याज्ञवल्क्याच्या मनातहि प्रधानजीविषयी प्रेमादरभाव जागृत होऊन ते प्रधानजीकडे आत्मीयतेने पहात कधी कधी ग्रथरचनेत त्याचा सल्लाहि घेत तशात अरण्यातील प्रसगाची भर पडून दिवसेदिवस त्या दोघात आत्मीयता वाढीस लागली, हे साह जीकच आहे

याज्ञवल्क्य मित्र प्रधानजीकडे आले म्हणजे त्याचा दर्शनलाभ मैत्रेयीला वारवार घडे बापाचे व त्याचे सभाषण चालले असता दाराआड उभी राहून त्याचा सवाद ऐकण्यात तिला मोठी हौस वाटे कारण तो सवाद तसा उद्बोधक व मनोरजक असे दिवसेदिवस तिचे मन याज्ञवल्क्याकडे अधिकाधिक ओढ घेऊ लागले एके दिवशी याज्ञवल्क्याचा आश्रम पाहण्याची तिला इच्छा झाली बापाजवळ ती गोष्ट काढल्यावरून त्यानी तिला सधि साधून आश्रमाकडे नेले तेथे गेल्यावर चौकशी करता गुरुदेव पाठशाळेत आहेत असे कळल्यावर ते पाठशाळेकडे वळले व मैत्रेयी ही बाहेरच उभी राहिली त्याच वेळी याज्ञवल्क्याची गृहदेवता कात्यायनी ही दारातच समोरच्या पुष्पवाटिकेकडे पाहत उभी होती मैत्रेयीला बाहेरच उभी असलेली पाहून स्मित हास्य करून तिच्याजवळ जाऊन तिला आदराने ती आश्रमात घेऊन गेली

या ठिकाणी थोडेसे कात्यायनी व मैत्रेयी यांच्या प्रकृति व स्वभावाविषयी दोन शब्द लिहिणें हे इष्ट आहे या युवतीद्वयाचे चित्र कसे व किति रेखाटावे ? दोघीहि आपआपल्या परीनें सुंदरच होत्या कात्यायनी ही तर अगदी तरूणच असून तिचा वर्ण सोन्यासारखा व चेहरा गौरीसारखा मनोहर होता. अगानें जरा स्थूल असल्यामुळें उंचीला ती किंचित् ठंगणी दिसत होती. मुखावर तारुण्याचे तेज उजळत होतें मैत्रेयी ही अगानें सडपातळ असून, तिचा रंग स्फटिकासारखा होता त्यामुळें तिचे रूप लावण्यहि तितकेंच आकर्षक होतें तिचे डोळे कमलासारखे विशाल व रेखीव असून त्यात विलक्षण तेज चमकत होतें. थोडक्यात सांगावयाचे म्हटले तर एक लक्ष्मी तर दुसरी सरस्वती होती

रूपात दोघीहि जरी सुंदर व मनोहर होत्या, तरी त्यांच्या स्वभावात मात्र विलक्षण फरक होता. कात्यायनी ही साधीसुधी व सामान्य स्त्री असून तिचे सगळे लक्ष्य प्रापंचिक विषयात गुंतलेले असे मात्र ती अंतःकरणाची मोठी कोमल व मायाळू असे स्वभाव उदार व उमदा होता ती सर्वांबरोबर खेळीमेळीनें व गोडीगुलाबीने वागे हाताची सढळ व मनाची थोर, मनोरंजक व करमणुकीच्या कथा, गोष्टी ऐकण्याचा तिला मोठा छंद धर्माच्या व तत्त्वज्ञानाच्या गोष्टी म्हणजे तिला फार वावडया वाटत तिचा पतिराज म्हणजे प्रत्यक्ष बृहस्पतीचा अवतार त्यांच्या तोंडून धर्म व तत्त्वज्ञानविषयक व्याख्यानें, प्रवचनें, उपन्यास, इतिहास, पुराणादि ऐकण्यास लोकांच्या उड्यावर उड्या पडत. पण कात्यायनीला त्या सर्व गोष्टी ऐकण्याचा मोठा कंटाळा असे. प्रापंचिक व गृहकृत्यात मात्र तिची हौस दांडगी असून रात्रंदिवस

तिचा जीव त्यांतच घुटमळत असे. आश्रमांतील धान्य कोठारांवर, गोठ्यातील गायीगुरांवर, बागेतील झाडफुलांवर व मळ्यांतील भाजीपाल्यावर तिची करडी नजर असे. प्रत्येक वस्तु चांगली, स्वच्छ, जिथल्या तेथें ठेवण्यांत ती लक्ष घाली. यज्ञशाळेंतील व्यवस्था नि स्वच्छता ती मन लावून चोख ठेवीत असे. ती खरीखुरी गृहिणी होती. 'अस्मिन् गृहे गार्हपत्याम जागृहि' हा आर्यगृहिणीचा सुंदर कित्ता तिनें मोठ्या कटाक्षानें गिरविला होता व गृहलक्ष्मी हें पद ती सार्थ करीत होती.

मैत्रेयी याहून जरा निराळी होती. तिला प्रापंचिक जीवनाची अद्याप विशेष गोडी लागली नव्हती. तिचा ओढा परमार्थाकडे झुकलेला असे. तिचें मन कात्यायनीसारखें उथळ व हळवें नव्हतें ते गंभीर व विचारनिष्ठ होतें. प्रत्येक गोष्ट ती विचाराच्या निकषावर घासून ग्राह्याग्राह्य आहे कीं नाहीं हें ती ठरवीत असे. धार्मिक व तात्त्विक वादविवाद तिला आवडे व तो नियाल म्हणजे मन लावून ऐकण्यांत तिला मोठी धन्यता वाटे. जगन्नियंत्या परमेश्वराचें रूपैश्वर्य डोळ्यांनीं पहावें, त्याचें गुणगान कानांनीं ऐकावें, त्याचा महिमा तोंडानें गावा; व त्यांस एकंदर मनानें चिंतावें, याची तिला फार हौस व त्यांतच तिचा परमानंद. तिच्या मोहक चेहऱ्यावर सात्त्विक, दिव्यकांतीची प्रभा दृष्टीस पडून ती पोक्त, करारी, गंभीर दिसत असे. सांसारिक गोष्टींविषयीं ती उदासीनच राही.

दोघींच्या स्वभावांत विरोध दिसत असला तरी या आश्रमभेटीनंतर त्यांच्यांत मैत्रीची वाढ झाली व परस्परांत परस्परांच्या गुणांविषयीं आदरभावच उत्पन्न झाला. लवकरच त्या दोघी जिवाभावाच्या मैत्रिणी झाल्या.

# जनक महासभा

जनक राजाची ज्ञानलालसा मोठी प्रखर होती. केव्हा केव्हा ती जोराने वर उसळी मारुन अनावर होत असे. जनमेजय राजे नुकतेच दिवगत झाले होते व वैशंपायनाची वडाळीहि शांत झाली होती. याचा फायदा घेऊन सर्व विद्वान ऋषींची एक मोठी परिषद भरवून तींत ब्रह्मज्ञानाविषयी खूप व कसून चर्चा करवावी व आपण ती ऐकावी असे जनकाच्या मनात आल्याने तत्कालीन कुरुपांचालातील प्रथितयश व वादकुशल अशा सुप्रसिद्ध व थोर थोर आचार्यांना यज्ञाच्या मिषाने निमंत्रण पाठविले यात त्यांचा हेतु हा की, या सभेत ब्रह्मज्ञानाविषयी वादविवाद करवून त्यात जो श्रेष्ठ ठरेल, त्याजकडून ब्रह्मोपदेश घ्यावयाचा हा हेतु त्यांनी बाहेर मात्र बोलून दाखविला नव्हता आमंत्रणाप्रमाणे सर्व निमंत्रित ऋषिमंडळी त्या यज्ञ समारंभात उपस्थित झाली. याज्ञवल्क्यहि तेथें हजर होते

यज्ञ समाप्त झाल्यावर त्यांनी आपल्या गोठ्यातून एक हजार सुंदर गाई निवडून, त्यांची बाकदार शिंगे दहा दहा वजनी सुवर्णालंकाराने शृंगारून, त्यांच्या वत्सासहित तयार ठेविल्या व उपस्थित ऋषिवर्यांची राजदरबारात एक सभा बोलाविली सर्व मंडळी सभागृहात जमल्यावर जनक राजे उठून उभे राहिले व हात जोडून, त्या विद्वानांना उद्देशून विनतीपूर्वक म्हणाले की, " ऋषिवर्य हो! मी येथे आज एक हजार गाई सुवर्णांनी शृंगारून दक्षिणा देण्यासाठीं म्हणून तयार ठेविल्या आहेत. आपणात ब्रह्म-

ज्ञानावर वादविवाद करून, जो सर्वात श्रेष्ठ व विजयी ठरेल त्याला त्या दान करण्यात येतील" (श प १४–६–१ व २)

उपस्थितामध्य प्रामुख्याने उल्लेखनीय विद्वान म्हणजे कुरुपाचालातील सुप्रसिद्ध उद्दालक आरुणि हे होत त्याची विद्वत्ता व योग्यता प्रचड होती ते मत्रविद्येत व अध्यात्मविद्यत एकमेवाद्वितीय असे पडितवर्य असून त्याच्या आश्रमात राहूनच याज्ञवल्क्यानी गूढमत्रविद्येचा सूक्ष्म व सखोल अभ्यास केलेला होता तत्कालीन प्रसिद्ध विद्वानातील ते एक श्रेष्ठ प्रतीचे विद्वान मानले जात याज्ञवल्क्याचे गुरुदेवहि तेच होते

त्याच्या खालोखाल आचार्य विदग्ध शाकल्य हे होत त्याना पुराणात देवमित्र शाकल्य म्हटले असून आश्वलायनशाखचे ते प्रणेते [illegible] ऋग्वेदाचा पादपाठ लावणारे आचार्य ते हेच होत. ते सुप्रिय राजाचे पुरोहित होते शिवाय याज्ञवल्क्याच्या ऋग्वेदीय गुरुदेवतेचा मानहि त्याना मार्गे मिळाला होता

कहोड कौपीतकेय हे उद्दालक आरुणीचे शिष्य असून, शिवाय त्याचे ते जामातहि होते उद्दालकाची सुजाता ही मुलगी त्याना दिली होती हे मोठे आत्मज्ञानी व तत्त्वचिकित्सक आचार्य होते. उद्दालक आरुणि, प्राचीनशाल सत्ययज्ञ, इद्रद्युम्न इत्यादि मोठमोठे श्रुतिसपन्न ब्राह्मण मिळून कैकेय अश्वपति राजाजवळ वैश्वानर आत्म्याविषयी चर्चा करून ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी म्हणून गेले होते व चर्चा करून त्याजकडून पुढे त्यानी ज्ञानप्राप्तीहि करून घेतली (छा ५–११) अर्थात् हे कहोड कौपीतकेयदेखील एक मोठे जाडे विद्वान होते

भुज्यु लाह्यायनि हेहि आरुणीचे एक जुने शिष्य असून, पुढे ते वैशपायनाच्या चरकशिष्यगणात शिरले त्याना गधर्वाकडून

विशेष प्रकारचे ज्ञान मिळाले असून, तेहि गूढविद्येचे एक मोठे अधिकारी होते

आर्तभाग जरत्कारव हे जरत्कारु नावाच्या नागकन्येचे पुत्र असून नागराज वासुकीचे भाचे होते. जनमेजयाच्या सर्पसत्रात तक्षकाचा प्राण वाचविणारे प्रसिद्ध आस्तिक मुनि ते हेच असा आमचा समज आहे. हेहि चांगले पट्टीचे पंडित होते.

उद्दालक आरुणिसारख्या अव्वल दर्जाच्या श्रेणीत शोभण्यासारखे अधिकार संपन्न असे विद्वान व गार्गी वाचक्नवी या विदुषीहि समारंभास उपस्थित होत्या. त्यांचे वाक्चातुर्य आणि अध्यात्म विद्यांतर्गत वादकौशल्य अवर्णनीय होतें याज्ञवल्क्यांना या सभेंत प्रश्नामागून प्रश्नांचा सारखा भडिमार करून जर्जर व निरुत्तर करून छेडणारी ही विदुषी त्या सर्व विद्वानांत चमकून गेली तिच्यासारखा खमग व तिखट प्रतिस्पर्धी याज्ञवल्क्यांना त्या सभेंत दुसरा कोणी आढळला नाही

याशिवाय जनक राजाचा होतृ पुरोहित अश्वल, उषस्त चाक्रायण वगैरे अनेक पंडित होते. एकापेक्षा एक वरचढ अशी ज्येष्ठ, श्रेष्ठ व नामांकित विद्वद्रत्ने या ऐतिहासिक विद्वत्सभेंत उपस्थित होती.

जनक राजाचे भाषण ऐकून जमलेल्यापैकी काहींना आनंद झाला व काहीजण विचारमग्न झाले ज्यांना जनकाच्या प्रश्नाची खोच समजली होती, ते विचारांत पडले तेथे जमलेले सर्वच विद्वान ब्राह्मणश्रेष्ठ असल्यामुळें ' मीच तेवढा ब्राम्हणश्रेष्ठ असें छातिठोकपणे भरसभेंत सांगणे म्हणजे इतर ऋषींचा धडधडीत अपमान करण्यासारखेंच होय असे जो तो मनांत समजून कोणीहि पुढें येण्यास धजेना. जिकडे तिकडे अगदी सामसूम होती.

याज्ञवल्क्यानी हा प्रकार पाहिला स्तब्धतेमुळ जनकाराजाची निराळी समजूत होण्याचा सभव होता कोणी पुढ येण्यास तयार नाही हे पाहून, याज्ञवल्क्य चटकन् उठून पुढ झाले व सामश्र या शिष्याला हाक मारून सागितले की, या गाई घऊन जा

इतका वेळ पुतळचाप्रमाणे शात व स्तब्ध बसलेल्या त्या ऋषिमडळात आता हळूच कुजबुज सुरू झाली ! याज्ञवल्क्य एकटेच गाई नेणार हे पाहून त्याचा धीर सुटला 'काय, याज्ञवल्क्य तेवढेच ब्रम्हिष्ठ आणि आम्ही कोण ? पाहू कसे गाई नेतात ते ! आम्ही गप्प बसणार नाही दोन हात होऊच द्या ' अशा इर्षेन ब्रह्मवृद चुळबुळ करू लागला. याज्ञवल्क्यहि शेरास सव्वाशेर होते प्रत्यक्ष सूर्यनारायणाचे ते पट्ट-शिष्य होते आणि सरस्वतीचा वरप्रसादहि त्याना मिळाला होता पोकळ धाकदपटशाला ते थोडेच भीक घालणार होते? त्यानी प्रसग ओळखला आणि रागरग पाहून त्यानीहि कबर कसली

हा विलक्षण प्रकार पाहून जनक राजे स्तभितच झाले आपण केले काय नि हे झाले काय ? विद्वानामध्यें ही माजलेली वडाळी पाहून ते मनात जरा चरकल्यासारखे झाले तरी धीर न सोडता प्रसगावधान साधून तेथ जवळ जवळ हातघाईवर आलेल्या मडळीस नम्रपूर्वक हात जोडून शानपणे त्यानी विनती केली की, " महाराज, आपण थोर ब्राह्मणश्रेष्ठ म्हणविता आणि ह आरभिले आहे तरी काय? आपण आपला उदात्त धर्म विसरून सामान्य माणसाप्रमाणे हातघाईवर येता त्याला काय म्हणावे ? ब्राह्मणहो, शात व्हा नि खाली बसा. आपणात ब्रम्हिष्ठ कोण यावद्दल मतभेद असला, तर त्यावद्दल शातपणें वादविवाद करून

काय तो निर्णय लावून घ्या. या माझ्या नम्र सूचनेचा आपण अवश्य विचार करावा. "

जनकराजाची ही सूचना सभेत सर्वांना पटली. आपल्यात ब्राह्मणश्रेष्ठ कोण हे ठरविण्यासाठी ते वाद करण्यासाठी तयार झाले याज्ञवल्क्य एकटेच एका बाजूला आणि इतर सर्व विद्वन्मंडळ एका बाजूला असे पक्ष होऊन चर्चेस प्रारंभ झाला. जनकराजाचा दरबार, विद्वन्मंडळाची महासभा आणि तत्त्वज्ञानावर वादविवाद असा तो अपूर्व योग होता प्रत्यक्ष सरस्वतीच तेथे अवतरणार होती. (श प १४-६-१ ते ३)

# लढाईस तोंड लागलें !

जनकराजाची विनति मान्य करून सर्व ब्राह्मण आपापल्या जागी जाऊन वसले आणि जिकडेतिकडे शांतता झाल्यावर प्रथम जनकाचा पुरोहित अश्वल हा पुढे येऊन त्याने वादास तोंड पाडले

अश्वल– आपण ब्रम्हिष्ठ आहात काय ?

याज्ञवल्क्य– जो कोणी ब्रम्हिष्ठ असेल तो असो. त्यास माझा नमस्कार असो. आम्हास फक्त गाई पाहिजेत.

अश्वल– गायी कांही फुकट मिळणार नाहीत. माझ्याशी वाद–विवाद करा आणि मला जिंकल्यावरच त्या घेऊन जाता येतील.

याज्ञवल्क्य– ठीक आहे.

अश्वल– हे सर्व जग मृत्यूनें व्याप्त आहे आणि तसेच ते मृत्युवशहि आहे की नाही ?

याज्ञवल्क्य– होय आहे. सर्व कांही मृत्युव्याप्त व मृत्यु-वश आहे.

अश्वल– मग आता हे सागा की, त्या मृत्यूपासून हा यजमान कसा मुक्त होईल. ?

✓याज्ञवल्क्य– यज्ञातील होता, ऋत्विक्, अग्नि आणि वाक् यांच्या साहाय्याने.

अश्वल– कारण ?

याज्ञवल्क्य– कारण, वाक् हाच यज्ञाचा होता. ही जी वाक् तीच अग्नि, तीच होता, तीच मुक्ति, आणि तीच अतिमुक्ति.

अश्वल– ठीक आहे. आता हें पहा. हे सर्व अहोरात्राने जग व्याप्त असून त्याना वश आहे. हें खरे ना ?

याज्ञवल्क्य– बरं पुढं ?

अश्वल– या अहोरात्रीच्या व्याप्तीपासून यजमान कशानें मुक्त होईल ?

याज्ञवल्क्य– अध्वर्यु, ऋत्विक्, चक्षु व आदित्य यांनी तो मुक्त होईल.

अश्वल– कसा ?

याज्ञवल्क्य– चक्षु हाच यज्ञाचा अध्वर्यु. चक्षु, तोच आदित्य. तोच अध्वर्यु. तोच मुक्ति आणि तोच अतिमुक्ति .

अश्वल– पुन: आणखी हे सर्व शुक्लपक्ष, कृष्णपक्ष यानीं व्याप्त व वशीकृत आहे ना !

याज्ञवल्क्य– होय.

अश्वल : तर हा यजमान या दोन्ही पक्षांच्या व्याप्तीपासून कशानें मुक्त होईल ?

याज्ञवल्क्य : उग्दाता, ऋत्विक्, वायु व प्राण यांनी तो मुक्त होईल. कारण प्राण हा यज्ञाचा उग्दाता. तोच वायु, तोच उग्दाता. तोच मुक्ति व तोच अतिमुक्ति होय.

अश्वल : हें अंतरिक्ष आधाररहित आहे ?

याज्ञवल्क्य : कबूल.

अश्वल : कोणत्या क्रमानें यजमान हा स्वर्गलोकाचें आक्रमण करूं शकेल ? याला उत्तर आहे काय ?

याज्ञवल्क्य : आहे, ब्र ह्मा ऋत्विक्, मन आणि चंद्र या क्रमानें तो स्वर्गाचें आक्रमण करूं शकेल.

अश्वल : कारण ?

याज्ञवल्क्य : कारण मन हा यज्ञाचा ब्रह्मा. हें जें मन तोच चंद्र. तोच ब्रह्मा. तोच मुक्ति व तोच अतिमुक्ति. याप्रमाणें

मृत्यूपासून मुक्त होण्याची ही अशी निरनिराळी साधन आहेत.

अश्वल आपले म्हणणे बरोबर आहे आता सागा, किती ऋचानी होता हा यज्ञात हवन करतो ?

याज्ञवल्क्य तीन ऋचानी

अश्वल त्या कोणत्या ?

याज्ञवल्क्य . पुरोनुवाक्या, याज्या व शस्या

अश्वल यानी तो काय मिळवतो ?

याज्ञवल्क्य ज जें म्हणून प्राणयुक्त आहे, त तें सर्व तो मिळवतो

अश्वल यज्ञात अध्वर्यु हा किती आहुति हवन करतो ?

याज्ञवल्क्य तीन

अश्वल त्या कोणत्या ?

याज्ञवल्क्य ज्या हवन केल्या असता पूर्ण जळून जातात त्या उदाहरणार्थ तूप इत्यादि ज्या हवन केल्या असता मोठा शब्द करतात त्या म्हणजे मासादि पदार्थ आणि ज्या हवन केल्या असता खाली जातात त्या म्हणजे उदक, सोम इत्यादि

अश्वल • ठीक आहे आता या आहुतीनी तो यजमान काय मिळवितो ?

याज्ञवल्क्य • ज्वलन पावणाऱ्या आहुतीनी तो देवलोक प्राप्त करून घेतो

अश्वल कारण ?

याज्ञवल्क्य देवलोक दीप्तियुक्त आहे म्हणून त्याचप्रमाण ज्या शब्दयुक्त आहेत, त्यापासून तो पितृलोक मिळवितो कारण तेथें जाताना 'हाय हाय ! मेलो ! मेलो ! वाचवा वाचवा !' असा आक्रोश व ध्वनि होत असतो. आणि ज्या आहुति तळाला

जातात त्यापासून तो मृत्युलोक मिळवतो- कारण मृत्युलोक हा खाली आहे.

अश्वल : हें सर्व म्हणणें मला मान्य आहे. ब्रह्मा हा दक्षिणेकडे बसून किती देवतांनी यज्ञाचें रक्षण करतो ?

याज्ञवल्क्य : एकाच देवतेने.

अश्वल : ती कोणती ?

याज्ञवल्क्य : मन.

अश्वल : कसें ?

याज्ञवल्क्य : अश्वला, मन हें अनंत आहे. सर्व देव हेहि अनंतच आहेत. म्हणून त्यामानानें अंतरहित असा देवलोकच तो प्राप्त करून घेतो.

अश्वल : यज्ञामध्यें उग्दाता हा किती स्तोत्रियांनी स्तवन करतो ?

याज्ञवल्क्य : तीन.

अश्वल : त्या कोणत्या ?

याज्ञवल्क्य : पुरोनुवाक्या, याज्या व शस्या.

अश्वल : अध्यात्म संपादन करणाऱ्या त्या कोणत्या ?

याज्ञवल्क्य : प्राण हीच पुरोनुवाक्या. अपान हीच याज्या आणि व्यान हीच शस्या.

अश्वल : यापासून तो काय मिळवितो ?

याज्ञवल्क्य : पुरोनुवाक्यापासून पृथ्वीलोक, याज्यापासून अंतरिक्ष लोक, शस्यापासून द्युलोक. याप्रमाणें या तीन स्तोत्रियांपासून यजमान हा तीन लोक प्राप्त करून घेतो. अश्वलाजवळ याज्ञवल्क्यांना विचारण्यास आतां प्रश्नच उरले नव्हते ! अर्थात शेवटघावर स्वारी थावली आणि म्लान वदन करून खाली पाहूं लागली आणि याज्ञवल्क्य विजयी झाले. (श.प.१४-६-१-४ ते १२)

## आर्तभाग जरत्कारवाची माघार!

जनकराजाचा पुरोहित अश्वल हा पराभूत होऊन परत गेल्यावर त्याच्या जागी आला आर्तभाग जरत्कारव वाद करावयास पुढें आला.

आर्तभाग : ग्रह किती आहेत ? आणि अतिग्रह किती आहेत.

याज्ञवल्क्य : ग्रह ( म्हणजे ग्रहण करणारे ) हे आठ आहेत व अतिग्रह हे देखील तितकेच आहेत.

आर्तभाग : ते कोणते ?

याज्ञवल्क्य : प्राण हा ग्रह. हा प्राण अपान म्हणजे गंध या अतिग्रहानें गृहीत आहे.कारण मनुष्य हा घ्राणानेंच गंध घेतो.त्याच प्रमाणें वाक् हा ग्रह नाम या अतिग्रहानें गृहीत आहे. कारण वाचेनेंच नामें उच्चारतो. जिव्हा हा ग्रह रस या अतिग्रहानें गृहीत आहे. कारण जिव्हेनेंच रस जाणतो. चक्षु हा ग्रह रूप या अतिग्रहाने गृहीत आहे. कारण चक्षूनेंच रूपें पाहतो. श्रोत्र हा ग्रह तो शब्द या अतिग्रहानें गृहीत आहे. कारण श्रोत्रानेंच शब्द ऐकतो. मन हा ग्रह आहे. हा काम ( इच्छा ) या अतिग्रहानें गृहीत आहे. कारण मनानेंच कामाची इच्छा होते. हस्त हा ग्रह आहे. हा कर्म या अतिग्रहानें गृहीत आहे. कारण हातानींच कर्म करतो. त्वचा हा ग्रह आहे. हा स्पर्श या अतिग्रहाने गृहीत आहे. कारण त्वचेनेंच स्पर्श जाणतो. हे असे आठ ग्रह व अतिग्रह आहेत.

आर्तभाग : हे सर्व मृत्यूचें अन्न आहेत कां ?

याज्ञवल्क्य : होय.

आर्तभागहा : मृत्यु जिचें अन्न आहे, अशी देवता कोणती ?

याज्ञवल्क्य : ती देवता म्हणजे अग्नि.अग्नि हा या सर्वांचा मृत्यु आहे. पण गम्मत ही कीं, तो अग्नि हा उदकाचें अन्न आहे ! सर्व हृदयग्रंथींचा नाश झाला म्हणजे पुरुष हा मृत्यूवर जय मिळवितो.

आर्तभाग : जेव्हा हा पुरुष मरण पावतो,तेव्हां त्याचीं इन्द्रियें त्याच्यामधून निघून वर जातात कीं नाही ?

याज्ञवल्क्य : नाही, तीं इन्द्रियें वर निघून जात नाहींत. ती येथेंच नष्ट होतात. तो ( देह ) फुगतो.बाह्यवायूनें भरतो व अखेर मृत होऊन, येथेंच पडून राहतो.

आर्तभाग : जेव्हां हा पुरुष मरण पावतो, तेव्हां त्याला न सोडणारें असें काय असतें ?

याज्ञवल्क्य : त्याला न सोडणारें असें नाम असतें.

आर्तभाग : तें कसें ?

याज्ञवल्क्य : नाम हें अनंत आहे. देव हेही अनंत आहेत. नामानेंच पुरुषाला त्या अनंत लोकांची प्राप्ति होते.

आर्तभाग : ठीक आहे. हा पुरुष जेव्हां मरण पावतो, तेव्हा त्याची वाणी अग्नीकडे जाते, प्राण वायूकडे जातो, चक्षु सूर्याकडे जातो, मन चन्द्राकडे जातें. त्याचप्रमाणें श्रोत्र दिशांकडे, शरीर पृथ्वीकडे, हृदय आकाशाकडे,लोम औषधीकडे, केश वनस्पतींकडे आणि रक्त व रेत ही उदकाकडे जातात.

याज्ञवल्क्य : होय.

आर्तभाग : असें झालें म्हणजे मग हा पुरुष कोठें जातो ?

याज्ञवल्क्य : ही गोष्ट सभेंत सांगणें इष्ट नाही. फक्त ती गुरु व शिष्य या दोघांनाच समजली पाहिजे.

नंतर ते दोघेहि तेथून उठले व दुसरीकडे गेले. तेथें गेल्यावर

दोघे मिळून एकत्र विचार करून अखेर दोघानी एकमताने 'कर्म' म्हणूनच निर्णय सांगितला. त्यानी प्रशंसा केली ती कर्माचीच केली. पुण्य कर्माच्या योगाने मनुष्य हा पुण्यवान होतो आणि पापकर्म करून तो पापी बनतो एवढे झाल्यावर आर्तभाग पुढे प्रश्न विचारण्याच्या भानगडीत पडला नाही. त्याने याज्ञवल्क्याचे सामर्थ्य ओळखले व मौन धारण करून आला तसा आपल्या जागेवर जाऊन बसला. ( श. प. १४।६।२।१ ते १४ )

आर्तभागानंतर भुज्यु लाह्यायनि पुढे आला.

भुज्यु-आम्ही तीर्थयात्रा करीत फिरत फिरत मद्रदेशात गेलो तेथे आम्ही पतंचल काप्य याच्या घरी गेलो त्याच्या मुलीच्या अंगात एक गंधर्व शिरून बसला होता त्याची गम्मत पहावी म्हणून आम्ही त्या मुलीजवळ गेलो आणि त्याला सहज प्रश्न टाकला की, तू कोण आहेस ? तेव्हा त्याने उत्तर दिले की, मी अंगिरस गोत्री सुधन्वा आहे. पुढे आम्ही मनुष्य मेल्यावर त्याची गति काय होते, हे समजून घेण्याच्या इराद्याने त्याला विचारले की, आता पारिक्षित जनमेजय कोठे गेले ? त्याचे त्याने आम्हास उत्तर दिले आहे. ते आम्हाला ठाऊक आहे. तथापि आपण पारिक्षित कोठे गेले, ते सांगा ?

याज्ञवल्क्य–त्या गंधर्वाने तुम्हास सांगितले असेल की, अश्वमेध करणारे जेथे जातात, तेथे ते गेले म्हणून ? आदित्य हा रथातून बत्तीस दिवसामध्ये जेवढा प्रदेश आक्रमण करतो, तेवढया प्रमाणाचा हा लोक आहे. या लोकाच्या सभोवती याच्या दुप्पट विस्ताराने पृथ्वी पसरलेली आहे. या पृथ्वी सभोवती पृथ्वीच्या दुप्पट आकाराने समुद्र पसरलेला आहे. त्याच्या सभोवती वस्तान्याच्या धारे इतके अगर माशीच्या पखाइतके आकाश पातळ आहे. तेथून इंद्राने गरुडाचे रूप धारण करून त्या अश्वमेध करणाऱ्या पारिक्षितासह

वायूच्या स्वाधीन केले. वायूने त्याला आपल्यासारखें सूक्ष्म रूप देऊन जेथें अश्वमेधयाजी होते त्या ठिकाणी नेले. म्हणून त्या गंधर्वाने वायूचीच प्रशंसा केली. वायु हाच व्यष्टि (म्हणजे विविध रूपे व्यापून राहणारा. व वायु हाच समष्टि म्हणजे सूत्ररूपाने व्यापून राहणारा) होय. हें जो जाणतो तो मृत्यूवर जय मिळवितो. (श. प. १४।६।३।१ व २)

याज्ञवल्क्याचा हा खुलासा ऐकून भुज्यु गप्प बसला त्याला पुढे प्रश्न विचारण्याचे धैर्यच झाले नाही.

भुज्यु लाह्यायनि पराजित झाल्यावर कहोड कौषीतकेय हा वादविवाद करण्यास पुढें सरकला.

कहोड–हा जो साक्षात् व प्रत्यक्ष असा सर्वांतर्यामी आत्मा आहे तो मला स्पष्ट करून सांगा.

याज्ञवल्क्य– हा तुझा आत्मा, तोच सर्वांतर आहे !

कहोड– म्हणजे ? मला काही या उत्तरापासून बोध झाला नाही. तो कोणता आत्मा हें विशद करून सांगा.

याज्ञवल्क्य– जो क्षुधेच्या पलीकडे आहे, तृष्णेच्या पलीकडे आहे, शोक, मोह, जरा यापलीकडे आहे आणि जो मृत्यूच्याहि पलीकडे आहे, तो आत्मा, तो तुझाच आत्मा–सर्व व्यापी आहे. या सुप्रसिद्ध आत्म्याचे यथार्थ ज्ञान झाले म्हणजे पुत्राची इच्छा, धनाची इच्छा, लोकांची इच्छा यापासून पराङमुख होऊन, ब्रह्मज्ञानी हे भिक्षाचर्य वृत्तीने राहू लागतात. जी पुत्रैषणा, तीच वित्तैषणा आणि जी वित्तैषणा तीच लोकैषणा. या सर्व गोष्टी इच्छेतच मोडतात. म्हणून जो ब्रह्मज्ञानी आहे, त्यानें पांडित्याचा व इच्छाचा त्याग करून, बालवृत्तीने राहण्याची इच्छा करावी. बालवृत्ति व पंडितवृत्ति निःशेष झाली म्हणजे मग

मौन धारण करून तो मुनि होतो पुढें बाल्य व मौन हीहि निःशेष झाली म्हणजे तो मुनिच ब्राह्मण म्हणजे ब्रह्मज्ञ होतो या ब्रह्माहून इतर असे जें काहीं आहे, ते सर्व विनाशी आहे ! याज्ञवल्क्याचे हे भाषण ऐकून कहोड मौन धारण करून उठून स्वस्थानी जाऊन बसला (श प १४।६।४।१)

कहोडाने वादविवाद क्षेत्रातून पाय माग घेतल्यावर त्याच्या जागी उपस्त चाक्रायण हा आला

उपस्त –साक्षात व प्रत्यक्ष ब्रह्म असा जो सर्वांतर्यामी आत्मा आहे तो आपण जाणता काय ?

याज्ञवल्क्य–हा तुझा आत्माच सर्वांतरी आहे

उपस्त–तो सर्वांतर आत्मा कोणता ?

याज्ञवल्क्य–जो प्राणाने प्राणन करतो, तो तुझा आत्मा सर्वांतर्यामी आहे जो अपानाने अपानकर्म करतो, तो तुझा आत्माच सर्वांतर आहे जो व्यानानें व्यान–कर्म करतो, तो तुझा आत्माच सर्वांतर आहे जो उदानाने उदानकर्म करतो तो तुझा आत्माच सर्वांतर आहे. हाच तुझा आत्मा सर्वांच्या आत आहे !

उपस्त–हे काय उत्तर झाले ? हे सांगणे म्हणजे हा बैल, हा अश्व अशा प्रकाराने खुणेंने सांगण्यासारखेंच ते सामान्य प्रतीचे आहे असले संदिग्ध उत्तर मला नको साक्षात् व प्रत्यक्ष ब्रह्म असा जो सर्वांतर आत्मा आहे, तो मला स्पष्ट करून सांगा

याज्ञवल्क्य–हा तुझा आत्मा तोच सर्वांतर्यामी–सर्वव्यापी–आहे.

उपस्त–सर्वांतर्यामी म्हणता तो कोणता ?

याज्ञवल्क्य–तुझी ही जी स्थूलदृष्टि–लौकिकदृष्टि आहे, त्या दृष्टिला देखील पाहणाऱ्याला तू तुझ्या लौकिकदृष्टिने पाहू

नकोस तुझ्या स्थूलश्रुतीच्या श्रोत्याला तू आपल्या लौकिक कर्णांनी श्रवण करू नकोस तुझ्या लौकिक मनाचे जो मनन करणारा आहे, त्याचे तू आपल्या स्थूल मनानें मनन करू नकोस त्याचप्रमाणे तुझी ही जी स्थूलबुद्धि आहे, तिच्या ज्ञात्याला तू आपल्या स्थूलबुद्धीन जाणू नकोस या स्थूल इद्रियानी त्याला जाणण्याचा तुझा प्रयत्न सगळा व्यर्थ आहे तुला सत्य सत्य सागतो की, हा तुझा आत्मा तोच सर्वांच्या अतर्यामी आहे अर्थात् तो सर्वव्यापी आहे या आत्म्याहून इतर जें काही आहे, ते सर्व विनाशी आहे. (ग प १४।६।५।१ते३)

# विदुषी गार्गी वाचक्नवीची सरबत्ती !

आता गार्गी वाचक्नवी पुढे आली प्रसिद्ध आर्यविदुषी आणि ब्रह्मवादिनी अशी ती होती तिचे ज्ञानतेज प्रखर असून विजेप्रमाणे त्या सभत चमकत होते ती दिव्य ज्ञानाची खरोखर मूर्तिमत पुतळीच होती. याज्ञवल्क्यासारख्या अतिरथीबरोबर ती त्या भरसभेत दोन हात करावयास हिरीरीने पुढ सरसावून आली, एवढयावरूनच तिचे ज्ञानसामर्थ्य केवढे प्रचड नि अद्भूत असले पाहिजे, याची वाचकानीच कल्पना करावी मोठमोठ्या पडिताना याज्ञवल्क्य वादविवादात हटवित असत. पण ही महामाया मात्र त्याना मोठी समग व तिखट भेटली याज्ञवल्क्याशी झुज खेळण्यास वादक्षेत्रात ती एकदा नव्हे, तर दोन वेळा पुढे आली, यावरून तिचे ज्ञान-वैभव व वादकौशल्य चागले प्रतीत होते तिने त्याच्याशी घनघोर वादसग्राम करून सूक्ष्म व खोचदार प्रश्नाचा तीक्ष्ण बाणाप्रमाणें त्याच्यावर सारखा भडीमार करून, त्याना तिने चाग-लेच पेचात धरून मेटाकुटीस आणले

तिच्या सूक्ष्म व खुबीदार प्रश्नाना उत्तरे देता देता ते अगदी रडकुडीस आले होते, असे म्हटले तरी चालेल ती त्या सभत याज्ञवल्क्यावरोबर वाद करावयास पुढे येऊन बसताच सर्व सभा स्तभित झाली सर्वांची दृष्टि तिच्यावर बधली व जो तो आश्चर्याने व कौतुकाने तिच्याकडे पाहू लागला इतक्यात तिन तोंड उघडले आणि गभीर स्वरात याज्ञवल्क्यास म्हटले की, हे जे पार्थिव जग आहे ते सर्व उदकामध्ये ओत व प्रोत आहे हे खरे की नाही ?

याज्ञवल्क्य–होय आहे

गार्गी–आतां मला हे सांग की, हे उदक कशात ओत व प्रोत आहे ?

याज्ञवल्क्य–तें उदक वायूमध्ये ओत व प्रोत आहे.

गार्गी–वायु कशात ओत व प्रोत आहे ?

याज्ञवल्क्य–तो आकाशात ओत व प्रोत आहे.

गार्गी–आणि ते आकाश कशात ओत व प्रोत आहे ?

याज्ञवल्क्य–अंतरिक्ष लोकामध्यें.

गार्गी–अंतरिक्ष लोक कशामध्ये ओत व प्रोत आहे ?

याज्ञवल्क्य–द्युलोकामध्यें ओत व प्रोत आहे.

गार्गी–द्युलोक कशात ओत व प्रोत आहे ?

याज्ञवल्क्य– आदित्य लोकामध्यें ओत व प्रोत आहे.

गार्गी–आणि आदित्य लोक हा ?

याज्ञवल्क्य–तो चंद्रलोकात.

गार्गी–आणि चंद्रलोक ?

याज्ञवल्क्य–तो नक्षत्रलोकात.

गार्गी–नक्षत्रलोक कशात ओत व प्रोत आहे ?

याज्ञवल्क्य–देवलोकात.

गार्गी–देवलोक कशात ?

याज्ञवल्क्य–प्रजापति लोकात.

गार्गी–प्रजापतिलोक कशात ?

याज्ञवल्क्य–ब्रह्मलोकात.

गार्गी–आणि तो ब्रह्मलोक कशात ?

याज्ञवल्क्य—गार्गी आता मात्र तू ताळ सोडला आहेस. मर्यादा उल्लंघून प्रश्न करू नकोस नि तुझें मस्तक तुटून पडण्याची इच्छा करूं नकोस. जो प्रश्नाचा विषय होऊं शकत नाही अशा देवतेसबंधी तू प्रश्न करीत आहेस. म्हणून असा प्रश्न करू नकोस. याज्ञवल्क्यानी असा इशारा देताच ती नरमली आणि आणखी प्रश्न न विचारतां तितक्यावरच चर्चा थोपवून, मुकाट्याने आपल्या जागेवर जाऊन बसली. ( श. प. १४।६।६।१ ते ६ )



# उद्दालक आरुणींचा पराभव

उद्दालक आरुणि हे याज्ञवल्क्यांचे गुरुदेव, तत्त्वज्ञानाचे शिखामणि आणि वेदविद्येचे गौरीशंकर होते. खरी वैदिक आर्यांची कर्तव्यजागृति म्हणजे मोठी प्रखर होती. कर्तव्य क्षेत्रांत जो अडवा येईल, मग तो कोणी कां असेना त्याचें नातेंगोतें विसरून त्याच्याशी दोन हात करण्याचा त्यांचा बाणा खरोखर वाखाणण्यासारखा होता. धनुर्धारी अर्जुन हा द्रोणाचार्यांचा शिष्य, पण कुरुक्षेत्रावर दोघांची जेव्हा गांठ पडली, तेव्हां अर्जुनानें गुरुशिष्याचें नातें विसरून त्यांच्याशी घनघोर रणसंग्राम गाजविलाच की नाही ? पितृआज्ञा होतांच परशुरामानें तर प्रत्यक्ष आपल्या आईचें मस्तकच उडवून दिलें ! गंधर्वाला वाचविण्याकरतां आपलें वचन सत्य करण्याकरतां धनुर्धारी अर्जुनानें प्रत्यक्ष आपला मित्र व उपकारकर्ता जो कृष्ण भगवान याच्याशी अखेर लढाईही केली. अशी अनंत उदाहरणें वैदिक आर्यांच्या प्राचीन व तेजस्वी इतिहासांत ठिकठिकाणीं आढळून येतात.

हाही असाच एक प्रसंग होता. गुरु-शिष्याचें नातें क्षणभर बाजूस ठेवून गुरुदेवावरोवर लढण्यास तयार होणें याज्ञवल्क्यांना जरूर वाटलें. अर्थात् दोघांचेंहि आतां तुमुल वाग्युद्ध जुंपलें व प्रश्नाची सरबत्ती उडाली.

उद्दालक म्हणाले:—मी मद्रदेशांत पतंचलकाप्याच्या घरीं यज्ञविधीचें अध्ययन करण्यासाठी म्हणून कांहीं दिवस राहिलों होतों. तेथें असतांना त्या पतंचलाच्या भार्येच्या अंगांत एक गंधर्व येत असे. त्याचें नांव 'आथर्वण कबंध'. तो गंधर्व एकदां अंगांत आल्यावेळीं पतंचलाला व इतर याज्ञिकांना उद्देशून म्हणाला, हा लोक, परलोक आणि हें सर्व भूतमात्र ज्या एका सुत्रांत ओंवलेलें

आहे, ते सूत्र तुम्ही जाणता काय ? त्यावर तो पतचल म्हणाला की, 'नाही भगवन् आम्ही ते जाणत नाही ' यावर पुन तो गधर्व म्हणाला–पतचला हा लोक, परलोक व त्याच प्रमाणे हे सर्व प्राणिमात्र याच्यामध्य राहून जो त्या सर्वांचे नियमन करतो, त्या अतर्यामी असणाऱ्याला तरी ओळखता काय ? 'नाही, भगवन्' तो पतचल उत्तरला 'आपण त्याला ओळखत नाही ' तेव्हा त्याने पतचलाला म्हटले–ते सूत्र व तो अतर्यामी राहणारा याना जो जाणतो तोच खरा ब्रह्मवेत्ता तोच खरा देववेत्ता, तोच खरा वेदवेत्ता, तोच खरा भूतवेत्ता, तोच खरा आत्मवेत्ता, आणि तोच खरा सर्ववेत्ता तेव्हा त्यान जें म्हटले ते अगदी सत्य आहे निवार सत्य आहे त सूत्र व तो मी अतर्यामी जाणतो आणि त ज्ञान नसता याज्ञवल्क्या, जर तू या गाई नेशील तर तुझें मस्तक तुटून पडेल !

याज्ञवल्क्य ते सूत्र मीही पण जाणतो

उद्दालक मग सूत्राची माहिती सागा

याज्ञवल्क्य त सूत्र म्हणजे वायु होय हा लोक, परलोक व हे सर्व भूतमात्र त्या एका वायुरूपी सूत्रातच गोविलेले आहेत म्हणून मनुष्य मेला म्हणजे म्हणतात की, त्याची इद्रियें तुटली आहेत कारण वायुरूपी सूत्राने ती बद्ध झालेली असतात

उद्दालक याज्ञवल्क्या खरे आहे तुझें म्हणणें अतर्यामी असणारा तो कोण ?

याज्ञवल्क्य जो पृथ्वीमध्य स्थित आहे, जो पृथ्वीच्या आतहि आहे, ज्याला 'हा आहे ' असे पृथ्वी जाणत नाही, पण ज्याचे शरीर ही पृथ्वी आहे आणि जो पृथ्वीत राहून पृथ्वीचे नियमन करतो असा तुझा हा अमर आत्माच अतर्यामी आहे

उद्दालक : बरोबर. याज्ञवल्क्या, अगदी बरोबर बोललास पण संपले का तुझें उत्तर येवढ्यावरच ?

याज्ञवल्क्य : नाही अजून आहे

उद्दालक : मग सांग तर.

याज्ञवल्क्य : ऐका सांगतो. जो उदकात स्थित आहे, जो उदकाच्या आत आहे पण उदक ज्याला जाणू शकत नाही, आणि ज्याचे शरीर हे उदक आहे आणि जो उदकात राहून त्याचें नियमन करतो असा हा तुझा अमर आत्मा अंतर्यामी आहे, त्याचप्रमाणे जो अग्निमध्यें स्थित आहे, जो अग्नीच्या आत आहे पण अग्नि ज्याला जाणू शकत नाही, शरीर ज्याचे हा अग्नि आहे, जो अग्नीत राहून त्याचें नियमन करतो, असा हा तुझा अमर आत्मा अंतर्यामी आहे जो आकाशामध्यें स्थित आहे, जो आकाशाच्या आत आहे, पण आकाश ज्याला जाणू शकत नाही आणि ज्याचे शरीर हें आकाश आहे व जो आकाशात राहून त्याचें नियमन करतो, असा हा तुझा अमर आत्मा अंतर्यामी आहे. जो वायूत स्थित आहे, जो वायूच्या आत आहे पण ज्याला वायु जाणत नाही आणि ज्याचे शरीर वायु आहे व जो वायूत राहून त्याचें नियमन करतो, असा हा तुझा अमर आत्मा अंतर्यामी आहे. जो आदित्यात स्थित आहे, पण ज्याला आदित्य जाणत नाहीं आणि ज्याचे शरीर हा आदित्य आहे व जो आदित्यात राहून त्याचें नियमन करतो, असा तुझा हा अमरतआत्मा अंतर्यामी आहे. जो चंद्रतारकामध्यें स्थित आहे, जो चंद्रारकाच्या आत आहे पंण ज्याला 'चंद्रतारका ओळखत नाहीत, ज्याचे शरीर या चंद्रतारका आहेत व जो चंद्रतारकात राहून त्याचें नियमन करतो, असा हा अमर आत्मा अंतर्यामी आहे.

उद्दालक सपले का अजून आहे ?

याज्ञवल्क्य नाही, ते इतक्यात सपणार नाही ब्रह्मवेत्याची परीक्षाच पहावयाची आहे ना ? पूर्ण खात्री करून घ्या आणि मग पुढे काय विचारावयाचें आहे ते विचारा आपण ! अतर्यामी असणाऱ्या सद्वस्तूच निरुपण अजून ऐका जो दिशामध्यें आहे, ज्याचें शरीर या दिशा आहेत व जो दिशामध्यें राहून त्याचे नियमन करतो, असा हा आत्मा अतर्यामी आहे व तो अमर आहे जो विद्युताच्या आत आहे पण ज्याला विद्युत् ओळखत नाही, ज्याचें शरीर विद्युत आहे व जो विद्युतात राहून त्याचे नियमन करतो असा आत्मा अतर्यामी आहे व तो अमर आहे जो सर्व लोका, मध्य स्थित आहे, जो सर्व लोकाच्या आत आहे पण ज्याला सर्व लोक जाणत नाहीत, ज्याच शरीर सर्व लोक आहेत असा आत्मा अतर्यामी असून तो अमर आहे जो सर्व वेदामध्यें आहे, जो सर्ववेदाच्या आत आहे, पण ज्याला वेद जाणू शकत नाहीत, ज्याचें शरीर वेद आहेत व जो वेदात राहून त्याचे नियमन करतो, असा आत्मा अतर्यामी असून तो अमर आहे जी गोष्ट अधिवेद वस्तूविषयी तीच अधियज्ञ व अधिभूत विषयी समजा जो सर्व यज्ञामध्य आहे, जो सर्व यज्ञाच्या आत आहे, पण ज्याला यज्ञ जाणू शकत नाही, ज्याच शरीर यज्ञ आहे असा आत्मा अतर्यामी असून तो अमर आहे जो सर्व भूतामध्ये राहतो, जो सर्व भूताच्या आत असतो, पण ज्याला सर्व भूतें जाणू शकत नाहीत, ज्याचें शरीर ही सर्व भूते आहेत व जो सर्व भूतामध्ये राहून त्याचें नियमन करतो तो आत्मा अतर्यामी असून अमर आहे हे अधिभूत झाले आता अध्यात्म सागतो

जो प्राणामध्ये आहे, जो प्राणाच्या आत आहे, पण ज्याला प्राण जाणत नाही, ज्याचें शरीर प्राण आहे व जो प्राणात राहून त्याचें नियमन करतो, असा आत्मा अमर असून तो अतर्यामी आहे. जो वाणीमध्ये स्थित आहे, जो वाणीच्या आत आहे, पण ज्याला वाणी जाणू शकत नाही, ज्याचे शरीर वाणी आहे व जो वाणीत राहून तिच नियमन करतो, असा आत्मा अमर असून तो अतर्यामी आहे जो चक्षूमध्यें आहे, जो चक्षुच्या आत आहे पण चक्षु ज्याला जाणत नाही, ज्याचे शरीर चक्षू आहे व जो चक्षूमध्ये राहून त्याचें नियमन करतो, असा आत्मा अमर असून तो अतर्यामी आहे जो श्रोत्रामध्ये स्थित आहे, जो श्रोत्राच्या आत आहे. पण ज्याला श्रोत्र जाणत नाही, ज्याचे शरीर श्रोत्र आहे व जो श्रोत्रामध्य राहून त्याचे नियमन करतो, असा आत्मा अमर असून अतर्यामी आहे. जो त्वचेमध्ये स्थित आहे, जो त्वचेच्या आत आहे, पण ज्याला त्वचा ओळखत नाही, ज्याचें शरीर ही त्वचा आहे व जो त्वचेच्या आत राहून तिचे नियमन करतो, असा हा आत्मा अमर व अतर्यामी आहे जो तेजामध्ये आहे, जो तेजाच्या आत आहे पण ज्याला तेज ओळखत नाही, ज्याचें शरीर तेज आहे व जो तेजामध्ये राहून त्याचे नियमन करतो असा तो तुझा आत्मा अमर व अतर्यामी आहे जो तमामध्ये आहे, जो तमाच्या आत आहे, पण ज्याला तम जाणत नाही, ज्याचे शरीर तम आहे व जो तमाच्या आत राहून त्याचे नियमन करतो, असा तो आत्मा अमर असून अतर्यामी आहे -जो रेतामध्यें स्थित आहे, जो रेताच्या आत आहे, पण ज्याला रेत जाणत नाही, ज्याचे शरीर रेत आहे व जो रेतामध्ये राहून त्याचे नियमन करतो, असा तो आत्मा अमर व

अंतर्यामी आहे. तसाच जो आत्म्यामध्यें स्थित आहे, जो आत्म्याच्या आंत आहे, पण ज्याला आत्मा जाणत नाही, ज्याचें शरीर आत्मा आहे व जो आत्म्यामध्यें राहून त्याचें नियमन करतो, असा आत्मा अमर व अंतर्यामी आहे.

उद्दालकाचें तोंड उतरलें. पराभूत झाल्याची दाट छाया त्याच्या मुखावर स्पष्ट उमटली. ब्रह्मज्ञानाचें हे दिव्य व्याख्यान ऐकून उद्दालकच काय सर्व सभा पुतळ्याप्रमाणें तटस्थ झाली

पुनः याज्ञवल्क्य म्हणाले : गौतमा ! ऐक. ब्रह्मज्ञान ऐक ! उपरोक्त लक्षणाचा जो अमर व अंतर्यामी आत्मा तो अदृष्ट आहे. पण पाहणारा मात्र तोच आहे. तो अश्रुत आहे, पण ऐकणारा मात्र तोच आहे. तो अमत आहे, पण मनन करणारा मात्र तोच आहे. तो *अविज्ञात आहे, पण विज्ञाता मात्र तोच* आहे. तो तुझाच आत्मा असून तो अमर आहे व अंतर्यामी आहे. गौतमा ! फार काय सांगूं ? त्या आत्म्याखेरीज इतर जं कांहीं आहे तें सर्व नाशवंत आहे. गौतमा ! ते सर्व नाशवंत आहे. आतां विचार काय तुला विचारावयाचें असेल तें ?

उद्दालकांनी कांहीं एक न बोलतां आपली मान खालीं घातली. (श. प. १४–६–७–१ तें ३१)

---

## गार्गीचा याज्ञवल्क्यांना नमस्कार !

उद्दालक आरुणि उठून गेल्यावर पुन्हां गार्गीने उचल खाल्ली आणि नव्या दमाने वाद करावयास पुढें आली. ती उठून सभेंतील मंडळीस उद्देशून म्हणाली,—"विद्वज्जनहो, मी आतां याज्ञवल्क्याना दोन प्रश्न विचारीत आहे. त्याचें उत्तर त्यानीं दिल्यास त्याच्यासारखा ब्रह्मज्ञानी कोणीही नाही असें म्हणावें लागेल. ज्याप्रमाणे काशी अथवा विदेह देशांतील शूर घराण्यातला एखादा धनुर्धारी वीर धनुष्याला दोरी चढवून अणुकुचिदार तीक्ष्ण असे बाण हातांत घेऊन उभा राहावा, त्याप्रमाणे मी हे दोन प्रश्न घेऊन आपल्यापुढे उभी आहे. त्या प्रश्नाची नीट व सरळ उत्तरे मिळावीत"

याज्ञवल्क्य : विचार, गार्गि, खुशाल विचार. दोनच काय तुला हवे तितके विचार.

गार्गी : जें द्युलोकाच्या वर आहे, जें पृथ्वीच्या खाली आहे, जें या द्यावापृथ्वीच्या मध्यें आहे, ज्याला भूत, वर्तमान व भविष्य असें म्हणतात, ते कशामध्यें ओत व प्रोत आहे ?

याज्ञवल्क्य : ते आकाशात ओत व प्रोत आहे.

गार्गी : अगदी बरोबर. आपण माझ्या प्रश्नाला बरोबर उत्तर दिलेत म्हणून मी आपणास आदरपूर्वक वंदन करते.

असें म्हणून तिनें त्याना दोन्ही हात जोडून नमस्कार केला.

याज्ञवल्क्य : आता तुझा दुसरा प्रश्न काय तो विचार.

गार्गी : ते आकाश कशात ओत व प्रोत आहे ?

याज्ञवल्क्य : याचे उत्तर जें ब्रह्म जाणणारे आहेत,ते असे सांगतात की, आकाश ज्यांत ओत व प्रोत आहे तें क्षयरहित ब्रह्म होय.

गार्गी : आणि ते ब्रह्म कसें आहे ?

याज्ञवल्क्य ते ब्रह्म अस्थूल, अनणु, अन्हस्व व अदीर्घ आहे. तमेच ते अप्रकाश व अस्नेह आहे शिवाय ते तमोरहित, छायारहित, वायुरहित, आकाशरहित व सगरहित आहे ते ब्रह्म असे आहे की, त्याला गध नाही, चक्षु नाही, श्रोत्र नाही, वाणी नाही, मन नाही ते तेज, प्राण, मुख, मात्रा, अतरबाह्य यानी, रहित आहे ते काही खात नाही व त्याला कोणी भक्षण करीत नाही असे हे ब्रह्म आहे

गार्गी आणखी काही.

याज्ञवल्क्य : या अक्षर ब्रह्माच्या नियत्रणाने निर्माण केलेले हे सूर्यचद्रदेखील त्याच्या नियमानुसार वागतात त्याच्याच नियत्रणाने निर्माण केलेली द्यावापृथ्वी त्याच्या नियमानुसार जेथल्या तेथे स्थिर आहेत त्याचप्रमाणे हे निमेष, मुहूर्त, अहोरात्र, पक्ष, मास, ऋतु व सवत्सर ही सर्व त्याच्याच नियंत्रणाने स्थिर होऊन राहिली आहेत त्याच्याच नियत्रणाने पर्वतापासून नद्या चोहोकडे वाहतात मनुष्य दान देणाऱ्याची व देव यजन करणाऱ्याची प्रशसा करतात, हे देखील त्याच्याच नियत्रणामुळे होय पितर दर्वी होमाची प्रससा करतात, तेही त्यामुळेच या अक्षरब्रह्माला न जाणता जो या लोकी हवन करतो, यज्ञ करतो, हजारो वर्षे तप करीत राहतो, ते त्याचे सर्व फळ अतयुक्त असून निरुपयोगी होते या ब्रह्माला न जाणता जो या लोकी मरण पावतो, तो खरोखर कृपण होय जो याला जाणून मरण पावतो, तो खरा ब्राह्मण होय

गार्गी : आपणास आणखी काही सागावयाचे असल्यास तेहि सागून टाकावे

याज्ञवल्क्य : ऐक, गार्गि- या ब्रह्माचे एकेक लक्षण नुसती ऐकत रहा. ते हे अक्षरब्रह्म अदृष्ट आहे, म्हणजे ते आतापर्यंत कोणाला दिसले नाही पण गम्मत ही की, हे सर्व पाहणारे मात्र तेच आहे ! तसेच ते अश्रुत आहे पण ऐकणारे मात्र तेच ते अमत असून, मनन करते अविज्ञात असून, सर्व काही जाणते या ब्रह्माहून दुसरा कोणी द्रष्टा नाही, श्रोता नाही, मन्ता नाही किंवा ज्ञाता नाही या ब्रह्मातच आकाश ओत व प्रोत आहे

गार्गी आता पूर्वीची गार्गी राहिली नव्हती याज्ञवल्क्याचे ते सुंदर व अर्थगंभीर भाषण ऐकून तिचा सर्व अभिमान थिजून गेला होता तिने याज्ञवल्क्यास आदरपूर्वक नमस्कार करून, तेथील ब्राह्मणास उद्देशून खणखणीत आवाजात म्हटले, "ब्राह्मण हो, याज्ञवल्क्याला नमस्कार करूनच मोकळे व्हा कारण ब्रम्हज्ञानात त्याना जिंकण्यास तुमच्यात कोणीच समर्थ नाही" इतके बोलून याज्ञवल्क्याला पुन नमस्कार करून ती स्वस्थानी गेली- ( श प १४-६-८-१ ते १२ )

# एक अद्‌भूत चमत्कार !

गार्गीचे भापण ऐकून तेथील सर्वांची तोड खारकन् उतरून निस्तेज पडली आपण सर्व खास हरलो या भावनेन जो तो मनात खिन्न होऊन चरफडू लागला आणि क्षणभर सभेमध्ये सर्वत्र स्मशान शातता पसरली

इतक्यात अश्वलायन शाखचे प्रख्यात पुरस्कर्ते विदग्ध शाकल्य मुनि–याज्ञवल्क्याचे एक माजी गुरुदेव–हे उठून वादक्षेत्रात दाखल झाले त्याना पाहून सभत पुन नवचैतन्याचा सचार झाला व त्या निराश सभागृहात पुन आशचे व उत्साहाच वातावरण खेळ लागले

हे शाकल्य आचार्य म्हणज होतेच तसे वृहस्पति वादकौशल्यात त्याचा मोठा लौकिक होता ऋग्वेदावर त्याचा हुकमी अधिकार होता तत्त्वज्ञानावरील त्याचे प्रभुत्व तसेच दाडगें होते त्याविपयी कोणाचा मतभेद नव्हता हा हुकमी मोहरा वाद क्षेत्रात उतरलेला पाहून सभा पुन उत्साहभरित झाली शाकल्य महापडिताच्या तेजापुढ व प्रश्नाच्या सरवत्तीपुढे याज्ञवल्क्य कसं टिकणार आणि काय जय मिळविणार? स्वारी लवकरच गडगडून पडणार या कसच्या भावनेने जो तो हुरळून गेला व याज्ञवल्क्याचा नक्षा केव्हा व कसा उतरेल, हे पाहण्यास जो तो मोठ्या आशेने वाट पाहू लागला

पुढे लवकरच वादास तोड लागले व शाकल्यानीच चर्चेस प्रारभ केला ते म्हणाले–याज्ञवल्क्या, आता माझ्याशी गाठ आहे समजले ना ?

याज्ञवल्क्य ठीक आहे समजलो

शाकल्य मग आता माझ्या प्रश्नास सरळ उत्तरे देत जा माझा पहिला प्रश्न असा की, देव किती आहेत ?

याज्ञवल्क्य देव ? ते तीन आणि तीनशे, तीन आणि तीन हजार

शाकल्य . म्हणजे काय? थोडक्यात पुनः साग किती आहेत ते ?

याज्ञवल्क्य : तेहतीस आहेत.

शाकल्य . पुन साग देव किती ?

याज्ञवल्क्य सहा.

शाकल्य . देव किती ?

याज्ञवल्क्य · तीन.

शाकल्य · पुन साग देव किती ?

याज्ञवल्क्य दोन

शाकल्य किती ?

याज्ञवल्क्य : दीड

शाकल्य . अखेरचे एकच उत्तर दे. देव किती ?

याज्ञवल्क्य शाकल्यमुने ! देव एकच आहे. हेच माझें शेवटचें उत्तर.

शाकल्य . ठीक आहे, तुझ्या म्हणण्याचा मथितार्थ समजलो. तीन आणि तीनशे, तीन आणि तीन हजार देव आहेत असे तू प्रथम म्हटलेस. पण ते देव कोणते ?

याज्ञवल्क्य : शाकल्यमुने ! या सर्व देवांच्या विभूति आहेत प्रत्यक्ष देव नव्हेत. तसें सांगायचें म्हणजे देव हे फक्त तेहतीसच आहेत.

शाकल्य हे तरी खरे ना ? मग साग, ते तरी कोणते ?

याज्ञवल्क्य आठ वसु, अकरा रुद्र व बारा आदित्य. हे असे एकतीस आणि त्यात इद्र व प्रजापति मिळवून तेहतीस.

शाकल्य : आठ वसु, कोणते ?

याज्ञवल्क्य · अग्नि, पृथ्वी, वायु, अतरिक्ष, आदित्य, द्यौ, चद्रमा व नक्षत्रें हे आठ वसु आहेत.

शाकल्य : कारण ?

याज्ञवल्क्य त्यामध्येच सर्व विश्वजात वास करते म्हणून.

शाकल्य : आणि अकरा रुद्र ?

याज्ञवल्क्य शरीरात असणारी दहा इंद्रिये आणि अकरावा आत्मा मिळून अकरा रुद्र

शाकल्य याना रुद्र म्हणण्याचे कारण ?

याज्ञवल्क्य : शरीर सोडून जाताना हे प्राण्यास रडवितात म्हणून.

शाकल्य ' आता बारा आदित्याचा खुलासा कर.

याज्ञवल्क्य : सवत्सराचे जे बारा महिने आहेत, त्यानाच आदित्य ही सज्ञा आहे याना आदित्य म्हणण्याचे कारण ते हे सर्व घेऊन जातात.

शाकल्य आता तुझा इद्र कोण ते साग ?

याज्ञवल्क्य : गर्जना करणारा,गडगडाट करणारा–तो इद्र.

शाकल्य : आणि प्रजापति ?

याज्ञवल्क्य : तो पशु होय

शाकल्य . याज्ञवल्क्या, येथपर्यंत तू सगळे ठीक बोललास हे तेहतीस देव तुझे बरोबर आहेत. आता मला साग की, तू उल्लेखिलेले सहा देव कोणते ?

याज्ञवल्क्य अग्नि, पृथ्वी, वायु, अतरिक्ष, आदित्य आणि द्यौ हे असे सर्व मिळून सहा देव होत.

शाकल्य : ठीक, तीन कोणते ?

याज्ञवल्क्य : हे जे तीन आहेत, ते लोक आहेत त्यातच सर्व देव राहतात.

शाकल्य दोन म्हणालास ते कोणते ?

याज्ञवल्क्य अन्न आणि प्राण

शाकल्य · दीड कोणता ?

याज्ञवल्क्य . हा जो वाहतो तो वायु

शाकल्य हा वायु एकटाच वाहतो असे म्हणतात मग तू दीड म्हणतोस हे कसे काय ?

याज्ञवल्क्य या वायूमध्येच हे सर्व वृद्धि पावते म्हणून याला दीड म्हणतात

शाकल्य हा तुझा खुलासा मला पटला आता तुझा एक देव तो कोणता ?

याज्ञवल्क्य प्राण तो ब्रह्म होय त्याला त्यत् हे परोक्ष नाव आहे शाकल्यमुने, पुन ऐका पृथ्वी हा ज्याचा आश्रय आहे, अग्नि ज्याचा चक्षु आहे, मन ज्याचा सकल्प करणारा आहे अशा सर्व आत्म्याचा परम आश्रय असलेल्या पुरुषाला जो जाणतो, तोच पडित होय

शाकल्य याज्ञवल्क्या, तू ज्याला सर्व आत्म्याचा परम आश्रय म्हणतोस तो पुरुष मी जाणतो शरीरात जो राहतो तोच हा होय तो कामगय आहे स्त्री ही त्याची देवता आहे.

याज्ञवल्क्य हे मुने, रूप हा ज्याचा आश्रय आहे, चक्षु हा ज्याचा पाहण्याचे साधन आहे आणि मन हा ज्याचा सकल्प करणारा आहे, अशा सर्व आत्म्याचा परम आश्रय असलेल्या पुरुषाला जो जाणतो तोच पडित होय

याप्रमाणे पुरुषाविषयी त्या दोघात पुष्कळ प्रश्नोपप्रश्न झाल्यावर शेवटी याज्ञवल्क्य म्हणाले—शाकल्यमुने, या ब्राह्मणानी आपणास निखारे उचलण्याचा जणू काय चिमटाच केला आहे. या भाषणाने शाकल्य थोडेसे चिडले व म्हणाले—याज्ञवल्क्या, कुरु

व पाचाल देशीच्या या विद्वान ब्राह्मणाना तू असे टाकून का बोलतोस तू तरी ब्रह्म जाणतोस काय ?

याला याज्ञवल्क्यानी सरळ उत्तर देऊन काही यज्ञविषयक विचारलेल्या प्रश्नाना चोख व समपक जबाव दिला अखर त्यानीच उपनिषदोक्त ज्ञयपुरुषाविषयी शाकल्याला हुकमी प्रश्न टाकून एक झणझणीत इशारा दिला की, शाकल्यमुन हा जो मी तुम्हास औपनिषदिक पुरुषाविषयी प्रश्न विचारला आहे, त्याचें उत्तर सागता न आले तर तुमचें मस्तक तुटून पडेल

दुर्दैवाची गोष्ट ही की हे ज्ञान शाकल्यास नव्हते मौन धारण करून खाली मान घालून ते बसतात ताच त्याचे मस्तक तुटून खाली पडल ! हा जो चमत्कार झाला तो सूर्यनारायणान याज्ञवल्क्यास दिलेल्या वराचा प्रभाव होय तो वर असा 'जो कोणी याज्ञवल्क्याचा अपमान करील त्याचे मस्तक तुटून पडेल' या वराची येथ योग्य अम्मलबजावणी झाली ( बृ दा अ ३ ब्रा १ व आन्हिक सूत्रावलि पृ ३५७ )

हा अदभुत व अनपेक्षित चमत्कार पाहून ती सभा भीतीने हादरून गेली जो तो मनातल्या मनात चरकल्या व चपापल्या-सारखा झाला ऋग्वेदाचार्य शाकल्यमुनीची ही स्थिति झालेली पाहून याज्ञवल्क्यापुढें यऊन वादविवाद करून त्यास जिकण्याची कल्पना देखील करण्यास कोणीही धजना ब्रम्हिष्ठ म्हणवू घेणेहि नको, याज्ञवल्क्याशी सामना देणेंहि नको, अशी ज्याची त्याची मनोभावना झाली अर्थात् ब्रम्हिष्ठ म्हणवून घण्याची त्याची हौस जिरली याज्ञवल्क्य हे काही वेळ वाट पाहून पुढें कोणीही यत नाही, असे पाहून म्हणाले, ब्राह्मणहो, तुम्ही सर्वजण मिळून अगर तुमच्यात जो कोणी तसा समर्थ असल त्यान मला वाटल तो प्रश्न

करावा मी त्यास सरळ जबाव देईन आणि मीही तुम्हा सर्वांना मिळन अगर तुमच्यातील माझ्या मर्जीस येईल त्यास वाटेल तो प्रश्न विचारीन त्याच उत्तर मात्र मिळाले पाहिजे. कबूल असेल तर हो म्हणा 'असे बोलून ते उत्तराची वाट पहात बसले (बृ अ ३ब्रा ९)

सगळी सभा चित्रासारखी तटस्थ झाली वादविवादाला पुढे येण्यास कोणीहि धजले नाही अर्थात्च याज्ञवल्क्य विजयी झाले याचा जयजयकार झाला नि विजयश्रीनें त्याना माळ घातली, सूर्य-देवाला धन्यता वाटली आणि सरस्वतीला परमानद झाला जन-कराजे आनदात डोलू लागले व याज्ञवल्क्य त्या भूदेवसभेंत ब्रम्हिष्ठ ठरले याज्ञवल्क्याच्या सूचनेवरून त्याचा शिष्य सामश्रव उठला व त्या जनक राजाच्या हजार गायी सर्वांदेखत त्याने आश्रमाकडे वळविल्या ( श प १४, अ ६ ब्रा ९ )

याज्ञवल्क्याच्या या दिग्विजयाची नौबत जिकडे तिकडे झड् लागली जनकानी याज्ञवल्क्याचे त्या सभेंतील अगाध व अमर्याद ज्ञानभाडार व हुकमी वादकौशल्य पाहून आनदा-श्चर्याने चकित होऊन त्यास ब्रम्हिष्ठ म्हणून नमस्कार केला व पुढ त त्याच परम शिष्य झाले वरील सभेची सविस्तर हकीकत शतपथात वर्णिलेली आहे बृहदारण्यकातहि ती पाहावयास मिळेल या जगविख्यात जनकयज्ञातील या विव्दत्सभेचा सस्म-रणीय इतिहास आचद्रार्क विसरला जाणार नाही

याज्ञवल्क्याचा प्रथितयश विद्वानाशी व तत्ववेत्त्याशी झालेला चुरशीचा सामना, त्याचा विजय व ब्राम्हणश्रेष्ठत्वाचा त्यास मिळालेला बहुमान म्हणजे तत्वज्ञान नैपुण्याचा व

विचारकौशल्याचा सुंदर संस्मरणीय महाकळसच होय. त्यांनी यापावेतो किती तरी लोकापवादास धुन घनजी व प्रतिपक्षावर अप्रतिम मात करून अद्वितीय व दुर्दमनीय कर्मवीर व ज्ञानवीर अशी दिगंत कीर्ति मिळवली. एकेकाळी गुरुस्थानी असलेल वैशंपायन, उद्दालक आरुण्य, यासारख्या धुरंधर, महाज्ञानी अतिर-थींशी धैर्याने झुंज देऊन सर्वांवर मात करून अनेक जिंकली यात्र प्रमाणे पुढे त्याची उत्तरोत्तर भरभराट होऊन त्याचा यश निधि शेवटपर्यंत सारखा उचंबळतच राहिला. त्याला ओहटी अशी कधीच लागली नाही. जसे ते कर्मकांडात व तत्त्वज्ञानात खडे विकसी ठरले, तसेच योगशास्त्रातहि अत्यंत निष्णात असल्यामुळे त्यांना पुढे योगीश्वर हा बहुमान कसा मिळाला, ती कथा पुढे येणारच आहे.

---

# याज्ञवल्क्य व जनक

या प्रकरणात याज्ञवल्क्य व जनक यांच्या संबधाने थोडीफार चर्चा केली आहे कारण ही जी गुरुशिष्याची जोडी आहे ती व्यक्तिशः कोण असावी याबद्दल अनेक विद्वानांची दिशाभूल झाली असून ते मोठ्या गोंधळात पडल्यासारखे दिसून येतात

सहृदयांनी येथें हे सांगितले पाहिजे की योगीश्वर याज्ञवल्क्याचे चरित्र समजून घ्यावयाचे झाल्यास तें एकाच ठिकाणी व एकाच ग्रंथात साद्यंत सापडणे शक्य नाही मात्र ज्याना याज्ञवल्क्य कोण व काय हे समजून घ्यावयाचे असेल, त्यांनी प्रथम शतपथ ब्राह्मणाकडेच वळले पाहिजे त्यात त्याचा इतर कोणकोणत्या व्यक्तींशी संबंध आला आहे व इतर कोणत्या ऐतिहासिक गोष्टींचा त्यात उल्लेख सापडतो याची खातरजमा करून घेऊन, मग त्या रोखाने उपनिषद, भारत, विष्णु वायु, मत्स्य, स्कंद, भागवत वगैरे पुराणें व इतर अनेक प्राचीन ग्रंथाचे निरीक्षण व परीक्षण करून त्यातून मिळालेली उपयुक्त व उपकारक माहिती घेऊन सुसंगत मांडणी केली तरच हा उलगडा होईल नुसता एखादा दुसरा ग्रंथ चाळून तेवढ्यावरून याज्ञवल्क्यावर बोलू पाहणे हे समजसपणाचे होणार नाही आणि हाच दोष, आमच्या उथळ आक्षेपकाच्या बाबतीत नेमका आढळून आला आहे

जनक, याज्ञवल्क्य, जनमेजय, वसिष्ठ, विश्वामित्र इत्यादि नावावरून लोकांचा फार मोठा गैरसमज होण्याचा संभव आहे आणि तो तसा आमच्या आक्षेपकाच्या बाबतीत झालाहि आहे जनक म्हटला की श्रीरामचंद्राचा सासरा–सीतेचा बाप–ही व्यक्ति चटकन् डोळ्यासमोर उभी राहते आणि याज्ञवल्क्याचे नाव

निघनाच वाजसनेय याज्ञवल्क्य याची अचूक आठवण होते वृहदारण्यकातील जनक–याज्ञवल्क्य याची दुकल पाहून अधिक विचार न करता सामान्य लोक एकदम वाजसनेय याज्ञवल्क्याचा सबध जानकीच्या बापाशी लावून पार मोकळे होतात ! पुष्कळ सशोधकाची देखील अशीच दिशाभूल झाली आहे जनक हे व्यक्तीचे नाव नसून कुलाचे आहे आणि त्यात निमीपासून कृतिपर्यंत एकदर एकूणसाठ (५९) राजे होऊन गेले असून त्यात सीतेचा बाप–त्याचे नाव सीरध्वज असे आहे हा निमीपासून दहावा वशज ठरतो आणि कृति जनक हा शेवटचा म्हणजे ५९ वा ठरतो पुराणात मुख्य नावाचा उल्लेख बहुतेक न करता वश नामाचा उल्लेखच सर्वत्र करण्यात आला आहे आणि यामुळे समजुतीत असा घोटाळा होणे शक्य आहे

अशीच गोष्ट याज्ञवल्क्य नावासबधाने झालेली दृष्टोत्पत्तीस येते याज्ञवल्क्य नावाच्या पुराणात चार व्यक्ति असून, याज्ञवल्क्य म्हणताच जो तो वाजसनेय याज्ञवल्क्य घेऊन बसतो तेव्हा वृहदारण्यकात याज्ञवल्क्य–जनक या जोडीचा एकत्र उल्लेख आला असला तरी त्यात जनक व्यक्ति कोण व त्या व्यक्तीचा याज्ञवल्क्याशी सबध आलेला खरा याज्ञवल्क्य कोण याचा करावा तितका विचार महाराष्ट्रात अद्यापपर्यंत कोणी केलेला दिसत नाही

प्रारभी वृहदारण्यकात जनक –याज्ञवल्क्य याची जी जोडी दृष्टोत्पत्तीस येते त्यातील याज्ञवल्क्य कोण याची थोडक्यात शहानिशा करून मग तो जनक कोण हे दाखविण्याच्या भरीस पडू वृहदारण्यकातील जनकाला उपदेश करणारे याज्ञवल्क्य हे वाजसनेय याज्ञवल्क्यच होत, याविषयी सशयाला मुळीच जागा

नाही. कारण बृहदारण्यक हे शतपथातील चौदाव्या कांडातील एक भाग असून त्या ग्रंथाच्या शेवटी 'आदित्यानीमानि शुक्लानि यजूंषि वाजसनेयेन याज्ञवल्क्येनाख्यायन्ते' असा स्पष्ट लेख असून, त्यावरून शतपथांतर्गत बृहदारण्यकातील जनकाचे गुरु याज्ञवल्क्य हे वाजसनेयच होत याविषयी संशयच राहात नाही. हे वाजसनेय याज्ञवल्क्य ब्रह्मराताचे चिरंजीव असून ते वैशंपायनाचे भाचे लागतात हा इतिहास ग्रंथारंभी आम्ही दिलाच आहे. ब्रह्मराताला वाजसनि म्हणजे अन्नदाता असे टोपण नाव होते त्या वाजसनीचा मुलगा तो वाजसनेय होय 'वाजसनि' याचा अर्थ सूर्य असा असून, त्या सूर्याचा शिष्य तो वाजसनेय असाहि अर्थ लावता येतो आणि याज्ञवल्क्यांनी सूर्याची उपासना करून शुक्ल यजुर्वेद मिळविला ही गोष्ट इतिहास पुराणात ठिकठिकाणी नमूद आहे त्याविषयी येथे निराळा पुरावा देण्याचे कारण नाही शिवाय महाभारतातील शांतिपर्वात ज्या याज्ञवल्क्यांनी जनकाला उपदेश केला आहे, तेच याज्ञवल्क्य खुद्द आपल्या तोंडानेच आपला थोड-क्यात इतिहास सांगून आपण शतपथ हे रहस्यसहित सूर्यापासून मिळविले व मामाशी भांडून यज्ञात अर्धी दक्षिणा घेतली असे स्पष्ट व स्वच्छ सांगतात

( महाभारत, शांतिपर्व अ ३१३, कुंभकोण प्रत )

हा इतिहास प्रत्यक्ष वाजसनेय याज्ञवल्क्याच्या वाणीतूनच बाहेर आला आहे मग आता आणखी काय पाहिजे ? त्यात मातुलाचा–म्हणजे वैशंपायनाचा उल्लेख असून, जनमेजयाच्या सर्पसत्रातील सदस्यत्वाचा मान मिळविलेले व जनक यज्ञातील मामा–भाच्याचे दक्षिणाविषयक भांडण मिटवणारे देवल महर्षि-चाहि निर्देश आहे सूर्यापासून वेद मिळविलेली हकीकत प्रथमच

सांगितली असल्याने एकदर संदर्भावरून ब्रह्मराति उर्फ वाजसनेय याज्ञवल्क्याचाच अचूक बोध होतो.

जनकवंशात शेवटचा जनक कृति होय याबद्दल विष्णुपुराणात उल्लेख आढळतो तो असा, 'तस्मात्मजस्तता वीतहव्यस्तस्मात्धृतिः धृतेर्बहुलाश्वस्तस्य पुत्रः कृतिः कृतौ सतिष्ठतस्य जनकवंश,' (अं ४, अ ६, श्लो १२) अदतापासून सुनय, सुनयापासून वीतहव्य, वीतहव्यापासून धृति, धृतीपासून बहुलाश्व व बहुलाश्वापासून कृति होय कृति नतर जनक वंश संपुष्टात येतो. या वचनावरून कृति हा जनकवंशज ठरतो हे निर्विवाद आहे सीरध्वजाला रामायणात जसे जनक या नावानेच संबोधिले आहे तद्वत कृतीला देखील बृहदारण्यकात फक्त जनक या नावानेच उल्लेखिले आहे, पण त्या वंशवाचक नावावरून सर्व ठिकाणी व सर्व काळी एकाच व्यक्तीचा बोध होतो, असे धरून चालणे व्यवहाराला धरून होणार नाही

हा कृति हिरण्यनाभाचा शिष्य होता हेही दाखविता येते. हिरण्यनाभशिष्यश्च चतुर्विंशति संहिता.। प्रोवाच कृति नामासौ शिष्येभ्य सुमहामति ॥ असे विष्णुपुराणात चक्क म्हटले आहे येथे कृति हा हिरण्यनाभाचा शिष्य होता असा स्पष्ट उल्लेख आला आहे आणि ज्याअर्थी तो हिरण्यनाभाचा शिष्य ठरतो, त्याअर्थी तो याज्ञवल्क्याचा गुरुबंधूहि ठरतो, हे निराळे सांगावयास पाहिजे असे नाही. याज्ञवल्क्यानी हिरण्यनाभाच्या जवळ राहून योगाभ्यास चालू केला व हा हिरण्यनाभ व्यासाचा सामवेदी शिष्य जो जैमिनी त्याच्या नातूचा म्हणजे सुकर्माचा शिष्य होता, हे आम्ही मागे दाखविलेच आहे. पारिक्षित जनमेजय, वैशंपायन, वाजसनेय याज्ञवल्क्य, हिरण्यनाभ,

कृति जनक व उद्दालक आरुणि हे सर्व समकालीनच ठरतात या विषयी वाद मुळीच राहत नाही विशेषत वरील सर्व विवेचनाचे सार खाली दिलेल्या आकृतीवरून मूज्ञ वाचकाच्या सहज ध्यानात येणार आहे




या वरील आकृतीवरून पारिक्षित जनमेजय, वाजसनेय, याज्ञवल्क्य व कृतिजनक यांचा मेळ बसतो व त्या प्राचीन ग्रंथातून इतिहासाची कशी सुंदर संगति लागते हे पटते व रामाचा सासरा सीरध्वज जनक हा वाजसनेय याज्ञवल्क्याच्या काळी ह्यात असणे शक्यच नसल्यामुळें त्याचा संबंध जोडू पाहणे हे ऐतिहासिक दृष्टया निव्वळ वेडेपणाचे आहे असे म्हणण्यास हरकत नाही

---

# मैत्रेयीची मनस्थिति

भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासात जनक दरबारातील विद्वत् परिषद ही एक अजरामर, अविस्मरणीय अशी गोष्ट आहे झालेल्या चर्चात्मक वादक्षेत्रात आपल्या अपूर्व व अलौकीक बुद्धिसामर्थ्याने याज्ञवल्क्याने मिळविलेला प्रचंड विजय पाहून जनक राजे विस्मयचकित व आनंद-भरीत झाले,इतकेच नव्हे तर ते त्या योगीश्वराचे परमशिष्य व अनुयायी बनले तेव्हापासून याज्ञवल्क्याचा यशोदुंदुभी जगभर सतत गाजत राहिला आहे व भरतखंडभर जगद्गुरूची महनीय प्रतिष्ठा त्यांना लाभली आहे

या जनकसभेमध्ये मैत्रेयी ही हजर असून आपल्या मावशीजवळ बसून तेथील सर्व वादसंवाद ऐकत होती व घडलेला सर्व प्रकार तिने संपूर्ण पाहिला याज्ञवल्क्याचे दिव्य ज्ञान, तेज, विद्वत्ता, वादपटुता इत्यादि पाहून त्या सभेत जमलेला सगळा श्रोतवृंद भांबावून भांबडाव दिङ्मूढ होऊन गेला होता मग तरुण व भाबड्या मैत्रेयीचे मन कसे ठिकाणावर राहील ? ते आश्चर्याने दिपून व आनंदाने उसळून निघाले होते मी मी म्हणविणारे ज्ञानवीर याज्ञवल्क्याशी वाग्युद्ध करण्यास मोठ्या हिरीहिरीने वादक्षेत्रात पदार्पण करीत पण पुढे क्षणार्धातच दीपावरील पतंगाप्रमाणे त्याच्या ज्ञानतेजाने दिपून जाऊन पटापट पतन पावत. उद्दालक आरुणि – याज्ञवल्क्याचे मंत्रविद्येचे गुरु, महाविदुषी गार्गी वाचक्नवी, वेदमित्र शाकल्य यासारखे प्रथितयश पंडीतकुलशेखर देखील गुरु देवाच्या देदीप्यमान प्रतिभा तेजाने दिपून हतप्रभ होऊन मान खाली घालण्याशिवाय राहिले नाहीत हा प्रकार पाहून खरो-

वर मैत्रयी स्तभीतच झाली. आणि का नाही होणार ? एवढे मोठे जनकराजे. ते देखील याज्ञवल्क्याचे ज्ञानसामर्थ्य नि वादकौशल्य पाहून विस्मयचकित होऊन गेले होते. मग या अल्लड तरुण–तरुणीची तर काय कथा ?

याज्ञवल्क्य या वेळी जवळ जवळ पन्नाशीच्या घरात आले असतील नसतील. त्यावेळी हे वय म्हणजे वैदिक आर्यांचे भर तारुण्य. आज सुधारणेची प्रौढी मारणाऱ्या सुधारलेल्या युगात मनुष्य पन्नाशीच्या घरी आला म्हणजे कृतांतकटकवजाकडे दृष्टि लावून बसल्यासारखा दिसतो. पण त्या काळी पन्नाशीचे वय म्हणजे भर तारुण्याचा ऐन बहर. 'शत जीवेम शरद'चा तो चालता काळ. शभरच का, अधिक जगण्याचा ' भूयश्च शरद. शतम्'चा – तो तेजस्वी काळ होता. त्यावेळची वयोमर्यादा कमीत कमी शभर वर्षांची असून जास्तीत जास्त म्हणजे दीडशे पावणेदोनशे पर्यंत होती.

उदाहरण देऊनच सांगायचे म्हणजे भीम, अर्जुन, राम, श्रीकृष्ण, भीष्म, व्यास वगैरे सर्व दीर्घजीवी होते, भीम, अर्जुन धर्मराज यांचे आयुष्य ११५ ते १३० वर्षांचे, भगवान श्रीकृष्णाचे १३५ वर्षांचे, वसुदेव-देवकी ही १५० वर्षांची, व महर्षि व्यास यांचे आयुष्य १७५ हून पुढे गेलेले होते. आज लोकांना हे खरे सुद्धा वाटणार नाही. पाचव्या वर्षी ज्याच्या डोळयाला आरसी लागते, पंचवीसाव्या वर्षी ज्याच्या डोक्यावर रुपेरी छटा छळकू लागते, आणि चाळीसाव्या वर्षी ज्याच्या तोंडाचे बोळके होते त्याच्यावर पन्नास-साठीच्या आतच जरठपणाची सारी लक्षणे दोरावू लागतात, अशा अल्पायु व दुर्बल युगात पन्नाशीचे वयमान म्हणजे जवळजवळ तो आयुष्याचा मध्याकालच. पण अशी शोककथा भारत काळी नव्हती, ' शतायुर्वै पुरुष. 'चा

तो चालता काळ होता तात्पर्य याज्ञवल्क्य पंचचळीशीच्या घरी आले होते तरी ते आजच्या पहिल्या पंचवीशीच्या तरण्याबांडा-प्रमाणेंच तजस्वी, तरतरीत व उत्साहभरित दिसत होते त्यावेळी त्यांचा चेहरा सूर्याप्रमाण सुतेजस्वी व चंद्राप्रमाण प्रफुल्ल व प्रसन्न दिसे

त्यांची मनोहर शरीरकांति, प्रसन्न चेहरा, अगाध विद्वत्ता, अफाट ज्ञानवैभव, सूक्ष्म व सखोल शास्त्राध्ययन, अप्रतिम वाद-कौशल्य, अलौकिक बहुश्रुतपणा, हुकमी वर्चस्व हे सर्व पाहून या नवतरुण मैत्रयीला काय वर वाटल असेल? अविवाहित राहण्याची तिची इच्छा आता ठिकाण धरून राहिली असेल काय? याज्ञवल्क्यांचे दिव्यगुणैश्वर्य व जनकसभतील त्यांचा महापराक्रम-पाहून खरोखर ती दिपूनच गली होती आणि तिच्या मनात काही तारुण्यसुलभ आकांक्षा उत्पन्न झाल्या असल्यास त्यात नवल नाही तशात गार्गी, उद्दालक यांच्याशी झालेलं ते अभूतपूर्व वाग्युद्ध पाहून तर ती भानच विसरल्यासारखी झाली होती तिचे मन डळमळून ती चलविचल झाली नसेल असं कोणी सांगावे? त्या दिवसापासून तिच्या मनात प्रेमभावनेचा नवोदय झाला असला तर त्यात अस्वाभाविक असं काय आहे? वयात आलेल्या तरुण स्त्री मनाचा तो सहज स्वभावच नाही काय? थोडक्यात सांगावयाचे म्हणजे याज्ञवल्क्यांनी त्या सभेत वाग्युद्ध खेळून जसा ज्ञानवीरावर दणदणीत विजय मिळविला, तसाच त्यांनी त्या तरुण कुमारीच्या प्रेममुग्ध अंतःकरणावरहि हुकमी प्रभाव पाडला असे म्हटले तर ती अतिशयोक्ति होणार नाही

---

# वरीन तर याज्ञवल्क्यच वरीन

मैत्रेयी ही तरुण व विद्यामंडित होती ती जरी ज्ञानसंपन्न व विद्यामंडित असली तरी निसर्ग नियमाप्रमाणे तिच्या अंतकरणात तारुण्यसुलभ भावनेचा उदय व्हावयाचा तो झालाच होता फक्त एवढेच की, तिचे प्रेम आवळे व उल्लू नव्हते. त्याला विवेकाचे भरभक्कम कोंदण होते. ती सुंदर व दुसऱ्याचे चित्त वेधून घेणारी होती. तरी तिच्यात सात्विक वृत्तीची व विनयशीलतेची मधुर झाक मारत होती. तिला संसारसुखाची इच्छा व आवड होती तिला पती पाहिजे होता पण तिचे लक्ष केवळ इंद्रियसुख व देहार्पण यावर केंद्रित झाले नव्हते आधुनिक नवनीतीच्या भडक कल्पनेमुळे वहकून गेलेल्या नवशिक्षित तरुणीप्रमाणे हृदयाच्या हाकेला ओ देऊन, बंधनाच्या पलीकडे जाऊन केवळ क्षणभंगुर विषयलालसा भागविणे हेच इतिकर्तव्य असे ती मानीत नव्हती तिच्या मधुर भावना क्षणिक विकारतंत्र नसून त्या सभोवती नीतीचे व विवेकाचे सुंदर कोंदण विलसत होते. तिच्या सर्व आशाआकांक्षा हृदयस्थ विवेक देवतेला कौल लावूनच पुरवून घेण्याचा तिचा पवित्रा होता

मैत्रेयीच्या प्रेममंदिरात याज्ञवल्क्याची तेजस्वी मूर्ति विराजमान झाली होती हे आता लपवून ठेवण्यात स्वारस्य नाही अर्थात् ती मनोमय होती. प्रत्यक्ष याज्ञवल्क्याची प्राप्ति होणे हे दैवाधीन होते कारण विष्णूला जशी लक्ष्मी, अथवा शंकराला जशी पार्वती तशी याज्ञवल्क्याला कात्यायनी होती. मग मैत्रेयीचे मनोराज्य सत्यसृष्टीत उतरण्याची आशा कशी शक्य असणार ?

याज्ञवल्क्याचे सांसारिक आयुष्य दृष्ट लागण्यासारखे होते. प्रत्यक्ष स्वर्गहि तेथे लाजावा. मग मैत्रेयीने तिची सवत होण्याची

इच्छा करणे म्हणजे त्या मोन्यासारख्या सुंदर ममागात नागून बुजून माती कालविण्यासारखं होणार नव्हते का? आणि याज्ञवल्क्य तरी ती गोष्ट कशी कबूल करतील ? आणि तशी सूचना त्यांना करण्याचें धाडस तरी कोण व कसे करील ?

मित्र प्रधानजी हे चांगले विचारी व व्यवहारज्ञ होते त्यांचा व याज्ञवल्क्यांचा स्नेह व घरोबा होता शुक्लयजुर्वेद तयार करण्यात त्यांची याज्ञवल्क्यास मदतहि होती शिवाय अरण्यात त्यांनी त्यांचे वाघापासून प्राण वाचविले होते, हेहि खरे पण मैत्रेयीच्या लग्नाची बाब अशी काही नाजूक व बिकट होती की, तिचा याज्ञवल्क्यापुढें उच्चार करणें म्हणजे ते देवीचे एक मोठे पापच मित्रप्रधानजीला तर तसेंच दिसले कात्यायनीचा सुंदर व सुंदर समोर ते नित्य डोळ्यांनी पाहत असता आणखी या पोरक्या मुलीचा स्वीकार करावा म्हणून योगीश्वराजवळ त्यांनी कोणत्या तोंडाने म्हणावे ?

मैत्रेयीची मनीषा सफल होण्याची मित्रांना फारशी आशा दिसली नाही म्हणून ही बाब तिला नीट समजावून द्यावी आणि तिचे मन त्या हट्टापासून परावृत्त करावे असा विचार करून त्यांनी एक दिवस तिला जवळ बोलावून सर्व परिस्थिती समजावून सांगितली यापाठ अतएव ते मुली उपवर झाली म्हणजे तिचे दोन्हीचे चार हात हातोंपर्यंत रात्रंदिवस ते फार चिंताग्रस्त असत ह 'जावे त्याच्या वंशा तेव्हा कळे' ते म्हणाले," मुली याज्ञवल्क्याची पत्नी होण्याचा नाद सोड ! ही तुझी इच्छा सफल होण्यासारखी नाही तुझी आशा व्यर्थ आहे हा आग्रह सोड तुजकरता दुसरे उत्तम स्थळ पाहीन "

पण मैत्रेयी ती मैत्रेयीच तिने मनात जो निश्चय केला तो केलाच त्यात बदल करणें कालत्रयीहि शक्य नव्हते. तिची महत्वाकांक्षा पूर्ण होणें कठीण होतें हे तिला समजत नव्हते असें

नव्हे ते ती पूर्ण ओळखून होती. पण कांही झाले तरी तिने मनात पूर्ण निश्चयच केला होता की, लग्न करावयाचे ते फक्त याज्ञवल्क्याशीच. नाहीतर आपल्या मावशीप्रमाणे कडकडीत कौमार्य पत्करून ज्ञानार्जनांत सगळा जन्म काढायचा. मग याला तुम्ही दुरा ग्रह म्हणा किंवा आणखी काही म्हणा. थिल्लर हृदयाच्या चंचल लहरींवर मोकाट वाहवत जाण्यापेक्षा शांत व स्थिर विवेकाच्या गूढ व मंगल कूजनावरच तिच्यासारख्या दृढ निश्चयाच्या सुशील महिला अधिक लुब्ध असतात. त्यांची दृष्टि भावनांतर्गतीवर नसून, ती शाश्वत परिणामावर असते. या दिव्य आणि पवित्र भावनेच्या जोरावरच सीता, सावित्री, द्रौपदी, सुकन्या इत्यादि चारित्र्यसंपन्न आर्यमहिला प्रसंगविशेषी लोकोत्तर दिव्य करून इतिहासात अजरामर झाल्या आहेत.

कुमारी मैत्रेयीने आपला निश्चय मेरुप्रमाणे अटळ ठेविला. मग तिची महत्वाकांक्षा सफल होवो अगर न होवो, त्याची तिला परवा नव्हती. त्यात तिला कात्यायनीशी चुरस अगर हेवादेवा करून तिच्या मुखी संसारात आडकाठी घालून आपली सुखलालसा तृप्त करून घ्यावयाची इच्छा नव्हती. फक्त याज्ञवल्क्याची सेवाचाकरी करून कात्यायनीच्या सहानुभूतीने आपली जिज्ञासा व जीविताची सफलता पूर्ण करून घ्यावयाची होती. कात्यायनीचा स्वभाव व मन तिला पूर्ण अवगत असल्यामुळे त्या सतीची दासी होऊनहि तिच्या सानिध्यांत रहावयास ती विदुषी तयार होती. बापाच्या म्हणण्याला रुकार देऊन इंद्राचे साम्राज्य मिळाले तरी ते तिला नको होते. म्हणून तिने बापास चक्क व स्पष्ट सांगून टाकले, " पिताजी वरीन तर याज्ञवल्क्यच वरीन, नाही तर अशीच कुमारी राहीन " तिची ही स्पष्टोक्ति ऐकून बिचारे मित्र बर्फाप्रमाणे गारेगार झाले नि पुढे काही एक न बोलता त्यांनी तेथून पाय काढला.

---

# मैत्रिणीचें हितगुज

आता कात्यायनी व मैत्रेयी याचा एकमेकाकडे जाण्यायण्याचा सराव मरीस वाढला होता अशाच एका प्रसगी कात्यायनी मैत्रेयीकडे आली होती

तेथ आल्यावर इकडच्या तिकडच्या काही गप्पागोष्टी झाल्यानतर कात्यायनी तिला म्हणाली – आता गडे तुझ लग्न झाल म्हणजे मग तू कसली इथ राहतेस सासुरवाशिण होशील तुझ ते ठीक आहे पण मला मात्र चुकल्या चुकल्या सारख होईल तुझा वियोग मला जाणवल्याशिवाय राहणार नाही खरच गडे आपल प्रेम आहेच तस

मैत्रेयी म्हणाली–कात्यायनि किती कोमल ग मन तुझ प्रेम वेड म्हणतात ते अस पण एक गोष्ट लक्षात ठेव

कात्यायनी–ती काय ?

मैत्रेयी–आपला वियोग होणार नाही

कात्यायनी–तो होणार नाही काय वियोग होणार नाही ? हे तू काही तरीच म्हणतेस गडे कुठल स्थळ मिळेल तुला कोण जाण !

मैत्रेयी–लग्न झाल्यावरची ती गोष्ट ना ?

कात्यायनी–काही तरीच तुझ हे आपल लग्न झाल्याशिवाय का राहील ? आज ना उद्या ते होइलच आणि होणारच जर आसपास जवळच स्थळ जुळल तर एक गोष्ट वगळी पण समज, दूरच लाभल तर मग कस ? आम्हा स्त्रियाना सासरी जावच लागते कर्मधर्मसयोगान तू दूर गलीस तर मग आपल्या भेटीचा योग केव्हा येईल कोण जाणे मला तर आई सारखी हुरहुर लागून राहील बघ !

मैत्रेयी–अग मी लग्न करून घेईन तर.

कात्यायनी–म्हणजे ? तुझं काहीं तरी भलतंच गडे. संसार थाटावासा नाही का वाटत तुला ? आतां हे तुझे दिवसच आहेत. उपवर झाल्यावर स्त्रियानी अविवाहित राहणं चांगल नाही. तें लोकांत बरं दिसत नाहीं. तुझी अविवाहित राहण्याची कल्पना मला बाई कसेंशीच दिसते. रूप, विद्या, गुण यांत काय कमी आहे म्हणून तूं अविवाहित राहणार? मी खरंखुरं सांगते तुझ्यावर चांगल्या चांगल्या स्थळाच्या उड्यावर उड्या पडतील.

मैत्रेयी–तें सगळं खरं. पण माझ्या मनास येईल तेव्हांची ती गोष्ट.

कात्यायनी–मग अशीच कुवार का राहणार शेवटपर्यंत ? संसार हाच स्त्रियाचा खरा आनंद. स्त्रीहृदयांच सुखनिधान, तें. स्त्रीजन्माचं सार्थकच म्हण. निदान मला तरी तसं वाटत.

मैत्रेयी–कात्यायनी तुझं म्हणणं सगळ पटतंय मला. तें नाहीं म्हणत नाहीं मी. कुवारीण राहणं ही कांहीं सोपी गोष्ट नव्हे. आणि ते लोकात बरंहि दिसत नाही हेंहि कबूल. म्हणूनच स्त्रिया लग्न करून मोकळ्या होतात. कुवारपणांत जन्म काढणाऱ्या फार विरळ्या. कात्यायनि, फारच विरळ्या. पण त्या असतात हें कांहीं खोटं नाही. मात्र संसार हेंच स्त्रियांचं जीवनध्येय हें तुझं म्हणणं मात्र मला तितकस पटत नाहीं. गृहकृत्यासाठीच स्त्रियांचा जन्म असं पुरुष बरून चालतात पण तें मला मान्य नाहीं. गृहकृत्याशिवाय त्यांना दुसरी इतिकर्तव्यता नाहीं, असं कसं म्हणतां येईल. तुझं म्हणणं मला पटत नाहीं.

कात्यायनी–पण गडे खरं सांग. आम्हां स्त्रियांना गृहकृत्याशिवाय दुसरं काय आहे ? आम्हांला दुसरं काय करतां येण्या-

सारखं आहे ? आमचा आनंद काय तो सगळा एका संसारात. मुलबाळं झाली म्हणजे तोच आमचा स्वर्ग आहे.

मैत्रेयी–असं का म्हणतं आहेस. परमार्थविचार नाहीत का ? त्या आनंदासारखा दुसरा आनंदच नाही.

कात्यायनी–पण संसारातही परमार्थ आहे. नित्याचे होमहवन, पूजापुरस्कार आणि यज्ञयाग, अतिथिसत्कार यात आम्हा स्त्रियांचे पुरुषाप्रमाणेच अंग असतेच की नाही ? प्रपंचाबरोबरच परमार्थहि आम्ही साधू शकतो. पतीशी प्रपंच–परमार्थांत सहकार्य करण्यातच सर्वांचे कल्याण आहे असं मला वाटतं. तुझं काय म्हणणं आहे ?

मैत्रेयी–तुझं म्हणणं एका दृष्टीनं खरं. पण त्याशिवाय स्त्रियांना दुसरं कर्तव्य नाहीच असा त्याचा अर्थ होत नाही. आत्मज्ञान करून घेणं, स्वस्वरूप ओळखणं हें सुद्धा पुरुषाप्रमाणेच स्त्रियांचें देखील कर्तव्यच आहे, असं माझं मत आहे. मनुष्य जन्मल्यावर स्वरूपज्ञान–आत्मज्ञान ही गोष्ट स्त्रीपुरुष या दोघानांहि सारखीच महत्वाची बाब आहे. असं नाही का वाटत तुला ?

कात्यायनी–त्याला कोण नाही म्हणेल ? पण ते किती स्त्रियांना शक्य आहे ? ते म्हणजे ज्ञानी लोकांचं काम. आमच्यासारख्या सामान्य प्रापंचिकांना ते साध्य नाही. आतापर्यन्त आमच्यात अशा किती विदुषी झाल्या आहेत ? तुझ्या मावशीची गोष्ट सोड. ती अपवाद म्हणून धरू. गार्गीसारखी विदुषी म्हणजे एकटी गार्गीच ! तशा स्त्रिया हाताच्या बोटावर मोजण्याइतक्या तरी निघतील की नाही याची वानवाच आहे. हें काम खरं म्हणशील तर पुरुषांचे असून त्यानांच ते साध्य आहे. बायकांचा तो उद्योग नव्हे.

मैत्रेयी–तुम्हा बायकाना–गृहिणीना, तो एक भ्रम झालेला आहे त्यांना आत्मस्वरूपाची विस्मृति झालेली आहे ती मग कोणी केव्हा, कशी केली हे भगवतच जाणे पण तसा ग्रह तुमचा झाला आहे ह मात्र खरे तुझे हे विचार ऐकून मला एका गोष्टीची आठवण झाली माझ्या मावशीन तो मला सागितली आहे मोठो गमतीदार नि बोधप्रद गोष्ट आहे ती

कात्यायनी–मग मला साग ना मला ऐकू तरी दे गोष्टी ऐकण्याची मला हौसच आहे आणि तशात तुझ्या मावशीची गोष्ट तो त्यात काही तरी नवल विशेष असणारच

मैत्रेयी–ऐक सागते तो तुम्हा सारख्याना फार महत्वाची आहे, मनोरजन म्हणून नव्हे तर त्यातील तत्व मननीय म्हणून

कात्यायनी–मग साग तर गडे, ऐकू दे मला ती

मैत्रेयी–एका अरण्यात एक गरोदर सिंहीण राहात होती एके दिवशी तिला फार भूक लागली. म्हणून आहार शोधार्थ म्हणून ती गुहतुन बाहेर पडली आणि सावज पकडण्यासाठी इकड तिकड फिरु लागली बराच वेळ फिरली,पण सावज काही तिला सापडेना तिचा जीव भुकेन फार व्याकुळ झाला तशा स्थितीतच इकडे तिकडे भक्ष शोधीत असता सुदैवानें तिला एक दुरुन मेंढराचा कळप दिसल्याने केवढा आनद तिला झाला हळूच लपत छपत ती त्या कळपाजवळ आली आपल्या टप्यात सावज आले असे जेव्हा तिला वाटले, तेव्हा त्यातील एका मेंढरावर नेम साधून तिनें त्यावर मोठ्या आवेशाने झडप घातली पण दुर्दैव हे की, तिची झडप चुकली आणि त्यामुळें जोराने जमीनीवर तिने आपटी खाल्ली. त्यासरशी तिच्या गर्भाला धक्का लागून, पोटातील पिलू बाहेर

आले व ती सिहीण जेथल्या तेथें पडली व गतप्राण झाली लव-करच त्या कळपाचा मढपाळ तेथ आला त्याने ते छोटेसे गोजिरवाणें तिच पोर पाहिल त्याला त्याची दया आली म्हणून त्याने ते उचलून घरी आणून त्याचा साभाळ केला त्या मेंढराच्या कळपातच त सिंहाचे पोर वाढू लागले त्याला तेथील कोकराची सगत लागून, त्याच्या बरोबरच ते खाऊ,–पिऊ, नाचू–बागडू आणि हिंडू–फिरू लागल त्याकळपाबरोबरच ते रानात येऊ जाऊ लागल अस होता होता काही दिवस निघून गले

पुढ त्या कोकराच्या सगतीन त्याची अशी समजूत झाली की, आपण कोकरूच आहात आपण सिंह आहो ह त्यास कळलेच नाही सगतीचा परिणाम म्हणतात तो हा असा कोठें काही श्वापद पाहताच बकऱ्याप्रमाणे व बरोबरच तेहि भिऊन पळ काढी

कात्यायनी–सिंहाचा छावा ना तो ?

मैत्रेयी–पण उपयोग काय ? त्याला ती स्मृति कुठ होती ? आपण कोकरू आहो असा भ्रम त्याला झाला होता

कात्यायनी–शेवटपर्यंत तो भ्रम तसाच टिकला काय ?

मैत्रेयी–नाही काही काळ लोटला ते पोर जरा मोठ झाल पुढें एके दिवशी योगायोगान तो मेंढराचा कळप पाणी पिण्यास म्हणून एका ओढयावर गेला, त्यात तो सिंहाचा छावाहि होता त्याच वेळस काही अतरावर एक सिंह पाणी पिण्यास म्हणन ओढयावर आला होता त्यान तो बकऱ्याचा कळप पाहिला त्यात सिंहाचा तो छावाहि त्यास दिसला त पाहून त्यास मोठ आश्चर्य वाटले हा काय प्रकार आहे हे पहावे म्हणून तो जरा पुढे पुढे येऊ लागला पण त्या कळपाला त्या सिंहाचा लागून वास आल्याच मुळें तो सैरावैरा धावत सुटला त्या कळपाबरोबरच त सिंहा-पोरहि त्या सिंहाला घाबरून धूम ठोकीत सुटले

कात्यायनी–सिंहानें त्यास अडविलें नाहीं काय ?

मैत्रेयी–नाही. ते त्याच्या हातीं लागलेंच नाहीं. त्या कळपाबरोबर तेंहि धूम ठोकीत पळालें. मात्र त्या सिंहाला हें खपलें नाही. सिंहाचा छावा अन् तो बकऱ्याच्या कळपांत जाऊन राहतो म्हणजे काय ? हें त्यास चमत्कारिकच वाटलें. पण करणार काय ? त्याचा तेथें कांहीं इलाज नव्हता. वीरवृत्ति टाकून मेषवृत्ति धारण करणाऱ्या त्या स्वकीय पोराला पाहून त्याला फार वाईट वाटलें. तो निरुपायानें तेथून निघून गेला.

कात्यायनी–मग पुढं काय झालं ?

मैत्रेयी–तो तेथून निघून गेला खरा. पण त्याच्या जिवाला चैन पडेना. म्हणून पुनः संधि साधून तो त्या पूर्वीच्या स्थळीं आला. त्यावेळीं तें सिंहाचें पोर खेळत खेळत कळपापासून दूर आलें होतें. तें तेथें आता एकटेंच होतें. कळप दूर राहिला होता. त्या सिंहानें ती वेळ साधली आणि चटकन् धांवत येऊन तो त्याच्यापुढे अचानक उभा राहिला. त्यापोरानें त्याला पाहिलें मात्र त्याचे अवसानच गेलें नि घाबरून मटकन् तें खालीं बसलें. आणि बकऱ्याच्या दीन स्वरांत त्या वनराजास म्हणालें, मृगराज ! आपण फार थोर महानुभाव आहा. मजसारख्या क्षुद्र प्राण्याला मारुन आपला लाभ तरी काय ? मी गरीब कोंकरूं आहे. कृपा करा नि मला जिवानिशीं जाऊं द्या. हें त्या छाव्याचें दैन्यवाणें भाषण ऐकून सिंहाला फार वाईट वाटलें.

कात्यायनी–पुढं काय झालं, गडे ?

मैत्रेयी–तो सिंह त्या छाव्याला म्हणाला, अरे असा भिऊ नकोस. मी तुला इजा करणार नाहीं. पण तूं जातीनें कोण आहेस, हें तूं ओळखलेंस काय ? तें पोर म्हणालें, होय महाराज मी जातीनें

कोकरू आहे आमची जात मेंढयाची आणि मी त्यातले एक कोकरू.

कात्यायनी–काय बाई चमत्कार तरी हा

मैत्रेयी–त्या कोकराची स्थिति लक्षात घ त वस्तुत कोकरू नव्हते सिहाचें पोर होत पण त्याला आत्मस्वरूपाची विस्मृति झाली होती अर्थात् कोणत्याहि जीवाला आत्मस्वरूपाची विस्मृति झाली म्हणजे तो नादान व हीनदीन होतो, त्याच्या उद्धाराचा प्रश्न कसा विकट होतो ही गोष्ट आत्मस्मृतिभ्रष्ट झालेल्या या सिंहाच्या पोराच्या उदाहरणावरून लक्षात घेण्यासारखी आहे आता पहा पुढ काय चमत्कार झाला तो प्रसग नीट लक्ष देऊन एक

कात्यायनी–माझ लक्ष आहेच तिकड साग तू आपली

मैत्रेयी–त सिहाच पोर त्या सिंहाला पाहून चळचळ कापू लागल त्यान जमीन धरली व दीनस्वर काढून ओरडण्यास सुरवात केली ह पाहून त्या मृगराजास त्या छाव्याची मोठी कीव आली तो सिह त्याला म्हणाला बटा ! घाबरू नकोस मी तुला खाणार नाही ! पण तू माझ एकशील का ? या प्रश्नाला त्या पोरान मान हलवून होकार दर्शविला तव्हा तो सिंह त्यास म्हणाला–वेडया खरखर साग तू पाणी पीत असता तुझ प्रतिबिंब पाण्यात पडल होत ना ? ते तू पाहिलस का ? ते प्रतिबिंब कोकरासारखें होत का ? का आणखी कशासारख होत ? ते सिंहाच पोर म्हणाल–महाराज ! माझ प्रतिबिंब बकऱ्यासारख नव्हत त काही निराळच होत ' तर मग ' तो सिंह पुन त्याला म्हणाला, ' तुझ प्रतिबिंब जर कोकरासारख नव्हत तर तू बकरा कसा ? " त्याला त्या सिंहाच्या पोरान उत्तर दिल की, दोन व्यक्तीच्या स्वरूपात फरक हा असायचाच तेव्हा सिंह म्हणाला " वेडया ! तू खुळा आहेस खरोखर तू कोण आहेस याचीं

स्मृति तुला नाही आणि म्हणून तू असं बोलत आहेस. माझ्याबरोबर ये म्हणजे तू कोण आहेस हे तुझं तुलाच कळून येईल असे म्हणून तो त्या छाव्यास बरोबर घेऊन पुन त्या ओढ्यावर आला.

कात्यायनी–तिथ कशासाठी ?

मैत्रेयी–आता इथच तर गम्मत आहे. तो सिंह मोठा हुशार होता पुढ त्यान काय खुबी केली हे ऐकण्यासारख आहे

कात्यायनी–खुबी कसली ! त्यान त्याला ओढ्यात लोटून दिल असेल हेच ना ?

मैत्रेयी–छें ग तस काही नाही

कात्यायनी–मग काय तर ?

मैत्रेयी–तिथ आल्यावर त्या सिंहाने त्या छाव्यास काठावरून पुन पाण्यात पहावयास सांगितल आणि आपण त्याच्या शेजारी जाऊन उभा राहिला याचा परिणाम असा झाला की, त्या दोघाचे प्रतिबिंब त्या पाण्यात शेजारी शेजारी उमटले तेव्हा तो त्यास म्हणाला–बेटा, तुझ्या शेजारी माझे प्रतिबिंब आहे ते पहा आणि कोणासारख आहे मला साग त्या सिंहाच्या पोरान पाण्यातली ती दोन्ही प्रतिबिंब पाहून आनदाने ओरडून म्हटले की, ते माझ्या सारखच आहे दोन्ही एकच आहेत 'तर मग' तो सिंह म्हणाला, 'आता साग तू कोकरु की सिंह आहेस ?' ते सिंहाच प्रतिबिंब पाहताच त्या छाव्याचा सगळा भ्रम एकदम विरून जाऊन तेथे आत्मस्मृतीचा दिव्य प्रकाश उजळला मग आता काय ? त्या छाव्याने एकदम सिंहाप्रमाणे गर्जत म्हटल की, मी सिंह आहे कोकरू नव्हे त्याच्यात आता आत्मस्मृति जागृत झाली व त्याची सगळी भीति व भ्रम नष्ट होऊन तो सिंहाप्रमाणेच निर्भय झाला या कथेचा तात्पर्यार्थ सागावयाचा म्हणजे असा की, जोपर्यंत

या सिंहाच्या छाव्याला आत्मस्मृति नव्हती–स्वरूपज्ञान नव्हते–तोपर्यंत स्वतःला तो कोकरूच समजत होता पण आत्मस्मृति जागृत होताच त्या सिंहाप्रमाणच निर्भय बनून तो गर्जना करू लागला भ्रमाचा केवढा परिणाम हा त्या सिंहाच्या छाव्याप्रमाणेच तुझीहि आत्मविस्मृति झाली आहे आणि म्हणून तू स्वतःला दुर्बल समजतेस अग हे जें आत्मतत्त्व तें पुरुषात काय नि स्त्रियात काय दोघातहि सारखच आहे आणि तें पुरुष जर ओळखू शकतात, तर स्त्रियाना त का ओळखता येऊ नये ? हा तुमचा भ्रम व निव्वळ अज्ञान आहे

कात्यायनी–काय ? अज्ञान ?

मैत्रेयी–होय अज्ञान स्त्री प्रयत्न करील तर तिलाहि आत्मज्ञान–खानीन होईलच होईल येथ स्त्रीपुरुष हा प्रश्नच नाही 'त्व स्त्री त्व पुमान्' अस जिवाला उद्देशून श्रुतीत म्हटल आहे, ते स्त्रियानी का म्हणून विसराव ? मला या आत्मज्ञानाची उत्कठा आहे ससारसुखापेक्षा मला यात आनद अधिक दिसतो म्हणून म्हणते की, मला मनाजोगत स्थळ मिळल तर सुवासिनी होईन नाही–तर अशीच कुमारी राहून माझ्या मावशीप्रमाणच आत्मज्ञानात आयुष्य वेचीन पण कात्यायनी तू मात्र धन्य आहेस हो मनात आणशील तर तुझ्या पतिदेवाकडून त्या दिव्य ज्ञानाचा तुला सहज लाभ घडू शकेल आणि तू कृतकृत्य होशील तुझ्यासारखा पतिदेव मिळायला जन्मजन्मातरीच पुण्य लागत पण तस भाग्य इतराच कुठ आहे म्हणून म्हणते, गडे कात्यायनी तुझ्यासारखी भाग्यवान तुझी तूच खरी नशीबवान तू आहेस

इतक्यात कात्यायनीला घराकडून निरोप आल्यामुळे ते त्याचे सभाषण तवढयावरच सपल

---

# कात्यायनीचें अपूर्व दिव्य

मागील संभाषण प्रसंगानतर एके दिवशी कात्यायनी घरांतील आवराआवर करून व बाळ चंद्रकातास निजवून आश्रमाबाहेर अंगणात योगीश्वर बसले होते तेथे जवळ येऊन बसली.

कात्यायनी – काय सुदर देखावा आहे ?

याज्ञवल्क्य – चादणे किति पिठूळ पडले आहे. जिकडे तिकडे प्रसन्न वातावरण असून बाजूच्या वेली कशा आनंदात डुलत आहेत. उद्यानांत जिकडे तिकडे चैतन्य उधळत आहे.

याज्ञवल्क्य – तशीच ती पलिकडची जाई जणू नाचत आहे. किती रम्य नि गोड हा रात्रीचा देखावा आहे. ते रम्य आकाश मंडळ! कात्यायनी, तुला मौज नाही का वाटत? वर आकाशातील शोभा तरी पहा.

कात्यायनी – चांदण्या रात्रीची मौज फारच मनोहर आहे नुसतं डोळयांनं पहात रहावं, वारा तरी किती गोड आहे.

याज्ञवल्क्य बराच वेळ त्या निरभ्र आकाशाकडे व चद्राकडे पहाण्यात दंग होऊन गेले. कात्यायनी हळूच ती स्तब्धता मोडून म्हणाली :–एक गोष्ट विचारीन म्हणते, विचारू का ?

याज्ञवल्क्य – त्याला ज्योतिषी का हवा ?

कात्यायनी (स्मितहास्य करून) थट्टा नाहीना करायची ?

याज्ञवल्क्य – हं विचार. सकोच कसला ?

कात्यायनी – मागाहून अस्सं नि तस्सं म्हणणं होईल. म्हणून आधीच विचारलेलं बरं. ऐकून घ्यायचं आणि मग थट्टेवारी न्यायचं अस होऊं नये.

याज्ञवल्क्य – आजचा रंग कांही निराळाच दिसतोय.

कात्यायनी – आधीच सागते हा विषय नाजूक आहे थट्टेवारी न्यायचा नाही पुरुषाच ह नेहमी असच असत प्रथम विचार म्हणायच अन् मग सरवत्ती झोडायची

याज्ञवल्क्य – तुझी ही प्रस्तावना लाबतच चालली आहे आमच्यावर काही गदा आणण्याचा विचार तर नाही ना ?

कात्यायनी – शी भलतच

याज्ञवल्क्य – (हसून) काय विचारना बायकाचा कावा ? तुमच्यासारख्या धूर्त तुम्हीच प्रथम हळूच गोड बोलायच, तोडावर साखर पेरायची अन् मग डोक्यावर चढायच स्त्रीकौशल्य त हेच पुरुषाना कस बनवाव यात त्याचा हातखडा असतो

कात्यायनी –असस काय हे अगदीच थट्टा नको बाई ! (हसत) विचारू ? नाही ना चिडवणार

याज्ञवल्क्य – किती वेळा सागू ? विचार, विचार, विचार काय तुला विचारायच त खुशाल विचार,

कात्यायनी – ती !

याज्ञवल्क्य – ती ? ती कोण ?

कात्यायनी – आपले मित्र प्रधानजी आहेत ना ? याच्या घरची गोष्ट आता आल लक्षात ?

याज्ञवल्क्य – नाही

कात्यायनी – विचित्रच आहे हे तुमच बोलण ! अहो ती प्रधानजींची मुलगी

याज्ञवल्क्य – मैत्रेयी ? तुझी मैत्रीण तीच ना

कात्यायनी –तीच

याज्ञवल्क्य – बर पुढ काय

कात्यायनी — तेच मी विचारणार आहे, आपल्या इथ येण्याची तिची इच्छा आहे समजल का ?

याज्ञवल्क्य — नाही

कात्यायनी — (हसून) हेच ते मुद्दाम वेड पांघरायच

याज्ञवल्क्य — खरच, कात्यायनी मला नाही समजल तू काय म्हणतेस ते अग ती नेहमीच इथ यते मग आताच माझी परवानगी कशाला पाहिजे ?

कात्यायनी — स्पष्टच सागू ? तिच्या मनात आमच्या इथ कायमच रहावयास येण्याच आहे आतातरी समजल का ?

याज्ञवल्क्य — खर सागतो. तुझा अर्थच मला कळेना आड पडदा न ठेवता सरळच साग ना काय त

कात्यायनी — तिला माझ्याप्रमाणेच पदरात घेऊन धन्य करायची. आणि कायमची घरी आणायची

याज्ञवल्क्य — म्हणजे काय म्हणतेस हे त ? तिला पदरात घेऊन इथ कायमची आणायची तू काय बोलतेस हे तुझ तुलाच समजल आहे का ?

कात्यायनी — हो नीट समजूनच बोलते आह मी आता अगदी ते स्पष्टच बोलते. तिला माझी सवत करायची

याज्ञवल्क्य — काय ? सवत ? तुला स-व-त ?

कात्यायनी — ह ह मला सवत

याज्ञवल्क्य — अन् मग मी कुठ राहू ? हिमालयात का नैमिषारण्यात !

कात्यायनी — (जरा रागावल्यासारखें करून) मी नाही जा बाई थट्टाच करायची असेल तर मी ही निघाले आपली इथून.

ती चटकन् उभी राहिली पण याज्ञवल्क्यांनी तिचा हात धरून तिला जवळ बसवून घेतली आणि प्रेमानं ते तिला म्हणाले, तू वेडीतर नाहीस, तू अशी भोळी कशी ?

कात्यायनी — ते काही नाही माझं ऐकायच आपण तिला पदरात घेतलीच पाहिजे

याज्ञवल्क्य — तू नीट शुद्धीवरून बोलत आहेस ना ? सवत म्हणजे काय समजलीस, तो काही दागिना का आहे ?

कात्यायनी — येवढी का खुळी आहे मी हे न समजण्याइतकी.. काही असो, ही माझी विनंती मान्य केलीच पाहिजे

याज्ञवल्क्य — समज मी तुझ्या म्हणण्याप्रमाणे केलं आणि पुढं ती तुझ्या संसारावर

कात्यायनी — काय करील ?

याज्ञवल्क्य — काय करील ? निखारा ठेवील निखारा

कात्यायनी — इश्श इतकी का दुष्ट आहे ती ? छे नाथ तशी नाही ती फार सालस आहे

याज्ञवल्क्य — तू भोळी आहेस हा तुझा आग्रह म्हणजे विस्तवाशी खेळणं आहे कात्यायनी, तू पूर्ण विचार केलेला दिसत नाही

कात्यायनी — (मान हलवून) हा पूर्ण विचार केलेला आहे म्हणूनच ही गोष्ट विचारली आहे इकडं मग करायची ना माझी येवढी इच्छा पूर्ण ?

याज्ञवल्क्य — मला तुझी खरोखर कीव येते तिला घरी आणून आपल्या संसाराची माती करू म्हणतेस, होय ? तुझ्या विनंतीचा सरळ तोच अर्थ होतो तुला दुःखात लोटण्यास माझं मन घेत नाही

कात्यायनी — का बरं नाथ असं म्हणता अन् लक्ष्मीला सवत नाही की काय ? मी इथं घरात लक्ष्मी एकटीच आहे त्यामुळ

घराला शोभा नाही. म्हणून म्हणते की, ह्या लक्ष्मीच्या जोडीला श्रीहि पाहिजेच म्हणजे इथ वैकुंठ रंगेल. असे म्हणून तिने आपला हात पुढे केला

याज्ञवल्क्य – हा आग्रह सोड. हा विषाचा प्याला हातात घेऊ नकोस आज हे तुला गोड वाटेल पण पुढे तुला पश्चात्तापाची पाळी येईल. ही भुरळ तुला कुणी घातली देव जाणे. अग, वाटेल ते माग–साग, तुला काय सोन्याचा पर्वत हवा का, रत्नाची खाण हवी, का अमृताचा समुद्र हवा ? साग तुला काय पाहिजे. हा याज्ञवल्क्य ते हातात घेऊन उभा आहे

कात्यायनी–( निर्धाराने )–नाही, नाही–मला ते काही एक नको ही ऐवढी माझी इच्छा पूर्ण झाली म्हणजे मला सर्व काही मिळाल. एवढी भिक्षा माझे देव मला घालणार नाहीत काय ? (काकुळतीस यऊन) आता नका गडे आणखी अत पाहू. कात्याय- नींचा जीव कासावीस होत आहे

याज्ञवल्क्य–(डोके खाजवील)आता मात्र पचाईत आली बुआ कात्यायनी, या तुझ्या हट्टान मला तू पेचात घालीत आहेस तुझ्या या आग्रहान मी बुचकळ्यात पडल्यासारखा झालो आहे कात्यायनी पुन एकदा विचार कर

कात्यायनी–येऊन जाऊन आम्ही घरात भाडत बसू, हीच ना आपली भीति ? पण ही कात्यायनी एवढी सुळी नाही. महाराज, मला तुमचा वेदान्त समजत नसला तरी मी अगदीच काही सामान्य स्त्री नाही. तेवढ मला समजत. आणि मैत्रेयीसद्धा शास्त्री सालस, सात्विक, नम्र, प्रेमळ, नि शात आहे. आपल्या सुखात, ती मुळीच माती कालविणार नाही. घालील तर उलट भरच

घालील. शिवाय ती माझी जिवाभावाची मैत्रीण आहे. तिला सुखात पाहणं माझं कर्तव्य आहे. तिचा निश्चय आपणास माहीत आहे काय ?

याज्ञवल्क्य–मला कसा कळणार तो ?

कात्यायनी– केलाच तर आपल्याशीच ती विवाह करणार आहे.

याज्ञवल्क्य–नाही तर.

कात्यायनी–तशीच कुमारी राहील. तसा तिचा निर्धारच झालेला आहे तिला सौभाग्यवती करणं हे माझं कर्तव्य मी समजते. आणि म्हणूनच मी एवढी जीव तोडून आपली मनधरणी करीत आहे. आपल्यामुळं ही गोष्ट काढायला तिचे वडिल आणि इतर कोणीहि धजत नाहीत. म्हणून मला ही शिष्टाई पत्करावी लागली आता आलं का सर्व लक्षात ?

याज्ञवल्क्य–समज, मी तुझ्या मनाप्रमाणं केलं. ती तुझी सवत झाली आणि मग तुझ्याशी भांडू लागली नि तुझा हेवादावा करूं लागली तर मग ?

कात्यायनी–जोपर्यंत आपण माझ्यावर अन्याय करणार नाहीत तोपर्यंत मी कोणालाहि भीक घालणार नाही.

याज्ञवल्क्य (हसून) अन् मीहि फिरलो तर ?

कात्यायनी–मग दैवच फिरलं म्हणून स्वस्थ बसेन असो भलती सलती शंका काढून मला भेडसू नका. सूर्य कधीकाळी पश्चिमेकडे उगवेल, पण आपण मला कधीहि अंतरणार नाही. म्हणूनच मी येवढं धाडस करण्यास तयार झाले आहे.

याज्ञवल्क्य –तुला कधीहि अंतरणार नाही. तू माझी गृहलक्ष्मी असून शेवटपर्यंत गृहलक्ष्मीच राहशील. तू सामान्य स्त्री नाहीस' असलं धाडस मागं कुणी केलं नाही व पुढं कुणी करणार नाही. तुझा स्वार्थत्याग दांडगा आहे. मन अत्यंत थोर आहे. पण–हा

विषाचा प्याला माझ्या हातानं माझ्या गृहदेवतेला देण्याला माझं मन धजत नाही मी काय बरं करूं ?

कात्यायनी– तो विषाचा प्याला असला तरी तो जर आपल्या हातातून मिळाला तर त्या विषाचं गोड अमृत होईल. राजवाड्यात शुष्कखावाचा क्षणार्धात पुष्पपल्लवानी सुशोभित असा सुंदर वृक्ष बनविणाऱ्याचे हात काय मला विष देतील ? आणि ते जरी प्रत्यक्ष काळकूट असलं तरी आपली दिव्यदृष्टि त्यावर पडताच तं स्वर्गांतील मधुर अमृतच होईल

त्यामुळं मला विषाची कसली भीति ! जगाला जाळणारं विष–भयंकर कालकूट–भोलानाथ शंकरानं घेतलं आणि ते पचवून तो नीलकंठ झाला तोच गौरीहर मीहि पुजला आहे सामान्य स्त्रियांना भयभीत करणारं सवतीचं हे जहर विष ही कात्यायनी आपल्या हातानं व आपखुषीनं पिऊन, त्या गौरीहराच्या प्रसादानं व आपल्या चरणसेवेच्या प्रभावानं अमृतच होईल गंगायमुना जरी वेगवेगळ्या असल्या तरी समुद्राजवळ जाताना जशा त्या एकरूप होऊनच जातात, तद्वत् कात्यायनी–मैत्रेयी या दोघी दिसावयास भिन्न असल्या तरी गंगायमुनाप्रमाणे एकरूप होऊनच जातील तेथं कात्यायनी व मैत्रेयी असा भेद राहणार नाही कृपा करून मी मागत असलेली भिक्षा घालाच असे म्हणून तिनं त्याच्यापुढं आपला पदर पसरला

याज्ञवल्क्य आता निरुत्तर झाले तिचा स्वार्थ-त्याग, मैत्रेयी-वरचं प्रेम व कुशल शिष्टाई पाहून ते मनात आनंदले व तिचा निर्धार पाहून नरमले अर्थात् प्रेमळ पत्नीच्या आग्रहाला वश होऊन व मैत्रेयीचा निर्धार लक्षात घेऊन त्यानी तिला विजय पत्र दिले सती कात्यायनीचा विजय झाला आणि पुढे मैत्रेयी तिची सवत झाली सती कात्यायनीचे केवढें हे अपूर्व दिव्यदान! या स्वार्थत्यागाचे कौतुक करावे तितके थोडेच होणार आहे

# दीर्घायु रहस्य

यो हैव विद्वान् सायप्रातराशी भवति सर्वं हैवायुरेति

(श प २-४-२ ते ६)

याज्ञवल्क्याच्या आश्रमात एका चर्चेच्या प्रसंगी मनुष्याने कसे राहिले असता तो पूर्णायुषी होईल हा प्रश्न निघाला त्यावेळी त्यांनी पुढील उद्बोधक गोष्ट सांगितली

' जगातील सर्व प्राणी एकदा प्रजापतीजवळ जमून त्याला म्हणाले, ' देवा आम्ही कशा तऱ्हेने रहावे याचे एकदा कथन करा. '

त्यापैकी जे देव होते, ते यज्ञोपवीती होऊन आणि उजवा गुडघा वाकवून त्याच्या जवळ गेले तेव्हा त्याना उद्देशून प्रजापति म्हणाले, " यज्ञ हेच तुमचे अन्न आहे अमृत हे पान असून सूर्य हा तुमचा प्रकाश आहे "

नंतर पितर हे प्राचीनावीती होऊन व डावा गुडघा वाकवून त्याच्या जवळ गेले तेव्हा तो त्याना म्हणाला, " तुम्ही फक्त महिन्यातून एकदाच जेवावयाचे तुमचे अन्न म्हणजे स्वधा हे होय आणि चंद्र हा तुमचा प्रकाश आहे "

मनुष्य अंगावर वस्त्र घेऊन व शरीर नमवून त्याच्या जवळ गेले तेव्हा ते त्याना म्हणाले, ' मनुष्य हो ! तुमचे खाणे सकाळी एकदा व मध्याह्नकाळी एकदा असे दिवसातून दोनच वेळा असावे तुमची प्रजा म्हणजेच तुमचा मृत्यु आणि अग्नि तुमचा प्रकाश आहे.

पशु त्याच्यापुढे आले. त्याना पाहून ते म्हणाले, " तुम्हास तुमच्या मनास येईल, तेव्हा खाण्याची परवानगी आहे जेव्हा जेव्हा तुम्हाला खावेसे वाटेल व खाण्याचा पदार्थ डोळ्यास दिसेल,

तेव्हां तेव्हा तुम्ही यथेच्छ खात जा. तुमच्या खाण्यापिण्यास धरबंद नाही."

म्हणून पशू जेव्हां त्याना खावयाचा पदार्थ दिसेल व मिळेल तेव्हां तेव्हा ते खात असतात. असूराला प्रजापति म्हणाले," असुरहो तुम्हांस माया व अंधकार मी दिला आहे. म्हणूनच असुर मायामय आहेत असे म्हणतात. सध्या हे असुर कोठें दिसत नाहीत हें खरें असलें तरी त्याच्या करता म्हणून जो नियम घालून देण्यात आलेला आहे, त्या नियमानें वागणारे असे लोक मनुष्यात आढळतातच

देव, पितर व पशु हे प्रजापतीचे हे नियम कसोशीनें पाळतात. त्याचे ते कदापिहि उल्लघन करीत नाहीत. मनुष्याची गोष्ट मात्र अशातली राहिली नाही त्यानी या नियमाना धाब्यावर बसविलें असून पशूप्रमाणेच रात्रदिवस रवंथच करणारे असे बकासुर त्यात आहेत, त्यामुळें शरीरात मंदवृद्धि होऊन गेंड्याप्रमाणे लठ्ठ व बोजड बनलेले जणु हे नरपशुच होत. हे प्रजापतीनें घालून दिलेल्या आहार नियमाचे उल्लघन करीत असल्यामुळे त्याचें शरीर अवजड होऊन, चालताना लंगडत लंगडत चालतात. आणि लवकरच थकून भागून धापा टाकीत असतात. नियमाचे उल्लंघन केल्याचा हा परिणाम आहे.

म्हणूनच मनुष्याने सकाळी व संध्याकाळीं या प्रमाणे फक्त दोनच वेळा खावे आणि जो कोणी मनुष्य या प्रमाणे चालतो तो पूर्णायुषी होतो. त्याचे आयुरारोग्य दीर्घकाल टिकते व तो जन्माचा सुखी होतो. आणि हे नियम पाळणारा ब्रह्मतेजानें चमकूं लागतो व त्याचें वाणींत सत्य राहते.

# पिंपळाच्या झाडाखालीं

घोर व घनदाट अरण्यात वड, साग, पिंपळ, आंबे, चिंच इत्यादि उच व विशाल वृक्षाची गर्दी उडालेली होती मधुन मधून बाबूंची निबिड बट, करवद व इतर वन्य वेली याच्या अनेक जाळ्यानी अरण्य भरले होते तसच इतर विविध झाड झुडपानी ते अरण्य अगदी गच्च भरुन गल होते

अशा निबिडतर कातार जठरात अगदी पहाटेच्या प्रशात वेळी एक स्त्री वस्त्रात काहीसे गुडाळून ते छातीवर घट्ट धरून हलके हलके एक एक पाऊल टाकीत टाकीत फार जपून चाललेली होती येता यता ता आता एका पिपळाच्या झाडाजवळ आली आणि काय वाटले कोणास ठाऊक तेथेच एकदम थबकली इकडे तिकडे वळून पाहिल वरखाली दृष्टि फिरविली मागे पुडे न्याहाळून बघितले चोहोकडे नीट तपास केला जवळपास कोणी नाही अस पाहून तिला हायसे वाटले

ती जागा तिला त्यातल्या त्यात अधिक सुरक्षित व निवाऱ्याची दिसली म्हणून ती तेथेच खाली बसली आणि वस्त्रातून गुडाळून आणलेली ती वस्तु त्या झाडाच्या बुध्याजवळ हलक्या हाताने हळूच ठेवून इकडे तिकडे एकवार पाहिले पुन काय वाटले कोण जाणे, तिन ती वस्तु हळूच उचलून घेऊन उराशी घट्ट आवळून धरली नि पुन खाली ठेविली. क्षणार्धात पुनः उचलून घेतली. असे दोन तीन वेळा केले शेवटीं मनात कसला तरी निश्चय करून ती वस्तु पुन खाली ठेविली आणि आपण उठून उभी राहिली

त्यावस्त्रात काही वस्तु नसून एक बाळ होते ते जन्मलेले कोवळे बाळ सुदर नि गोडस होते. खाली निजविल्या बरोबर चिमुकल्या मुठी वळवीत व गुलाबी पाय नाचवीत रडू लागले.जणु, "आई मला एकटयाला टाकून तू चाललीस! याव वर मी काय अपराध केला आहे की,माझ्या. वर तू रागावलीस ? असे म्हणण्याचा त्याचा एकंदरीत भाव होता-

माय माउलीचे मायाळु अंत:करण ते ? तो भाव ताडला त्या कोमल मातृहृदयाला कडकडून पीळ बसला. डोळ्यातून अश्रु धारा वाहू लागल्या. कंठ सद्गदित झाला वात्सल्याने अंग शहारले. पुढे क्षणार्धात भयाने हादरले आणि दु:खाने व्याकुळ झाले, केवढा तो कठीण प्रसंग त्या माय–माऊलीवर होता !

त्या गोजिरवाण्या बाळाला पुन: तिने उचलून पोटाशी धरले मायेच्या प्रेमळ हाताने कुरवाळिले आणि त्या सुकुमार बालकाचे मुके घतले पण अंत:करणात चाललेली ती येवढी प्रचंड खळबळ नि तळमळ ! आता तिच्या डोळ्यासभोवती ब्रह्मांडाचे ब्रह्मांड सगळ गरगर फिरु लागले. तिला वाटले हा जणू प्रळयकाळच आपणावर कोसळला आहे.

काही वेळ तिचे मातृहृदय त्या अपत्यप्रेमात घुटमळत राहिले. पण ते फार वेळ टिकले नाही स्त्रीपावित्र्याचा तो नाजूक प्रश्न होता तो टिकविण्यासाठी तिला मन कठोर करणे भागच होते. तो मायेचा बुरखा तिने आता बाजूस सारला आणि ते गोंडस बालक–पोटचा कोमल गोळा–जिवाचा जीव–कंपित हाताने पुन. त्या झाडाच्या पोखरीत ठेवून त्या विशाल अश्वत्थ नारायणाकडे सजल नेत्राने पाहिले व हात जोडून दीन स्वरात त्याची करुणा भाकली की ' हे अश्वत्थ नारायणा, तू साक्षात विष्णुरूप आहेस. देवामध्ये श्रेष्ठ देव आहेस तर हे अनाथवत्सला करुणानिधे या माझ्या राजहंसाचे आता तूच रक्षण कर त्याची माता, पिता, बंधु आता सर्व काही तूच आहेस

' अश्वत्थ विष्णुरूपोऽसि त्वं देवेषु प्रतिष्ठित । तस्माद्रक्षस्व मे पुत्र सर्वतस्त्व वनस्पते ॥' (स्कंद६-१७८-१८१) अशी प्रार्थना करून

पुनः एकवार त्या राजहंसाकडे अश्रुपूर्ण नजरेनें पाहून दुःखित व भग्न अंतःकरणाने ती तेथून मागे फिरली.

ती माउली आपले पंचप्राण त्या झाडाखाली ठेवून तेथून परत फिरली. तिला तेथें फार वेळ राहणे शक्यच नव्हते. तो सगळा अतर्क्य व्यवहार होता. न जाणो ! कुणी पाहिले तर ! केवढा लोकापवाद ! केवढा कलंक ! केवढी बेअब्रु नि काय फजीतो ! ह्या सर्व घोटाळा नि फजीति टाळण्यासाठी तिला तेथून पाय काढणे भागच होते. म्हणून सगळा मायामोह आवरून त्या भग्नहृदयी माउलीने तेथून पाय काढला.

जाता जाता तिच्या मनात विचाराचे नाना विविध भावनांचे एकच काहूर माजले. "देवा हे कसे झाले ? नि काय झाले ? मी अगदी निष्पाप न गंगेसारखी शुद्ध व पवित्र असताना हा चमत्कार कसा घडला ? मला पुरुषाचा स्पर्श-नव्हे सावलीहि-पडली नाही, मग हे कसे झाले ? आता काय करूं व कुठे जाऊं ? तिला काही सुचेना की समजेना. अशा विमनस्क स्थितीत ती पुढें पुढें पावलें टाकीत वाट चालू लागली.

इतक्यात वर आकाशात गडगडू लागले आणि त्यातून स्वच्छ व स्पष्ट वाणी निघाली की, " कुमारी ! तू शोक करू नकोस ! रडू नकोस ! दुःख करू नकोस ! तू निष्पाप आहेस. निष्कलंक आहेस. धुतलेल्या तांदळाप्रमाणे शुद्ध व निर्मल आहेस. निर्दोष आहेस. तुझा काही अपराध नाही. पुरुषाचा तुला स्पर्श नाही हे अगदी खरे. पण विधिलीला विचित्र आहे. ती समजण्यास अगम्य आहे. अजाणता पुरुषाचे दूषित झालेले पारोसे वस्त्र तू ऋतुस्नात काळी नेसलीस. त्याचा विचित्र परिणाम हा असा झाला ! उतथ्य ऋषी-

च्या शापाने प्रत्यक्ष देवगुरु बृहस्पतिच तुझ्या पवित्र उदरी जन्मास आला आहे तो मोठा ज्ञानी, महायोगी, थोर तपस्वी आणि मोठा सिद्धपुरुष होईल तो पिंपळाच्या संरक्षणाखाली वाढत असल्यामुळे त्याला पिप्पलाद या अन्वर्थक नावाने प्रसिद्धि लाभेल पुरुषाचा स्पर्श नसताना हा तुला झाला याचा तुला विस्मय वाटला असेल, तुझे मन तुला खात असेल पण हे सत्य, त्रिवार सत्य आहे की, या बालकाला जन्म देण्यात तुझा काही दोष नाही विधिलीला मोठी विचित्र आहे ती समजण्याला अगम्य आहे तिचा हा सारा खेळ आहे पुन: सांगते की, तू निर्दोष, निष्कलंक व निष्पाप आहेस तुला झालेले बालक पुढे महा तेजस्वी निघणार असून जगावर ज्ञानाचा प्रकाश पाडून लोकोद्धार करील· तू आता दु ख व शोक टाकून दे नि खुशाल घरी जा

ही आकाशवाणी ऐकून ती धायधाय रडू लागली. तिच्यावर ह्या जणू विद्युत्पातच झाला. ती विचारमूढ बनली शून्य दृष्टीने व भग्नहृदयाने वाट सापडेल तिकडे, पाय नेतील तिकडे, पावले टाकीत ती चालू लागली जाता जाता दु खातिशयाने मूर्च्छित होऊन धपकन् जमिनीवर आपटली, आणि दुर्दैवाची गोष्टही की, तेथेच तिचा आत्मा तिला सोडून परलोकी निघून गेला. (स्कंद ४–१०६)

# याज्ञवल्क्यांची बहीण कंसारी

याज्ञवल्क्याची कसारी नावाची ती वहीण होती. भर वयातच तिचे मगळसूत्र निष्ठुर काळाने हिरावून नेले होते अर्थात् ती आता वैधव्यस्थितीत कालक्रमणा करीत होती. माहेरी भावाजवळ राहून तिची-जीवन यात्रा चालली होती ती मोठी कर्मनिष्ठ व व्रतस्थ असे कायनेम पाळावयाचे व व्रत-उपोषणे करावयाची ती सर्व तेथे राहूनच ती पाळीत असे.

निसर्ग-नियमाप्रमाणे ती एकदा ऋतुमती झाली चवथा दिवस होता तो. तिला स्नानासाठी एक निराळे आडवस्त्र पाहिजे होते त्यासाठी तिने घरात शोध चालविला. शोध करता करता कोपऱ्यात एक वस्त्र तिला दिसले. चटकन् तिने ते ओढून घेतले आणि अगावरचे सोडून ते वस्त्र लावून घेऊन पुढे स्नान, धुणे, वगैरे करुन आत जाऊन ती पुढच्या उद्योगास लागली.

दैवयोग तरी किती विचित्र असतो, पहा. हे सर्व कसारीने शुद्ध व सरळ मनाने केले. पण त्याचा परिणाम मात्र भलताच झाला. पुढे तिला दिवस गेले आणि गरोदर असल्याची लक्षणे दिसू लागली भर तारुण्य आणि हा असा विलक्षण प्रकार ती फारच भेदरून गेली. तिचा तोल सुटला आणि मुकाट्याने घरातून निघून आश्रमातील कोपऱ्यातील एका पर्णकुटीत जाऊन राहिली हा तिचा नेहमीचा रिवाज असे. महिन्याचे महिने ती तेथे एकातात जाऊन राहत असे व दीर्घ व्रतानुष्ठान करीत असे त्यामुळे तिकडे फारसे कोणाचे लक्ष जात नसे. वैदिकधर्मात व्रतोपोषणाचे, शुचितेचे व सद्वृत्ताचे महत्त्व फार प्रतिपादण्यात आले आहे तेथे अतर्बाह्य शुचितेवर अत्यत कटाक्ष दिला आहे.

ती पाळणे हे अत्यंत महत्त्वाचे असून प्रसंगविशेषी त्यासाठी प्राणहि पणास लावण्यास धर्मनिष्ठ लोक कमी करीत नसत. म्हणून स्वव्रत पाळण्यासाठी तिला वरील सारखे दिव्य करणे भाग पडले पुढें पुढें लवकर नवमास भरले व एक दिवशी ती आश्रमातून नाहीशी झाली. मागे वर्णन केल्याप्रमाणे ती माता झाली !

कंसारी त्या चिमुकल्या अर्भकास त्या अश्वत्थनारायणाच्या पदरात टाकून निघून गेली. तिचे प्राणोत्क्रमण झाले. त्या बालकाचे पालन-पोषण कोण करणार असा स्वाभाविक प्रश्न उपस्थित होतो पण परमेश्वराची लीला अगाध व विचित्र आहे' त्या अचित्य शक्तीचा ठाव मात्र आजपर्यंत कोणालाहि लागलेला नाही. आधुनिक विज्ञान शास्त्राला तर मुळीच तिचा शोध लागत नाही आणि लागणे शक्य दिसत नाही. या विश्वाचे कोडे जोपर्यंत शास्त्रीय दृष्टीला उलगडता आले नाही व भौतिकशास्त्राना सोडविता आले नाही, तोपर्यंत त्या अचित्य शक्तीच्या अस्तित्वाबद्दल वाद उपस्थित करण्यात अर्थ काय आहे ? सर जेम्स जीन्ससारखे प्रथितयश विज्ञानशास्त्रनिपुण पंडित देखील विश्वाचा ठाव घेता घेता ' यतोवाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह ' अशी स्पष्ट शरणचिठ्ठी लिहून द्यावयास तयार झाले, तेथे सामान्य माणसाची ईश्वराच्या अस्तित्वाविषयी शंका घेण्यात शहाणपणा तो काय ?

त्या अरण्यात विविध जातीचे असंख्य वृक्ष होते त्यातून कंसारीने अश्वत्थवृक्षाचीच निवड केली, यात तिचा शहाणपणा व समयसूचकता दिसून येते. कारण या आपल्या धर्मग्रंथांत अश्वत्थ वृक्षास फार महत्त्वाचे स्थान देण्यात आले असून, सर्व वृक्षांत यां अत्यंत पूज्य व पवित्र वृक्षराज मानण्यात आलेला आहे. त्यास देवतास्वरूपहि प्राप्त झाले आहे.

याचे कारण असे की, देव तेथ वास करून असतात, अशी वैदिक कल्पना आहे त्याच्या बुध्यात ब्रह्मा, मध्यात विष्णु व शेंड्यात शंकर राहतो, अशी वैदिक समजूत आहे याची खूण म्हणूनच श्रीकृष्णानी अर्जुनाला आपल्या विभूति सांगताना 'अश्वत्थः सर्व वृक्षाणाम्' या वचनात ती गोष्ट नमूद करून ठेविली आहे भगवान बुद्धाला सबोधीचे दिव्यज्ञान प्राप्त झाले, ते या अश्वत्थाच्या पवित्र छायेखालीच म्हणून या वृक्षाला बौद्धधर्मात 'बोधिवृक्ष' म्हणून पूज्य व पवित्र मानण्यात आले आहे प्रत्यक्ष अग्निनारायण या झाडामध्ये गुप्तरीतीने वास करून असतो अशी प्राचीन ऋषींची भावना असून अग्निमथन करण्याची अरणि या झाडाची करतात व त्याच्या बारीक डाहळ्या समिधा म्हणून अग्निकुंडात अर्पण करण्यात येतात स्त्रियांना मूलबाळ होत नसले तर अश्वत्थनारायणास लक्ष प्रदक्षिणा घातल्यास त्याचा हेतु सफल होतो, असे पुराणांतरी सांगण्यात आलेले आहे तात्पर्य, कुमारीने अश्वत्थवृक्षाच्या पदरी आपल्या तान्हुल्या बाळास घातले यावरून तिने आपले बाळ अरण्यात अनाथ म्हणून सोडले नाही तर विष्णु देवाच्या पदरात घालून त्या अनाथ बालकाला अनाथरक्षक करुणावत्सल परमेश्वराच्या दिव्य संरक्षण छत्राखाली दिले, हे अगदी उघड आहे

अलीकडची विज्ञानशास्त्र काहीहि म्हणोत, प्राचीन वैदिक आर्यांचा इतिहास इतका विलक्षण व अद्भुतरम्य आहे की आज आम्ही कितीहि जीव तोडून सांगितले तरी तो साहेबाळलेल्या जडवादी नवशिक्षितास पटणार नाही भौतिक शास्त्राच्या चष्म्यातून पाहणारे त्याला हसतील, नाक मुरडतील, थट्टा हेटाळणी करतील

हे आम्ही ओळखून आहोत. ईश्वरीलीला मानव बुद्धीला अतर्क्य व विज्ञानशास्त्राला अगम्य आहे हे विसरता कामा नये.

भौतिक शास्त्राना आतापर्यंत अगम्य अशा कित्येक गोष्टी प्राचीन भारतीयाच्या पूर्ण परिचयाच्या होत्या. उदाहरणार्थ रामायणातील पुष्पक विमानाची गोष्ट घ्या. ५०।६० वर्षांपूर्वी ती कोणाला तरी खरी वाटत होती काय? त्या वेळी आपण त्यास हसत होतो पण तेच धाडस आज करण्यास कोणी तयार होईल काय? आकाशवाणी झाली असे पुराणिकबुवानी सांगितले तर लोक त्याना वेड्यात काढीत असत. जीव व जीभ नसता आकाश बोलते म्हणजे काय? निव्वळ थाप आहे ती! पण आजचा रेडियो म्हणजे ही काय चीज आहे? या सर्व गोष्टी आज प्रत्यक्ष सृष्टीत उतरल्या नाहीत काय? म्हणून प्राचीन काळी ज्या अगम्य व अद्‌भुत गोष्टी घडल्या, त्याच्यावर जडशास्त्राध दृष्टीने गैरविश्वास ठेवणे हे सूज्ञपणाचे होणार नाही.

हे सर्व येथे सांगण्याचे कारण की ते एक दोन दिवसाचे कोवळे अर्भक त्या निर्जन रानात एकटेच पडले होते, तरी त्याला अपाय झाला नाही. अश्वत्थवृक्षावरील सर्व देवतानी आपले मंगल कृपा-छत्र धरले होते व त्याची प्रेमदृष्टि त्याच्यावर अहोरात्र पारख घालीत होती. तशात ते बाळ पिप्पलाद म्हणजे काही सामान्य व्यक्ति नव्हती. प्रत्यक्ष देवगुरु बृहस्पति, मग त्याची देवाला माया व काळजी नसेल तर कोणाला असणार? मानव जातीच्या उद्धारार्थ व उत्कर्षार्थ पवित्र ज्ञान राशींना सुंदर कैलास वनविण्यासाठी त्याचा येथे अवतार झालेला. मग बाळ पिप्पलादाचे बरे वाईट कसे होणार?

---

# बालकानें कृत्या सोडली!

कुमार पिप्पलाद वाढता वाढला आता चागला दहाबारा वर्षांचा झाला होता. दिवसा तो एकटाच झाडाच्या आसपास हिंडे फिरे झाडा फुलाशी व माती दगडाशी खेळे तेथील मिळतील ती फळफळावळ खाई शेजारच्या झऱ्यातील पाणी पिई आणि हिंडून-फिरून खेळन-नाचून भागला म्हणजे अश्वत्थाच्या कोटऱ्यात येऊन विश्राति घेई आणि साज झाली की तेथच येऊन सकाळपर्यंत स्वस्थ झोपून राही ते अश्वत्थाचे कोटर प्रशस्त व सुरक्षित होते आणि ते त्याला घराप्रमाणेच वाटे

एके दिवशी नारदाची स्वारी सहज फिरत फिरत तेथें आली तेथ येताच ती सूर्यासारखी तेजस्वी सुदर बालमूर्ति पाहून आणि जवळपास कोणी माणूस नसलेले अवलोकन करून ते जरा चकित झाले त्याच्याजवळ जाऊन त्यानी त्यास विचारल की " बाळ ! तू एकटाच इथ कसा ? जवळपास तर कोणी दिसत नाही मग तू इथ कसा आलास ? कुठून आलास ? तुझे आई-बाप कोण व ते कुठ आहेत " ? नारदाना पाहून त्या बालकाला विस्मय वाटले आतापर्यंत त्याने मनुष्य असा पाहिलाच नव्हता तेव्हा नारदाकडे त्याने एकवार आपादमस्तक नीट न्याहाळून पाहिले आणि शेवटी त्यास उत्तर दिले की (" नाह जानामि पितर मातर नच बान्धवम् " मला बाप माहीत नाही ! आई माहीत नाही, बधु माहीत नाहीं )

नारदाना त पाहून मोठ आश्चर्य वाटले मुलगा पहावा तर असा तेजस्वी, आणि त्याचे भाषण ऐकावे तर त विस्मयजनक ते

अतर्ज्ञानी असल्यामुळें अतर्दृष्टीने त्यानी हे सगळे जाणले आणि तो कोण, कसा जन्मला, त्याची आई कोण, वगैरे सर्व हकीकत त्याम जवळ घेऊन सावंत सागितली

ती सर्व हकीकत कळल्यावर पिप्पलाद पार दुखित झाला. तो रडू लागला आपण असे पापी कसे जन्मलो म्हणून शोक करू लागला. प्राणत्याग करणार म्हणून हट्ट धरून बसला नार. दानी चार गोष्टी सागून त्याचे सात्वन केले व समजूत पाडली. यात तुझा अगर कोणाचा दोष नसून, तू निष्पाप व निष्कलक आहेस हा दैवाचा खेळ असून, तुझी अशी दशा व्हावयास शनि कारण आहे असे सागून ते तेथून निघून गेले

आलेल्या या अनर्थ परपरेस शनि कारण आहे, हे समजताच त्याम शनीचा मोठा राग आला व त्या क्रोधभरात त्याने आकाशाकडे दृष्टि वळवून त्या सूर्यपुत्राकडे पाहिले आणि शाप देऊन त्यास खाली पाडले शनिदेवाने त्याची क्षमा मागितली म्हणून बारा वर्षाखालच्या कोणत्याहि मुलास या उप्पर छळणार नाही असे त्याजकडून वचन घेऊन पिप्पलादाने त्यास सोडून दिले. (स्कद ६-१७४)

आपला पापी जन्म याज्ञवल्क्याच्या आश्रमात झाला व आपण याज्ञवल्क्याच्या बहीणीचा मुलगा असूनही आपल्याकडे त्यानी अवधान दिले नाही म्हणून त्याला याज्ञवल्क्याचाहि राग आला. चटकन् स्वारी उठली आणि अग्नि पेटवून हात जोडून ध्यानस्थ होऊन बसली

त्या अग्नीतून एक कृत्या निर्माण झाली! अकाळविकाळ स्वरूपाची, गळ्यात धगधगीत ज्वालेच्या लावचे लाव माळा घातलेल्या आणि प्रज्वलित अग्नीप्रमाणे प्रखर व तेजस्वी दिसणारी

ती अग्नीतून बाहेर येताच पिप्पलादास म्हणाली," बाळा ! मला का बोलावलेस ? समुद्र शोषू का पर्वताचे पीठ करू ? पृथ्वीला पालथी घालू की, नभोमंडळ खाली पाडू ? काय करू ते सांग !

हे तिचे भाषण ऐकून पिप्पलादाने डोळे उघडले. तो तिला म्हणाला, "कृत्ये! आलीस ? मी तुझेच चिंतन करीत होतो. आता मिथिलेला जा आणि तेथे याज्ञवल्क्य आहे त्याचा प्राण घेऊन ये."

बोलून चालून कृत्याच ती ! चटकन् वाऱ्याप्रमाणे तेथून निसटलीच आणि नभोमंडळ थरथर कापवीत मिथिलेकडे निघाली. (स्कंद, ५, ३–४२ )

# भगवान शंकरांचा वरदहस्त

आपल्यावर कृत्या येत आहे हे याज्ञवल्क्यानी योगदृष्टीने पाहताच ते भयचकित झाले आणि धावतच जनकाकडे गेले. पण जनकानी त्या कृत्येपासून त्याचा बचाव करण्यास आपण अगदींच असमर्थ आहोत असे स्पष्ट सांगितल्यामुळे त्यांची निराशा झाली ! नतर ते ब्रह्मदेवाकडे गेले. तेथेंहि त्याना आश्रय मिळाला नाही कृत्येपुढे आपले काही चालत नाही असा त्यानीहि ववुली जबाब दिला. मग मात्र याज्ञवल्क्य घाबरले. पुढे काय करावे नि कोठे जावे याविषयी त्यांची मति गुग झाली. कृत्या-तर पाठीस लागलेली आणि उपाय तर सुचेना. शेवटी त्यानी विष्णूकडे धाव मारली पण दुर्दैवाने त्याचाहि काही उपयोग झाला नाही वैकुंठातहि त्याना वाटाण्याच्या अक्षताच लावल्या गेल्या

याप्रमाणे सर्व बाजूनी निराशेने घेरल्यामुळे त्यांचा जीव खालीवर होऊ लागला ते अगदी हताश झाले. त्याना पुढे काही मार्ग दिसेना कृत्येचा प्रभाव देवानाहि भारी होता ! तिला अड-विण्याचे धैर्य व सामर्थ्य कोणातहि नव्हते. प्रत्यक्ष अग्नीच्या पोटातून निघालेली महामाया अग्नीमारखीच मोठी प्रखर व महा जाज्वल्य होती तिच्या वाटेस जाण्याचे धाडस व साहस करून मुखाचा जीव धोक्यात घालण्यास कोण तयार होईल ? देव झाले म्हणून काय झाले, त्यानाहि भीति ही होतीच की.

त्याचे आतापर्यंतचे सर्व प्रयत्न विफल ठरले. ते हताश आणि किंकर्तव्यमूढ झाले नि त्याची जीवनाशा सर्वस्वी खुटली ! तथापि सुदैव त्यांच्या पाठीस होते ! सर्वांनी हात सोडला होता, तरी सुदैवाने तेवढा सोडला नव्हता. ते आता उभे राहिले आणि त्याना

दीनवत्सल भगवान शंकराची आठवण झाली आणि ते लागलेच कैलासाच्या वाटेला लागले

खरोखर देवात देव म्हणजे महादेवच केवढा त्याचा महिमा व कोण त्याची भक्तवत्सलता? त्यानी शरणागताला अभय दिले नाही, असे कधी झाले नाही व पुढे केव्हाहि होणार नाही. सुष्टाचे परिपालन हे त्याचे ब्रीदच आहे याज्ञवल्क्य आता त्याच्याजवळ येऊन पोचले व त्याना नमस्कार करून कृत्या आपल्यावर झडप घालणार हे पाहून योग सामर्थ्याने सूक्ष्मरूप धारण करुन ते शंकराच्या नखात शिरुन तेथें लपून बसले

कृत्येचा निरुपाय झाला हातची शिकार गेली हे पाहून ती आता चरफडू लागली. दुसरे कोणी असते तर त्याच्यावर तुटून पडून तिने दोघांचाहि फन्ना उडविला असता पण येथें प्रसंग पडला प्रत्यक्ष शंकराशी–कैलासनाथ महामृत्युंजयाशी मग तेथ दांडगाई करून कसे चालेल? दूर उभी राहूनच तिने त्याना विनंति केली की, 'देवा सोडा त्याला इकडे तो पहा तुमच्या हाताच्या नखात एक प्राणी चोरून शिरुन लपून बसला आहे काढा त्याला बाहेर नि द्या इकडे लोटून '

हें त्या कृत्येचे भाषण ऐकून शंकरानी सहज आपल्या नखाकडे पाहिले, तो याज्ञवल्क्य सूक्ष्म रुपात लपून बसलेले त्याना दिसले याज्ञवल्क्यानी तेथूनच देवास नमस्कार केला आणि आपले कृत्ये-पासून रक्षण करण्याविषयी नम्र होऊन त्याना विनंति केली भोलानाथ भक्तवत्सल महायोगीश्वर क्षणभर ध्यानस्थ झाले आणि सर्व काही त्याना समजून आले हा सर्व प्रकार समजुतीच्या घोटाळयामुळें घडून आलेला आहे अशी

त्याची खात्री झाली, याज्ञवल्क्य पूर्ण निर्दोषी आहेत, पिप्पलादाचा राग अनाठायी आहे, कृत्येची मागणी दुराग्रहाची आहे असा विचार करून त्यांनी याज्ञवल्क्यावर कृपादृष्टि केली. त्याचे योगकौशल्य पाहून त्यांना मोठें कौतुक वाटलें आणि संतोषून पार्वतीरमण प्रसन्न झाले. त्यांनी याज्ञवल्क्यांवर आपला वरदहस्त ठेविला.

कैलासनाथ महादेव प्रसन्न झाले. याज्ञवल्क्यांना आपल्या सुदिव्य नेत्रानें सुदीप्त करून त्याचा देह सुरक्षित केला आणि त्याना आतां बाहेर यावयास सांगितले. याज्ञवल्क्य बाहेर आले कृत्येनें तो सूर्यासारखा तळपणारा दिव्य देह पाहिला. आणि त्यासरशी ती कोळशाप्रमाणें काळी ठिक्कर पडून हतवीर्य बनली. याज्ञवल्क्यावर आतां आपली मात्रा चालणं शक्य नाही असा विचार करून मनातल्या मनात ती खिन्न झाली. आणि निराश होऊन चडफडत आल्या वाटेनें मुकाट्यानें चालती झाली.

धनुर्धारी अर्जुनाच्या अलौकिक पराक्रमानें परम संतुष्ट होऊन त्यास दिव्य गांडीव धनुष्य देऊन 'पिनाकी' हा किताब बहाल करून ज्या शंकरानी त्याचा गौरव केला त्याच पार्वतीरमणानी याज्ञवल्क्याचें लोकोत्तर योगकौशल्य पाहून त्याजवर अनुग्रह केला. आणि त्यास 'योगीश्वर' हा बहुमानाचा किताब देऊन, त्याचें यश शाश्वत केलें. ' योगीश्वरेति विप्रस्य कृत्वा नाम युधिष्ठिर विसर्जयित्वा देवेशस्तत्रैवान्तरधीयत ॥ ' (स्कंद, ५-३-४२ते६१)

याज्ञवल्क्यानी देवाधिदेव महादेवास नमस्कार केला आणि या वेळे पासून याज्ञवल्क्य हे योगीश्वर या नावानें प्रसिद्ध पावले.

## याज्ञवल्क्य–पिप्पलाद भेट

ती कृत्या परत येऊन झालेली हकीकत पिप्पलादास निवेदन करून तेथून निघून गेली. पिप्पलादास हे सर्व ऐकून आश्चर्य वाटलें.

तो मनात एक प्रकारे खिन्न झाला. त्यानें शंकराची उपासना चालविली. इतक्यात नारद तेथे आले व त्यानी त्याची समजूत घालून राहण्यास याज्ञवल्क्याकडे घेऊन गेले.

त्या बालकास याज्ञवल्क्यापुढें उभें करून ते म्हणाले, " हा कसारीचा मुलगा बाळ पिप्पलाद आतापर्यंत तो अरण्यात वाढला. देवानी त्याचे रक्षण केले आहे हा मोठा तेजस्वी आहे. आपल्या आश्रमातच त्याचा जन्म झालेला आहे.तो आपला भाचा असून त्याचा आपण स्वीकार करावा व पुत्रवत् पालन करून त्याचे कल्याण करावे "

याज्ञवल्क्याना त्याच्या नवधी आतापर्यंत काहीच कल्पना नव्हती. नारदाच्या तोंडून ही सर्व हकीकत ऐकून घेतल्यावर त्याच्या मनात प्रकाश पडला व त्याम सखेदाश्चर्य वाटले. त्यानी त्या मुलाकडे नीट निरखून पाहिले त्याचे विलक्षण तेज, सुंदर व मोहक चेहरा पाहून कसारीची जणु प्रतिमूर्तीच त्याला ती भासली. नारदाचे सांगणे त्याना पटले व त्यानी त्याचा स्वीकार करून पोटाशी धरले आणि त्याचे पुढे पुत्रवत् पालन केले. त्याचा यथाविधि उपनयन संस्कार करून त्याला सर्व विद्या शिकविल्या. अथर्ववेदात त्याला उत्तम पारंगत करून त्याची कीर्ति अजरामर करून ठेविली.

नारद काय अथवा इतर कोणी काय यानी कितीही समाधान व सारवासारव केली असली तरी ह्या सर्व विचित्र परिस्थितीच्या मागें आपलाच दोष असावा या कल्पनेने याज्ञवल्क्याचे मन त्याना मधुन मधुन खाऊं लागले. याबद्दल काहीतरी प्रायश्चित्त घेणे हे जरूरच होते प्रायश्चित्त म्हणून तो प्रसंग मानून हाटकेश्वर येथ गेले व एक यज्ञ करून तेथ याज्ञवल्केश्वर नावाच्या लिंगाची स्थापना केली. त्याचप्रमाणे पिप्पलादानेहि आपल्या मातेच्या उद्धारार्थ तेथेंच 'कसारीश्वर' लिंग स्थापून मातृऋणातून मुक्तता करून घेतली.

# धन्यो गृहस्थाश्रमः

याज्ञवल्क्याचा संसार भरभराटीला आलेला होता कात्यायनीला चंद्रकात, महामेघ व विजय असे तीन मुलगे झाले होते. मैत्रेयीला मात्र मूलबाळ काही झाले नव्हते. तथापि ती दुःखीकष्टी मात्र नव्हती कात्यायनीचा संसार आपलाच असे समजून त्यातच ती समाधान मानीत असे कात्यायनीपेक्षा मैत्रेयीलाच तिची मुले अधिक बिलगून असत सर्व दृष्टींनी विचार करता याज्ञवल्क्याचा गृहस्थाश्रम म्हणजे आता स्वर्गच होता. कात्यायनी-मैत्रेयी ही जोडी म्हणजे लक्ष्मी-सरस्वतीच जणू एकत्र वास करीत होत्या दोघीजणी गंगायमुनाप्रमाणे समरस होऊन योगीश्वराची सेवा करीत गृहकृत्यात सदैव दक्ष व तत्पर असल्यामुळे त्यांच्या निवासस्थानात नेहमी सुखासमाधानाचे प्रसन्न वातावरण असे, म्हणूनच त्यांना बाहेरचे प्रचंड प्रचार कार्य सुरळीत व व्यवस्थित सभाळून ते तडीस नेणे शक्य झाले. कात्यायनीचे थोर अंतःकरण व मैत्रेयीचा मधुर मनमिळावूपणा या दोघींच्या दोन दिव्य सद्गुणामुळे संसारात अनिष्ट प्रकार व प्रसंग न डोकावता ते मंगल निवासस्थान स्वर्गाप्रमाणे सदैव शांत व प्रसन्न होते तशात मैत्रेयीचा स्वभाव व मनोवृत्ति अधिक उदार व उदात्त असल्यामुळे व त्याबरोबरच ती सुविद्य व सुविचारी असल्यामुळे योगीश्वराना तिची वेळोवेळी यथोचित मदत मिळत जाई त्यामुळे त्यांना जगीकृत कार्य नेटाने व सुमघटितपणे तडीस नेणे सहज साध्य झाले. 'अस्मिन गृहे गार्हपत्याय जागृहि'—घरात राहूनच गृहिणीधर्मात दक्ष रहा—हा स्त्रीजीवनाला पथ्यकर व हितकर असा श्रुतिमाउलीचा मंगल सदुपदेश

त्या विदुषी आर्य महिलेनें अक्षरशः पाळून गृहस्थाश्रमातच तिने स्वर्गातील नदनवन थाटले होते. या प्राचीन अमरकीर्ति सुविद्य मैत्रेयीचे मगल व उद्‌बोधक उदाहरण आधुनिक सुशिक्षित स्त्रीवर्गानें डोळयापुढे ठेवून तद्वत् वर्तन केल्यास स्त्रीजन्माचे खरोखर सार्थक होऊन 'धन्यो गृहस्थाश्रम 'चा मगल घोष घरोघर ऐकण्याचे भाग्य भारतीय कुटुबाना खात्रीनें लाभेल.

याज्ञवल्क्यांनी ' वीर्यं वै द्वन्द्व ' स्त्री–पुरुषाची जोडी–म्हणजे साहचर्य व सहकार्य–हे प्रभावशाली आहे असे शतपथांत सागितले आहे ते स्वतःच्या अनुभवावरुनच असें म्हटल्याशिवाय राहवत नाही. वैदिक सस्कृति ही गृहसस्थेवर आधारलेली असून, गृहसस्थेला स्त्रीपुरुषाचें साहचर्य व सहकार्य हे अत्यावश्यक आहे. घर म्हणजेच गृहिणी 'जायेदस्त'– 'जाया म्हणजे घर' असें ऋग्वेदात म्हटलें असून त्याचा अनुवाद मनूने 'न गृह गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते ' या प्रसिद्ध वचनात केला आहे. पुरुष काय अगर स्त्री काय त्याचे. स्वतत्र जीवन हे खरो-खर मानव जीवनच नव्हे. ते अल्प व अपूर्ण आहे. तेथे खरा आनद नाही, खरे सूख नाही, खरी शाति नाही व खरे समाधान नाही एकदर मानवजीवनाचा खरा इतिहास व खरे साफल्य तेथ नाही म्हणजे ते जवळ जवळ रखरखीत नीरस पशुजीवनच होय ससारात मतभेद व भाडणे ही असावयाचीच. पण विवाहाने बद्ध झालेल्या प्रेमळ स्त्री–पुरुषाच्या क्षणैक मतभेदात, भाडण्यात, रुसण्यात, फुगण्यात अबोल्यात, असहकार्यात व बहिष्कारात जी एक अनिर्वचनीय मधुरता असते ती स्वतत्र जीवन कठणाऱ्या स्वैर विहारी स्त्री–पुरुषाना–प्रेम विवाह करणाऱ्या हौसी फुलपाखराना समजणे शक्य नाही. 'यदेतत्

हृदयं मम तदस्तु हृदय तव। यदेतत् हृदयं तव तदस्तु हृदयं मम-माझ मन तें तुझे असो व तुझे मन माझें असो-हें विवाहमंत्रांतील मननीय शुभवचन अखेर प्रभावी ठरतें, याचा गोड अनुभव भारतीय कुटुंबाशिवाय इतरत्र फारसा आढळत नाही. म्हणूनच स्वतंत्र स्त्री व स्वतंत्र पुरुष ही समान हक्कावर जगणारीं व उदोउदो करूं पाहणारी अल्प व अर्धवटच असे याज्ञवल्क्यानी स्पष्ट म्हटले आहे जोपर्यंत पुरुष हा विवाह करुन स्वानुकूल गृहिणी मिळवीत नाही तोपर्यंत तोअपूर्णच! अर्धवटच! 'अर्धो ह वा एप आत्मनो यज्जाया'- जाया ही पुरुषाची अर्धांगी आहे! पुरुष व स्त्री दोघाचें मिळून एक कुटुंब. अशी वैदिक आर्यांची स्त्री-पुरुष कल्पना आहे.

स्त्री हा पुरुपाचा अर्धा भाग आहे म्हणजे स्त्री व पुरुष हे सममान भागीदारच हक्कदार आहेत, हें तत्त्व वैदिक धर्मात फार प्राचीन काळीच अमलात आणण्यात आले होते. हे आधुनिकानी काय म्हणून विसरावे? पाश्चात्याचे पाशवी समान हक्काचें व वर्तनस्वातंत्र्याचे शुष्क व नीरस ढोलगे काय म्हणून वडवीत बसावे? असो.

याज्ञवल्क्यानी येथे जाया हा शब्द वापरला आहे. स्त्री शब्द नाहीं. याचे कारण असें की विवाहाने बद्ध झालेली स्त्री हीच जाया होऊं शकते.देहाची रुखरुख शमविण्यासाठी केलेला पुरुपसबंध हा विवाह म्हणवीत नाही. 'तज्जाया भवति यदस्यां जायते पुनः' पत्नीच्या पोटी पति हा पुनः पुत्ररूपानें जन्म पावतो म्हणून ती जाया होते. हा जाया शब्दाचा पारिभाषिक अर्थ आहे. पति-पत्नीचे 'तदेकं मिथुनं'-पति व पत्नी याचें मिळून एक जोडपें होते आणि विवाह संस्काराने पुनीत झाल्यासेरीज स्त्री पुरुपां-

मध्यें जाया पतीचे नाते संभवत नाही व तो गृहस्थाश्रम म्हटला जात नाही. कदाचित स्वतंत्र स्त्री पुरुष काही काळ एकत्र राहू शकतील, पाशवी प्रेमलालसेने परस्परांना देह अर्पण करू शकतील पण त्याला दाम्पत्य जीवनाचे मधुर व मंगल स्वरूप प्राप्त होणार नाही कारण **'धर्मप्रजारत्यर्थो हि विवाह '**-धर्म, प्रजा व रति या तिहींच्या लाभार्थ--केवळ रतिसुखार्थच नव्हे--वैदिक विवाहाचा अवतार आहे, तो रमणीय नाही असे कोण म्हणेल ? *'मिथुनेन ह प्रजायते' व मिथुनेन ह यजते.'* पति पत्नीच्या संयोगानेंच कायदेशीर प्रजा निर्माण होते व पतिपत्नी हे जोडपेच देवोपासना करण्यास योग्य आहे असा अप्टपैलू भारतीय धर्माचा कटाक्ष आहे केवळ देहेंद्रियतर्पणार्थच काही वैदिक विवाह नाही तर धर्म व प्रजा हेही त्या बरोबरच त्याचे दोन महत्त्वाचे उद्देश आहेत हे लक्षात ठेविले पाहिजे ऐहिक व पारमार्थिक बाबतीत याज्ञवल्क्यांनी जें कार्य केले व जें काय साधले ते सर्व या गृहस्थाश्रमातच वैदिक धर्मात या गृहस्थाश्रमाला फार मोठे रमणीय व महत्त्वाचे स्थान आहे जगाचा भला बुरा अनुभव घेण्याची व धडा शिकण्याची गृहस्थाश्रम ही एक शाळा आहे. जागतिक जीवन येथेच खुलते विश्वाचे प्रत्यक्ष ज्ञान येथेच होते देवोपासना येथेंच घडते मनुष्याचा आत्मा येथेच विकास पावतो आणि मानव जन्माचे खरे सुख, खरा आनंद व खरी शांति याच आश्रमात लाभते. ती वसिष्ठाला, अत्रीला, विश्वामित्राला, भरद्वाजाला, भृगूला व्यासाला आणि याज्ञवल्क्यांना सर्व थोर थोर कुटुंबस्थ महात्म्यांना लाभली. ब्रह्मचारी, संन्यासी, देव, ऋषी, पितर, गंधर्व, व इतर जीवजात हे सर्व या गृहस्थाश्रमावरच अवलंबून आहेत व असतात. आणि म्हणून या आश्रमाचे महत्त्व ऋषींनी वर्णिले आहे ते असे-

चतुर्णाआश्रमाणां च गार्हस्थं पुण्यदं स्मृतम् । तदसनाद्भिवतश्च मुक्तिश्च भवतीति मतिर्मम (ब्रम्ह. पु.८८-१५) चारहि आश्रमात गृहस्थाश्रम हा पुण्यप्रद आहे कारण त्या आश्रमांतच मनुष्याला प्रपच व परमार्थ-योग व मोक्ष साधतां येतो. गृहस्थाश्रमांतच येथे प्रपंचहि साधतो आणि धर्महि साधतो मात्र तेथे विवेक व जागृति पाहिजे.

असा हा सर्वोपकारी गृहस्थाश्रम जर सिद्ध झाला नाही तर वैदिक धर्माचा–अर्थात् मानवकुलविकासाचा–आत्माच गारठेला असें समजण्यास कसलीच हरकत नाही.

योगीश्वरांनी जो प्रचंड कामगिरी केली आणि अलौकिक पौरुष गाजविलें आणि आपली कीर्ति अजरामर करून ठेविली त्या सर्वांचे श्रेय जर कशांत असेल तर ते या प्रभावी गृहस्थाश्रमांतच. शुक्ल यजुर्वेद सहिता तयार केली, त्या संहितेचे सुदर स्वरूप विशद करून सागण्यासाठी शतपथासारखा प्रचड ग्रथ निर्माण केला, यज्ञसंस्थेंत ठिकठिकाणी ‘ तदु तथा न कुर्यात् ’ असे स्पष्ट बजावून महत्त्वाचे फरक करून त्यात पथ्यकर सुधारणा केल्या. अनेक लहान मोठे यज्ञ व ठिकठिकाणी विद्वानांशी चर्चा करून वैदिक धर्माला स्पृहणीय उजळा दिला. मनुष्याच्या जन्मजात गुणस्वभावाकडे, मन.प्रवृत्तीकडे नजर देऊन त्या त्या व्यक्तीला अनुरूप व उपकारक असे आचारात्मक नियम तयार केले, वेळो-वेळीं देशसंचार करून वैदिक धर्माचें महत्त्व व मानवोत्कर्षाचें रहस्य जगास दाखवून दिलें. याशिवाय अनेक प्रासंगिक व स्थानिक गोष्टींचे प्रश्न सोडवून तेथें व्यवस्था लावून दिली, या सर्वांचें बीज त्यांच्या सुखमय गृहस्थाश्रमांतच आहे. नुसता त्याचा शतपथ ग्रंथराज पाहिला तर मनुष्य आश्चर्यानें थक्क होऊन

जातो! अखंड कर्मयोगाने व उदंड तपश्चर्येने त्यांनी गृहस्था-श्रमातच ज्ञान मेरूचे अत्युच्च शिखर गाठले आणि त्या बरोबरच मुमुक्षु लोकानाहि सुंदर व सरळ मार्ग दाखवून जगावर मोठे उपकार करून ठेवले आहेत, ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे

विशेषत गृहस्थाश्रमाला नाक मुरडणाऱ्या व कमी लेखणाऱ्या वेगडी साधुसंतानी व भगव्या सन्याशानी योगीश्वराचे उदाहरण मनन करण्यासारखे आहे याज्ञवल्क्य कर्मनिष्ठ तर होतेच, पण त्याचा अर्थ नुसत्या कर्मकांडातच त्यानी आपले सर्व आयुष्य गुंतविले होते असा मात्र नव्हे कर्माच्या सहाय्याने व कर्म करता करताच त्यानी ज्ञानाचा गौरीशंकर गाठला होता याची साक्ष प्रत्यक्ष त्याचा शतपथ ग्रथच देत आहे! कर्म श्रेष्ठ का ज्ञान श्रेष्ठ या विषयी पोपटी वेदांत्यामध्ये नेहमी शुष्कवाद माजून राहिलला असतो पण कर्माच्या पोटात ज्ञान व ज्ञानाच्या पोटात कर्म गर्भित असते हे मर्म हे बोलघवडे वदांती नमके विसरतात! ही मोठ्या खेदाची गोष्ट होय वैदिक धर्माचा वेदात हा कर्म-योगाच्या शेवटी सागितला आहे कर्मप्रधान गृहस्थाश्रमाच्या नतरच सन्यासाश्रमाचा अनुक्रम लागलेला आहे, याचाच अर्थ प्रपंच करून जगाचे वास्तव स्वरूप ओळखल्यानंतर पारलौकिक गोष्टीच्या—अध्यात्मज्ञानाच्या—नादी लागावे, असा अखिल वैदिक ऋषींचा स्पष्ट निर्वाळा आहे

# मैत्रेयीला आत्मोपदेश

गृहस्थाश्रमाचा म्हणजे प्रपंच सुखाचा व जागतिक कीर्तीचा यथार्थ उपभोग घेऊन कृतकृत्य झाल्यावर याज्ञवल्क्याना गृहस्थाश्रमाचा पसारा आटोपून चतुर्थाश्रमात शिरण्याची व संसार निवृत्त होण्याची इच्छा झाली. तो आश्रम घ्यावयाच्या अगोदर आपल्या मिळकतीची मैत्रेयी व कात्यायनी यांत वाटणी करुन देऊन दोघींना विभक्त करावी, या इराद्यानें त्यांनी मैत्रेयीला बोलावून म्हटलें मैत्रेयी ! आतां मला प्रपंचाचा कंटाळा आला आहे. मैत्रेयी–कंटाळा आला आहे ? पुढं मग ? याज्ञवल्क्य–अग, मग काय ? सन्यास घ्यावा म्हणतो. मैत्रेयी–सन्यास ? आम्हाला सोडून. मग आमची वाट काय? याज्ञवल्क्य–माझी जिंदगी तुझ्यात व कात्यायनींत वाटणी करुन देऊन, तुम्हा दोघाना वेगळचा करावा म्हणतो.

मैत्रेयी –काय आम्हाला वेगळच्या ?

याज्ञवल्क्य–हो वेगळचा. म्हणजे पुढें भांडण होणार नाही तुम्ही उभयतानी सुखान रहाव अशी माझी इच्छा आहे.

मैत्रेयी–आता मला वाटणी घेऊन काय करायचं आहे नि कुठं जायच आहे ? मला पैशानें गच्च भरुन ही सबंध पृथ्वी मिळाली अगर आपण दिलीत तर मग मी शाश्वत सुखी नि अमर होईन, काय ?

याज्ञवल्क्य–नाही. मैत्रेयी ! नाही फार तर तू सार्वभौम राजाप्रमाणे मोठचा थाटात व सुखात राहशील, मोठी संपन्न होशील. यापलीकडे तुझी कांही प्रगति होणार नाही.

मैत्रेयी–द्रव्यानें मनुष्य अमर होतो काय ?

याज्ञवल्क्य–द्रव्यानें अमरत्व प्राप्त होईल, ही मुळी आशाच धरूं नकोस ! ती अगदी निर्मूल आहे.

मैत्रेयी–तर मग मला आपली धन दौलतहि नको आणि जमीन जुमलाहि नको.

याज्ञवल्क्य–मग तुला काय पाहिजे नि तुझी इच्छा तरी काय ?

मैत्रेयी–मी अमर कशी होईन, नि शाश्वत सुखी कशी होईन याचे ज्ञान तेवढे द्या म्हणजे झाल. मला काही एक नको आपली सगळी धन दौलत कात्यायनीला द्या आणि मला फक्त अमरत्वाचा मार्ग दाखवा नि माझी आशा तृप्त करा

मैत्रेयीची व आपली कायमची ताटातूट होणार ही जाणीव त्याना पूर्ण होती आणि यामुळे ते तिचे शेवटचे व हृदयस्पर्शी भाषण ऐकून, त्याचे अत करण खरोखर हेलावले शिवाय तिच्या आत्मज्ञान–प्रवण शुभेच्छेचे त्याना क्षणभर कौतुकहि वाटले तिचा स्वभाव त्याना माहीत होता ती काही सामान्य प्रतीची बायको नव्हती मोठी पडिता होती ऐहिक सुख अगर ऐहिक सपत्ति याचा तिला मोह नव्हता तिला ज्ञानाची मोठी आवड होती तिचा स्वभाव, योग्यता, आशा–आकाक्षा, वैराग्य वृत्ति याची त्याना यथार्थ जाणीव होती अनुभवहि आलेला होता या सर्व गोष्टीचा विचार करून व तिन शेवटची अत करणपूर्वक केलेली विनती ऐकून त्याना एक प्रकारचे समाधान वाटले ती आत्मोपदेशास सर्वस्वी योग्य आहे असे पाहून, तिची इच्छा पूर्ण करण्याचे त्यानी मनावर घेतले आणि आपल्या मधुर वाणीने तिच्यावर दिव्य आत्मज्ञानाचा अमृतवर्षाव करण्याचा निश्चय केला (श प. १४–७–३–१ ते ४)

## अमृत तुषार

याज्ञवल्क्य–ऐक, मैत्रेयी ! मी सागतो ते नीट मन लावून ऐक पत्नीच्या सुखासाठी म्हणून पति हा स्त्रीला काही प्रिय नसतो तर स्वत च्यास सुखासाठी पति हा स्त्रीला प्रिय वाटत असतो हच दुसऱ्या तऱ्हेने सागावयाचे म्हणजे पतीवर स्त्री जे प्रेम करते ते

काही पतीसाठी म्हणून नव्हे, तर आपलाच सुख-स्वार्थ साधण्यासाठी, आपल्या अतस्थ आत्म्याच्याच तृप्तीसाठी

मैत्रेयी–अस्स होय ?

याज्ञवल्क्य – भार्येच्या सुखासाठी म्हणून भार्या काही पतीला प्रिय वाटत नाही तर स्वतःच्या सुखासाठी भार्या ही पतीला प्रिय वाटत असते ततोतत तशीच गोष्ट पुत्राची आहे आणि तोच प्रकार पशु, ब्राह्मण, क्षत्रिय, देव, वेद, भूतजात वगैऱ्याना लागू आहे त आपल्याच स्वार्थासाठी –दुसऱ्यासाठी नव्हे–एकमेकाला सवजण प्रिय असतात तो आत्मा तो अतस्थ–आत्मा आपण जाणला पाहिज, त्याचे श्रवण, मनन, निदिध्यान केले पाहिजे

मैत्रेयी – म्हणजे काय होत ?

याज्ञवल्क्य – मोठा चमत्कार होतो त्या आत्म्याचे दर्शन, श्रवण, मनन व निदिध्यान झाले म्हणजे या सर्वाचे, या विश्वाचे सपूर्ण ज्ञान होते आपल्या अत करणातील आत्म्याचे ज्ञान झाले म्हणज ह सर्व विश्व आपलाच आत्मा आहे याची पुढे जाणीव व प्रचिती येते मग आपला आत्मा व विश्वात्मा यात फरक व भेद राहात व दिसत नाही

मैत्रेयी–त ज्ञान नाही झाल तर ?

याज्ञवल्क्य–मोठा अनर्थ होईल !

मैत्रेयी–तो कसा ?

याज्ञवल्क्य–आपल्याहून म्हणजे आपल्या आत्म्याहून ब्राह्मण हे निराळे आहेत असे जो समजतो, त्यास ब्राह्मण दूर करतात

त्याचप्रमाणे आपल्याहून क्षत्रिय निराळे असे जो समजतो, त्याम क्षत्रिय दूर करतात आपण वेगळे आणि देव वेगळे असे जो समजतो त्यास देव दूर करतात आपण वेगळे व वेद वेगळे असे

जो समजतो, त्यास वेद दूर करतात. आपण वेगळे व हें भूतजात वेगळें असें जो समजतो त्यास सर्व भूतजात दूर करते. आपण वेगळे आणि हें सर्व वेगळे असे जो समजतो त्यास हे सगळे दूर करते.

मैत्रेयी–हें असं कां होतें ?

याज्ञवल्क्य–याला कारण आत्म्याच्या सत्य नि शुद्ध स्वरूपाचे अज्ञान होय. ब्राह्मण, क्षत्रिय, लोक, देव, वेद, हे यज्ञ व हे भूतजात थोडक्यांत हें विश्व काय तें सर्व हा आपला अंतर्यामी सूक्ष्मरूपानें असणारा आत्माच आहे ' इदं ब्रह्म इदं क्षत्र इमे लोका इमे देवा इमे वेदा इमे यज्ञा, इमानि भूतानि, इदं सर्वं यदयमात्मा ? हे ब्राह्मण, हे क्षत्रिय, हे लोक, हे देव हे, वेद, हे यज्ञ, ही भूते, हें सर्व हा आत्माच आहे. ह्या सर्व विश्वांतील मूल वस्तु, चैतन्य वस्तु, आत्म वस्तु ही एकच आहे.' भिन्न नाहीं. आत्मा ओळख-ण्याची गुरुकिल्ली काय ती ही. दुंदुभी वाजूं लागली म्हणजे तिच्यातून आवाज निघतो तो दुदूभीहून निराळा समजणें हे जसें शक्य नाही, अर्थात् त्या दुंदुभीच्या अस्तित्वामुळेच त्या शब्दाला जसें अस्तित्व येतें, त्याप्रमाणेंच या आत्म्या संबंधी देखील आहे

वीणा वाजूं लागली म्हणजे त्या वीणेंतून जो ध्वनि निघतो. नाद निघतो, तो त्या वीणेहून भिन्न असणें हें जसें शक्य नाही, अर्थात्, त्या वीणेच्या अस्तित्वानेंच त्या नादाला अस्तित्व येते तद्वतच या आत्म्यासंबंधी सुद्धां समज. स्पष्टच सांगावयाचें म्हणजे आत्म्यापासून विश्वाची उत्पत्ति आहे.

मैत्रेयी – हे जग–हें सर्व विश्वजात – त्या आत्म्यापासून कसें उत्पन्न होतें त्याची थोडी कल्पना द्यावी.

याज्ञवल्क्य – ओल्या लाकडानी अग्नि पेटविला म्हणजे त्यापासून सर्वत्र धूरच धूर पसरतो त्याप्रमाणेच हे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वांगिरस, इतिहास, पुराणे, सूत्रे, आख्याने, हा लोक, परलोक, आणि ही सर्व भूते, अर्थात् हे सर्व विश्वचे विश्व त्या परमात्म्याचे नि:श्वास आहेत या पृथ्वीवर जितके म्हणून उदक आहे त्या सर्वांचे समुद्र हे जसे एकच एक निवासस्थान आहे, तसेच सर्व गंधाचे नासिका, सर्व रसांचे जिव्हा, सर्व रूपाचे चक्षु, सर्व शब्दाचे श्रोत्र, सर्व संकल्पाचे मन, सर्व विद्याचे हृदय, सर्व कर्मांचे हस्त, सर्व आनंदाचें उपस्थ, सर्व विसर्गाचे पायु (गुद), सर्व मार्गाचे पाय, सर्व वेदांचे वाणी हे जसे एकमेव निवासस्थान आहे, तद्वत् हा आत्मा या सर्व विश्वाचे एकमेव आश्रयस्थान आहे. या आत्म्याच्या आश्रयानेच हे सर्व विश्व स्थित आहे. तो पहात नाही असे म्हणतात पण ते वास्तविक तो पहात असूनहि पहात नाही अर्थात् द्रष्टयाच्या दृष्टीचा काही लोप झालेला नसतो. कारण त्याला पाहण्यासारखे त्याहून निराळें असे काहीच नसते. दृष्टीचा नाश होत नाही त्याचप्रमाणे तो बोलत नाही असे समजतात. तो बोलत असूनहि बोलत नाही. अर्थात त्या स्थितीत त्याच्या वक्तृत्वाचा काही लोप झालेला नसतो. कारण त्याच्या वक्तृत्वाचा काही लोप झालेला नसतो. तसेच तो जें जाणत नाही ते वास्तविक जाणत असूनहि जाणत नाही. अर्थात् त्याच्या विज्ञातृत्वाचा– जाणिवेचा – काही लोप झालेला नसतो. कारण विज्ञातृत्वाचा नाश होत नाही.

मैत्रेयी – हा मोठा चमत्कार आहे.

याज्ञवल्क्य – अग ! जर द्वैत असेल, भिन्नभाव असेल तर एक दुसऱ्याला पाहील, एक दुसऱ्याचा वास घेईल, एक दुसऱ्याचा आस्वाद

मनुष्य–'द्या ! दान करा ! असा त्याचा अर्थ'

प्रजापति–अगदी बरोबर तुम्हास माझा अर्थ बरोबर कळला

नतर असुर त्याच्याजवळ आले आणि म्हणाले 'देवा! आम्हाला काही उपदेश द्या !'

प्रजापति पुन 'द' हेच अक्षर उच्चारून त्यास म्हणाला–असुर हो, तुम्हास या 'द' चा अर्थ कळला काय ?

असुर–हाय, देवा ? आम्ही तो ओळखला दया दाखवा असा त्याचा आहे

प्रजापति–तस्सच ! अगदी तस्स ! असुर हो ! तुम्ही माझा अर्थ बरोबर ओळखलात इतके झाल्यावर असुर तेथून निघून गले

ती ही दैवी वाणी मेघगर्जनेच्या रुपान 'द द द' अशी गजत असते अर्थात् ती सागत असते की दमनयुक्त व्हा ! दान द्या ! दया दाखवा ! म्हणून मनुष्यान दम, दान व दया या तीन गाष्टीचा अभ्यास करावयास शिकावे अर्थात त्या त्या गुणानी सपन्न व्हावे

बोध–तदेतत्त्रय–शिक्षेद्दम दान दयाम्'

(श प १४–८ २ ते ४)



# मोक्ष म्हणजे प्रत्येकाचे माहेरघर

पवित्र गंगेचे शुद्ध व निर्मल स्वरूप हरिद्वार क्षेत्रात जसे पहावयास सापडते तसे ते पुढे पुढे म्हणजे काशीप्रयाग क्षेत्रात दिसत नाही त्याचप्रमाणे उदार वैदिक धर्माचे उज्ज्वल व उदार स्वरूप प्राचीन वैदिक वाङमयात जसे प्रतीत होते,तसे ते आजच्या व्यावहारिक हिंदु धर्मात दिसून येत नाही आजकालच्या हिंदुधर्मावर इतर धर्माचे आघात व संस्कार झाल्यामुळे तो सनातनी म्हणवीत असला तरी मूळ सनातनी धर्माचे तेज, चैतन्य व सामर्थ्य त्यात चमकत नाही, जनकराजाने सहज प्रश्न टाकला की, गुरुदेव मोक्षाचा अधिकार सर्वांनाच आहे का ? की, विविक्षित वर्णाला, अगर व्यक्तीला आहे

याज्ञवल्क्य म्हणाले, राजा हे काय विचारतोस ? हा अधिकार प्रत्येक व्यक्तीचा आहे म्हणजे प्रत्येकाचे माहेरघर, मग त्याला जन्माची अगर जातीची आडकाठी कोठून असणार ? मोक्षाचा दरवाजा गाठणे हे जातीवर अगर व्यक्तीवर अवलंबून नसून ते ज्ञानावर आहे,ज्याचे ज्ञान त्याचा मोक्ष.तेथे वर्ण, जात,संस्कार, लिंग, वय यांचा बिलकुल संबंध नाही फक्त सत्यज्ञान असले म्हणजे झाले. ज्ञानाचा मक्ता कोणत्याहि जातीला अगर कुणाहि व्यक्तीला देण्यात आलेला नाही मुमुक्षूने आत्मज्ञान मिळवावे आणि सरळ आपले माहेर गाठावे. मोक्ष मिळविणे हा प्रत्येकाचा जन्मसिद्ध हक्कच आहे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र एकाच महापुरुषाचे-एकाच विराट पुरुषाचे–निरनिराळे अवयव आहेत सर्वांचे आश्रय-स्थान एकच व्यवहारपरत्वे त्या त्या अवयवाला प्रसंग विशेषी महत्व असले तरी ते सर्व एकाच देहाचा आश्रय करून राहतात,हे

कसे विसरावयाचें ? मात्र एक गोष्ट मुख्यत्वाने लक्षात ठेविली पाहिजे, ती ही की, मनुष्यात पात्रता येण्याला संस्कार व आचार याची आवश्यकता आहे नुसत्या शाब्दिक अगर पोपटी ज्ञानानें मोक्ष मिळणार नाही. त्याला पवित्र आचाराची मगल जोड पाहिजे. म्हणून जो मुमुक्षु आहे त्याने आत्मज्ञानाबरोबर सदाचाराची जोड मिळवून मोक्षाचा रस्ता गाठावा, म्हणजे तो सरळ इष्ट स्थळी जाऊन पोचेल. मनुष्य हा अज्ञानामुळे जन्मतो व अज्ञानामुळेंच मरतो म्हणून या अज्ञानातून सुटका करून घेऊन मुक्त होणे हा प्रत्येकाचा स्वभावसिद्ध धर्मच आहे. त्याला आडकाठी कोणी घालू नये

थोडक्यात सागायचें म्हणजे ज्याला यथार्थ ब्रह्मज्ञान झाले तोच खरा ब्राह्मण झाला असे समजावे. तोच मोक्षाचा अधिकारी होय.

वर्ण अगर जातिव्यवस्था ही केवळ व्यावहारिक आहे पारमार्थिक नाही परमार्थ हा सर्वांना सारखाच आहे तेथे वर्णादिकाची आडकाठी नाही अर्थात मोक्षाचा दरवाजा हा सर्वांना खुला आहे पण आत शिरण्याला तेवढी पात्रता पाहिजे, हे विसरून चालणार नाही.

# शतपथाची उभारणी

याज्ञवल्क्यप्रणीत शुक्ल यजुर्वेदाची मांडणी स्वभावतःच सुसंगत, सुव्यवस्थित व सुटसुटीत असल्यामुळें तो वेद म्हणावयास सुलभ व ऐकण्यास गोड असल्यामुळें लोकांत तो अधिकाधिक प्रिय होत जाऊन समाज त्यास हळूंहळूं चिकटत चालला. हें स्वाभाविकच झालें. शिवाय तो भगवान श्री सूर्यनारायणाच्या कृपाप्रसादानें योगीश्वर याज्ञवल्क्यासारख्या दिव्य विभूतीकडून प्रकट झाला असल्यामुळें त्याला एक प्रकारचें अपूर्व महत्त्व प्राप्त होऊन विद्वन्मंडळांत तो एक प्रकारचा गौरवाचा मोठा विषय झाला होता. जेथें जेथें यज्ञसमारंभ होत तेथें तेथें बहुतेक ठिकाणी वाजसनेय हे अध्वर्यु व शुक्लयजुर्वेद हा प्रयोग ग्रंथ असा संप्रदाय पडून त्या वेदाला प्रलोभनीय असें अग्र स्थान प्राप्त झालें होतें. शिवाय त्या वेदाचा संबंध साक्षात् सूर्यनारायणाशी जाऊन भिडत असल्यामुळें सूर्यवंशी क्षत्रियांना त्याविषयीं विशेष प्रेम व आत्मीयता वाटून त्यांनी त्याचा पुरस्कार करून त्याचा उदो उदो चालविला, ही त्यांतल्या त्यांत महनीय गोष्ट घडून आली.

तेव्हां त्या संहितेमध्यें सांगितलेल्या मंत्राचा विनियोग कसा करावा व कां करावा, कोठें करावा व केव्हां करावा, यज्ञ म्हणजे काय, त्याचे प्रकार किती व त्याच्या प्रयोगाची पद्धति कशी याविषयीं याज्ञिकांना बोध व्हावा आणि जगाला वैदिक धर्माची व तत्त्वज्ञानाची महती व माहिती कळावी म्हणून सरस्वती प्रसादानें सोपपत्तिक व सरहस्य असा एक विद्वत्ताप्रचूर अमरकीर्ति महाग्रंथ तयार केला. तोच शतपथ होय ( भा. शां. प. अ. ३२३, २२–२३ ) हा ग्रंथ अखिल वैदिक वाङमयांत अत्यंत मोठा,

विचार परिप्लुत व भारदस्त असून, वैदिक देवोपासनेच्या विविध माहितीनें व गूट व गहन तत्त्वज्ञान–विचारानें पूर्ण ओथवलेला आहे. याज्ञवल्क्यांनी यांत आपलें कर्मकौशल्य, बुद्धिवैभव, रचना-चातुर्य व प्रतिभासौंदर्य पूर्ण ओतलें असून, त्यांतील धार्मिक, याज्ञिक, तात्त्विक, जागतिक, सामाजिक व राजकीय विचार मोठे मार्मिक व बोधप्रद असेच आहेत. त्यांतल्यात्यांत शेवटच्या प्रकरणांत वैदिक तत्त्वज्ञानाची त्यांनी केलेली मीमांसा म्हणजे या तत्त्वज्ञानाचा सुंदर कळसच होय.

अशा या महाग्रंथाची रूपरेषा थोडक्यांत पुढें दिली आहे. या ग्रंथाविषयीं विशेष माहिती ' याज्ञवल्क्य दर्शन (पूर्वार्ध) या ग्रंथांत दिली असून, त्यांत एकदर शंभर अध्याय आहेत म्हणून त्याला शतपथ हें नांव प्राप्त झालें आहे. हे शंभर अध्याय चौदा कांडांत विभागलेले असून, त्यांत ७६२४ कंडिका आहेत. त्यांची मांडणी अशी :–

| कांड | नांव | अध्याय | प्रपाठक | ब्राह्मण | कंडिका. |
|---|---|---|---|---|---|
| १ | हविर्यज्ञ | ९ | ७ | ३७ | ८३७ |
| २ | एकपादिका | ६ | ५ | २४ | ५४९ |
| ३ | अध्वर | ९ | ७ | ३७ | ८५९ |
| ४ | ग्रह | ६ | ५ | ३९ | ६४८ |
| ५ | सव | ५ | ४ | २५ | ४७१ |
| ६ | उखासंभरण | ८ | ५ | २७ | ५३०- |
| ७ | हस्तिघट | ५ | ४ | १२ | ३९८ |
| ८ | चिति | ७ | ४ | २७ | ४३७ |
| ९ | संचिति | ५ | ४ | १५ | ४०२ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १० | अग्निरहस्य | ६ | ४ | ३१ | ३६९ |
| ११ | अष्टाध्यायी | ८ | ४ | ४२ | ४३७ |
| १२ | मध्यम | ९ | ४ | २९ | ४५९ |
| १३ | अश्वमेध | ८ | ४ | ४३ | ४३२ |
| १४ | उपनिषत् | ९ | ७ | ५० | .७९६ |
| | | १०० | ६८ | ४३८ | ७६२४ |

अशी ही थोडक्यात शतपथाची बहिरंग उभारणी आहे. येणेंप्रमाणें या ग्रंथात एकंदर १०० अध्याय, ६८ प्रपाठक (अनुवाक), ४३८ ब्राह्मण व ७६२४ कांडिका (ब्राह्मणमंत्र) आहेत. शंभर मार्ग म्हणजे अध्याय या ग्रंथात असल्यामुळें त्याला शतपथ हें नाव प्राप्त झालें आहे शतपथाची व्याख्या करण्यात आली आहे, ती अशी:-

'शत पथानो मार्गा नाम अध्याया यस्य सः शतपथ ' अशी त्याची व्याख्या करण्यात आली असून 'शतपथः शताध्यायैः' असेंहि त्यास म्हणता येईल.

या चौदा कांडांची विषयवारीनें मांडणी पुढीलप्रमाणें सामान्यत देता येईल. पहिल्या कांडात 'ओ व्रतमुपैष्यन्' या मंत्रानें ग्रंथारंभ होऊन, त्यात दर्शपौर्णिमासेष्टीचें विवेचन केलें आहे. दुसऱ्यात अग्न्याधान, पुनराधान, अग्निहोत्र, उपस्थान, पिंडपितृयज्ञ, अग्रयणेष्टि, दाक्षायण व चातुर्मास्य हे विषय सांगितले आहेत. तीन व चार या कांडात सोम-अध्वर वर्णिला असून पांचव्यांत वाजपेय, राजसूय, दशपेश, सौत्रामणि इत्यादि महत्त्वाच्या यज्ञांचें अनुष्ठान आलें आहे. सहावें कांड उखासंभरण, विष्णुक्रम, दीक्षा, वनीवाहन

इत्यादि विषयासाठी उपयोगिले असून, सातव्यात चयन, अग्नि-क्षेत्रसंस्कार, दर्भस्तंब, याचा ऊहापोह करण्यात येऊन, पुढे आठव्यात अग्निचिति म्हणजे चयनकर्म परामर्शिले आहे, नवव्यात शतरुद्रीय होम, पुनश्चिति व चित्युपस्थान हे विषय सांगून दहाव्यात अग्निरहस्य सांगितले आहे याच कांडात चयनयागस्तुति, चयनकाल विचार, अग्नि उपासना, मन सृष्टि इत्यादि महत्त्वाच्या विषयाचा विमर्श केला असून अखेर ऋषिवंश कथन केला आहे अकरावे कांड आधानकाल, दाक्षायण यज्ञ, दर्शपूर्णमासासंबंधी अर्थवाद, ब्रह्मचर्य, हवि समृद्धि, पंचमहायज्ञ, स्वाध्यायप्रशंसा, प्रायश्चित्त, अध्यात्म विद्या, पशुबंध, षड्ढोतारहोम इत्यादि विषयासाठी उपयोगिले असून, बाराव्यात दीक्षाक्रम, सत्र, पृष्ठ्याभिप्लव, स्वरसाम, गवामयन अग्निहोत्र प्रायश्चित्त, मृतकाग्निहोत्र, मृतकदाह या विषयांचे विवेचन आहे तेरावे कांड अश्वमेध, पुरुषमेध, सर्वमेध, दशरात्र, पितृमेध या विषयाकरता उपयोगून चौदाव्यात प्रवर्ग्य, महावीर, बृहदारण्यक, पुत्रमंथ, वाम्दश्रीमंथ याचा परामर्श घेऊन अखेर वंशब्राह्मण देऊन 'आदित्यानीमानि शुक्लानि यजूंषि वाजसनेयेन याज्ञवल्क्येनाख्यायन्ते' या मंत्राने ग्रंथ समाप्ति केली आहे

वैदिक आर्यसंस्कृति ही जगातील अत्यंत प्राचीन व प्रभावी संस्कृति असून तिचे शुद्ध व निर्मल स्वरूप पहावयाचे झाल्यास, तिचे अंतरंग समजून घ्यावयाचे असल्यास आपणास वैदिकांच्या ब्राह्मण-ग्रंथांकडेच धाव मारली पाहिजे त्याशिवाय गत्यंतर नाही. इतिहास-पुराणात अगर स्मृति-काव्य ग्रंथात ते प्रतीत व्हावयाचे नाही. कारण त्या ग्रंथात बौद्ध-जैनादि इतर उथळ व अर्वाचीन धर्मविचाराची सरमिसळ

झालेली असून कोठें कोठें त्या ग्रंथावर भावना प्रधान अवैदिक विचारांची दाट छाया पसरली आहे. शुद्ध गंगेचें पवित्र उदक पाहिजे असल्यास तुम्हास गंगोत्रीकडे धांव मारली पाहिजे. काशी प्रयागांत जाऊन तें लाभावयाचें नाही. काशी-प्रयागातील गंगा ही गंगा खरी पण ती शुद्ध व निर्मळ गंगा नव्हे! तेथें तिच्यांत इतर नद्याची व ओहळ ओढ्याची भेसळ झालेली आहे. म्हणून तेथील गंगोदक हें पूजार्ह मानण्यांत येत नाही. याकरितां हरिद्वारची गंगाच पाहिजे! तद्वत् वैदिक आर्य संस्कृतीचें म्हणजे तिच्या आचारविचाराचें, आहार विहाराचें, प्रपंच-परमार्थाचे, नीती-व्यवहाराचे तसेंच समाजकारण, राजकारण, तत्वज्ञान व सृष्टिज्ञान या सर्वाचें यथार्थ व सुटसुटीत चित्र पहावयाचे झाले तर तेजस्वी ब्राह्मणग्रंथाकडे-तशांत विशेषतः अष्टपैलू व अष्टावधानी शतपथ ग्रथाकडे– धांव मारली पाहिजे, याविषयीं मुळीच शंका नाहीं.

शतपथाच्या अंतरंगात शिरुन तेथील ज्ञानभांडार हें किती रमणीय व मनोहर आहे आणि विचारसरणी किती ओजस्वी, प्रभावी व प्रसादपूर्ण आहे हें सांगण्याचें हें स्थळ नव्हे. ज्याना त्याची हौस व आवड आहे अशा मूज्ञ वाचकांनी आमच्या याज्ञवल्क्य-दर्शन या ग्रंथावरून नजर फिरविल्यास त्यांची काहींशी कल्पना येईल. वैदिक आर्य लोक हे स्वभावतःच मोठे तेजस्वी व बाणेदार वृत्तीचे लोक असल्यामुळें 'वीर्यं वै कर्म' हे शतपथ बचन त्यांचें मुख्य पालूपद होतें. ते पौरुषाचे मोठे चाहते असून यज्ञोपासनेचे एकनिष्ठ उपासक होते. त्यांची यज्ञकल्पना विश्वव्यापक व सर्वकष होती व त्या ग्रंथावरून जर कोणी दृष्टि फिरवील तर ती त्याला आजहि तशी दिसून येईल. 'यज्ञे सर्वं प्रतिष्ठितम्' अशी त्यांची दृढ भावना असून, मनुष्याच्या आशाआकांक्षा, वासना

व इच्छा सुपूर्त करणारी ती एक दिव्य कामधेनु आहे अशी त्याची दृढ भावना होती म्हणून वैदिकाचा कोणताहि धर्मग्रथ उघडल्यास– विशेषत• ब्राह्मण ग्रथावरून दृष्टि फिरविल्यास–तेथें मुख्यत यज्ञविपयावर विवेचन केलेलेच प्राय आढळून येईल

आणि शतपथाची झाली तरी हीच गोष्ट आहे त्यातही ब्राह्मण ग्रथाप्रमाणे यज्ञविपयक रुक्ष व नीरस असे रखरखीत प्रदेश आहेतच तरी पण मधून मधून अनेक वोधपर कथागोष्टी, आख्याने, उपाख्यान याची सुदर हिरवळ तेथ विखुरलेली असल्यामुळें व ठिकठिकाणी तत्त्वज्ञान सुमनाचे सुदर गुच्छ प्रफुल्ल फुललेले असल्यामुळ त्या दिव्य व मनोहर देखाव्याने रुक्ष प्रदेशात फिरून फिरून त्रस्त व श्रात झालेले मन शात व प्रसन्न होऊन, पुढील वाटचाल पुन नव्या दमान व उत्साहानें करू लागते, असा वेदप्रेमी लोकाचा सुखद अनुभव आहे आणखी तशातच पुढ येता येता अखेर बृहदारण्यकाच्या दिव्योद्यानात शिरल्यावर काय मग पुसूच नका ! जिकडे तिकडे सुदर तत्त्वज्ञानाचे सुरम्य ताटवेच ताटवे ! एकापेक्षा एक सुदर नि एकापेक्षा एक मनोहर ! आणि ज्ञानानदाचे फवारेच फवारे ! खरोखर बृहदारण्यक म्हणजे दिव्य ज्ञानाचे एक नदनवनच ! व स्वर्गीय आनदाचा एक महासागर !!

या शतपथातच वैदिक आर्याच्या विविध भावना, आकाक्षा, आचार, विचार, नीति, व्यवहारज्ञान व विज्ञान या सर्वांचे सुदर शब्दचित्र बीजरूपानच का होईना, पण अगदी स्पष्ट व सुटसुटीत उमटलेले जसे पहावयास मिळेल, तसे इतरत्र कोठेंहि मिळणार नाही वाचकहो ! या शतपथ ग्रथराजाचे विचारसौदर्य व अर्थमाधुर्य किती म्हणून सागावे ? त्याचा विस्तार, त्याची रचना, त्याची प्रतिभा, त्याचे विचार, त्याची शैली त्याचा उपदेश, त्याचे

सौंदर्य, त्याचें वैभव सर्व कांही अगदी और आहे. वैदिकांचा हा विचारप्रधान व ज्ञानगर्भ ग्रंथराज विविध विषयांच्या सुमनोहर विचारालंकारांनी नखशिखांत नटला असल्यामुळें त्याचे तें स्वर्गीय ऐश्वर्य व लोकोत्तर सौंदर्य पाहून आम्हीच काय, जगांतील मोठेमोठे विद्वान पंडित सुद्धां मंत्रमुग्ध व आश्चर्यचकित झाले आहेत, हे आज आम्ही नव्यानेच सांगितलें पाहिजे असांतला काही भाग नाही !

या शतपथ ग्रंथाबद्दल पंडिताना काय वाटते याबद्दल ऋग्यजुःसामवेदावर भाष्य लिहून त्यातील अर्थ स्पष्ट व सुगम केल्यावर विजनगरच्या युवकसम्राटाच्या विनंतीवरून 'वेदार्थ प्रकाशन' या भाष्याच्या आरंभी सायणाचार्य म्हणतात, 'वेदांतील-मंत्रार्थांचें स्पष्टीकरण व विशदीकरण ज्या एकाच ग्रंथांत झालें आहे आणि ज्यांत अध्वर्यूंचें कर्म इतर ग्रंथाचे सहाय न घेतां पूर्णत्वानें विवरण्यांत आलें आहे व ज्यांत परमतत्त्व करतलामलकवत् सुस्पष्ट झालें आहे, असा ग्रंथ म्हणजे माध्यंदिन शतपथ ब्राह्मण हाच आपणास आढळून आला असून त्यावर भाष्य लिहिण्यास आपण प्रवृत्त झालों. '

सर्वतः सायणाचार्यो विस्मृश्योदीरितान्गुणान् ।
माध्यंदिने शतपथे ब्राह्मणे व्याकरोति तत् '

असा सायणाचार्यांनी आपला स्पष्ट अभिप्राय दिला आहे.

प्रो. म्याकडोनेल्ड साहेब या ग्रंथांविषयी आपला अभिप्राय थोडक्यात देतात तो असा —The Satapatha Brahman of Yajnavalkya is next to Rigveda, the most important production in the whole range of Vedic Literature.

प्रो. मोक्षमुल्लरसाहेबांनीं असें म्हटलें आहे :— There are passages in the Brahmanas full of genuine thought and

feeling and most valuable as pictures of life and as regards early struggles which have left no trace in the literature of other nations

प्रो ग्रिफिथ हे असे लिहितात – The Satapatha Brahman is admittedly on the whole the most recent of the great Brahmana texts Yajnavalkya is a leader bordering on the upanishad period and there is little doubt that the Brahmana with its clear distinction from Sanhita is the product of a distinct attempt to *improve on the confused form of the black Yajurved* texts ( .. the treament of the matter in tha Taittiriya *must be regarded as artficial and unnatural )*

यावरून शतपथग्रंथाची योग्यता काय आहे याची कल्पना येईल याज्ञवल्क्याना जी अमर कीर्ति प्राप्त झाली, त्यास कारण हा ग्रंथराज होय



# कर्मयोग

शतपथाची शिकवण प्रामुख्याने गृहस्थाश्रमासाठी– प्रापंचिक लोकांसाठी– जागतिक जीवनोत्कर्ष व पारमार्थिक निःश्रेयस या दोहोंचे साधन वैदिक पद्धतीने कसें करावें .हें सांगण्यासाठीं आहे. या बाबतींत ध्यानांत ठेवण्यासारखी मुख्य मुद्द्याची गोष्ट म्हणजे 'यथाचारी तथा भवति ' हें वैदिकांचें व्यावहारिक सूत्र असून 'यथोपासते तदेव भवति ' हे त्याचें पारमार्थिक सूत्र आहे.

अर्थात व्यावहारिक व पारमार्थिक क्षेत्रांत कर्माचें महत्त्व व आवश्यकता सारखीच असून त्याशिवाय कोणतीहि गोष्ट सिद्धि पावत नाही. हेंच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे 'कर्म तसे फल ' व 'भाव तसा देव ' हा कर्मसिद्धांत पुढे करतां येईल. सत्कर्म केलें तर सद्गति आणि दुष्कर्म केले तर दुर्गति–' **पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पाप पापेन** ' (बृ. ४–४–५)– हे सर्व मानव आचार विचाराचे आद्य सूत्र आहे. या जगांत मनुष्यामनुष्यामध्ये जे स्वभाववैचित्र्य आढळून येते त्याच्या मुळाशी कर्माचे हे प्राबल्यच दिसून येते. हें उघड सांगावें असें नाही.

वैदिक धर्मात कर्माचे दोन प्रकार सांगण्यात आले. एक सकाम कर्म व दुसरे निष्काम कर्म. आर्यांचे वेदग्रंथ हे प्रापंचिकांची कामधेनु असल्यामुळें व तदुक्त इष्ट प्राप्त्यर्थ व अनिष्ट निवारणार्थ कर्माची आवश्यकता प्रतिपादिली असल्यामुळे साहजिकच कर्माला महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे. ते कर्म सकाम असेल तर त्यापासून जागतिक जीवनाचा–म्हणजे प्रापंचिक अभ्युदयाचा-उच्चांक गांठता येतो. त्याला मानवी सुखसमाधानाची सर्व साधनें कर्माच्या आधारावर प्राप्त होऊं शकतात आणि मरणोत्तर सत्यलोकापर्यंत –ब्रह्मलोकापर्यंत– मजल मारतां येते, असे याज्ञवल्क्यानी स्पष्ट सांगितलें आहे. ही सकाम कर्माची पारमार्थिक सर्वश्रेष्ठ स्थिति होय. यापुढें सकाम कर्माची गति कुंठित होते व त्याचा अवतार

सपुष्टात येतो येथपर्यंतचे विवेचन हे वेदोक्त कर्मानुष्ठानाचे, सकाम कर्मानुष्ठाचे -झाले

आता वेदातोक्त– उपनिषदोक्त– ज्ञानमार्गांत वेदोक्त कर्ममार्गाचे जशाचे तसे अनुकरण करण्यात आले नसून त्याला मुरड घालण्यात आली आहे याचे कारण असे की, सकाम कर्मांन जे लोक प्राप्त होतात, ते शाश्वत नसून अतवत असतात नित्य नसून अनित्य नि अशाश्वत असतात जोपर्यंत त्या कर्माची पुण्याई आहे तोपर्यंतच त्या लोकाची प्राप्ति पुण्य क्षय पावल्यावर पुन तेथून गचाडी मिळणार ' क्षीणे पुण्ये मर्त्यलोक विशन्ति ' अशी या सकाम कर्मांची कुळकथा आहे

या विषयी शतपथान स्पष्ट इशारा दिला आहे की ' यदिह वा अप्यनेवविन्महत्पुण्य करोतितयु तद्धास्यान्तत क्षीयते' मनुष्यान मनात इच्छा धरून किती जरी सत्कर्म केलेले असले–पुण्याचरण केलले असले–तरी ते शेवटी क्षय पावणारच आणि ते पुण्य सपल्यावर पुन या मृत्युलोकाशीच गाठ म्हणून सकाम कर्माला छाट मारून वेदातोक्त निष्काम कर्माचा स्वीकार केलेला आहे कर्म तर्हि आवश्यक आहेच पण ते सकाम नसून निष्काम असते याच कारण असे की निष्काम कर्म हे, चित्तशुद्धीस उपकारक होते चित्तशुद्धि झाली म्हणजे मन स्थिरावते बुद्धि उजळते आत्म्यात जागृति अकुरते आणि अखेर वेदान्त श्रवणाने सत्यज्ञानाचा उदय होऊन निरतर सुखनिधान अशा मोक्षाचा लाभ होतो अर्थात अक्षय आनद व शाश्वत शांति प्राप्त होऊन पुन जन्ममृत्यूची भगभग व दगदग रहात नाही निष्काम कर्म म्हणजे कसल्याहि कर्मफलाची इच्छा न धरता त निरीच्छ बुद्धीने परमेश्वरार्पण करणे हे कर्म बाधक न होता उलट आत्मज्ञानास–आत्मसाक्षात्कारास–पोषक व उपकारक होते हाच कर्मयोग होय, हे कर्मकौशल्य ज्यास साधले–मग तो प्रपचात असो वा परमार्थात असो–याला इष्ट सिद्धि ठेवलेलीच अशी ही थोडक्यात वेदोक्त कर्मयोगाची याज्ञवल्क्यानी शतपथात माडणी करून दाखविली आहे

# सूर्य तो सूर्यच

याज्ञवल्क्याचे चरित्र म्हणजे पौरुषाने पूर्ण ओथम्बलेले आहे त्याच्या जीवनात किती विघ्नें, किती विविध प्रसग, केवढा विरोध त्याच्या प्रचड उद्योगास, साहसास नि प्रयत्नास तर सीमाच नाही. सर्व विघ्नाना व सकटाना न जुमानता एकट्यानीच सिंहाच्या छातीने सर्व प्रतिस्पर्ध्यांशी सामना देऊन सर्वांवर त्यानी मात केली आणि आपले यश सूर्याप्रमाणे तेजस्वी व अजरामर करून ठेविले. नवीन वेद रचला, नवीन पथ स्थापिला, कार्याची नवीन दिशा आखली, नवीन परपरा रूढ केली आणि सर्व क्षेत्रात सर्वच काही नवीन व अपूर्व करून दाखविले तत्त्वज्ञान क्षेत्रात तर जगाच्या इतिहासात 'योगीश्वर याज्ञवल्क्य' हे त्याचे पवित्र व पूज्य नाव गौरीशकराप्रमाणे अग्रस्थानी विराजमान झाले असून आज देखील जग त्याना ' हिंदु तत्त्वज्ञानाचा जनक The Father of Hindu philosophy, या बहुमानाने ओळखीत आहे

पण अशा श्रेष्ठ विभूतीलाहि वारवार किती हिसके व टक्केटोणपे खावे लागले व त्या सर्वाना टक्कर देऊन अखेर ते त्यातून सहीसलामत कसे निभावले हे पाहिले म्हणजे कोणालाहि आश्चर्य वाटल्यावाचून व त्याचे कौतुक करून त्याना धन्यवाद दिल्यावाचून राहवणार नाही वैशपायनानी तर त्याना सळो का पळो करून सोडले होते य कश्चित कारणाकरिता शाप काय दिला, शिकविलेल्या विद्या परत काय घेतल्या, यज्ञातील दक्षिणेसाठी भाडण काय काढले, जनमेजयाच्या यज्ञात बहिष्कार काय घातला, त्याच्याविरुद्ध कट काय उभारला, बड काय माजविले, एक का दोन अडीअडचणी निर्माण केल्या? पण हिऱ्याला जमजसे पैलू पाडावे तसतसा

तो अधिकच तेजस्वी व चमकदार दिसू लागतो तशीच गोष्ट त्याच्या बाबतीतहि झाली वैशपायनानी जसजसा त्याचा छळ माडला तसतसे त्याचे तेज वृद्धिगतच झाले एकामागून एक अशा विजयश्रीनी माळा घातल्यान त्याचा कठ विभूषित झाला आणि त्याच नाव पूज्य व शाश्वत बनले

रागाच्या भरात वैशपायन भाच्याला तसा शाप न देते तर योगीश्वराचे आ मतेज इतक्या ज्वाज्वल्यतेन झळकले असते की नाही, ह सागता येणार नाही थोर माणसातील कर्तृत्व शक्तीचे विस्फुलिंग प्रज्वलीत होऊन प्रकाशमय होण्यास तसेच काहीतरी जबरदस्त कारण हवे असते आणि त वैशपायनानी पुरविले तुकारामाची भगवद्भक्ति प्रज्वलित होण्याला त्याच्या बायकोचा ककशपणाच कारण झाला आणि प्रत्यक्ष लोकमान्याची व महात्मा गाधीजीची गोष्ट झाली तरी काय ? त्याच्यामध्ये असलेल्या लोकोत्तर कर्तृत्वशक्तीचे ज एवढ धगधगीत आत्मतेज चमकले, त्याला कारण फिरगी सरकारची तापट व तामस वृत्तीच नव्हे तर काय ? शिवाजी महाराजाना हिंदुपदपादशाही स्थापन करण्याच स्फुरण चढल, त्याला कारण मोगली सुल्तानाचा अफाट नि आसुरी छळ म्हणू नये तर आणखी काय म्हणावे ?

विद्येच्या, सत्तेच्या व सामर्थ्याच्या आसुरी लोभान पिसाळलेल्या माणसाची अगर राष्ट्राची खोडच अशी असते काही वेळ त्याचा जय झालासा दिसला तरी अखेर 'सत्यमेव जयते' ही देववाणीच प्रभावी व विजयी ठरते। सर्व सत्वसपन्न लोकाची अशीच कथा आहे

रागाच्या भरात वैशपायनानी काहीतरी बोलून कर्तृत्ववान शिष्यवराला आपल्या आश्रमातून अर्धचद्र दिला पण त्याचा परि-

णाम म्हणजे नवा शुक्ल यजुर्वेद निर्माण झाला. आणि निराळी एक वेदवृक्षाची शाखा फोफावली. सज्जन, सत्त्वसंपन्न, कर्तृत्ववान् व्यक्तीशी तामसी व मत्सरी लोकांचें घर्षण होऊन ठिणगी उडाल्यास विलक्षण परिणाम होतो आणि दिव्य चमत्कार घडतो यात सशय नाही.

योगीश्वर याज्ञवल्क्य हे जगाच्या दृष्टीने लोकापवादांतूनही सुटले नाहीत. हा लोकापवाद कोणालाहि सुटला नाही. श्रीराम, श्रीकृष्ण, राजा धर्म, छत्रपति शिवाजी, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी इतकेच नव्हे तर प्रत्येक थोर माणसामागे सावली-प्रमाणे तो पाठ धरून आहेच आहे. श्रीरामचंद्राला स्त्रीलंपट म्हणणे, श्रीकृष्णाला चोर कपटी म्हणणे, धर्माला भितरा भागूबाई म्हणणे, शिवाजीला चोर लुटारू म्हणणे, लो. टिळकाना राजद्रोही म्हणणे, महात्मा गांधीना बडखोर व सैतान म्हणणे, तशातलाच याज्ञवल्क्याना गुरुद्रोही म्हणण्याचा हा वैशंपायनाचा तामसी प्रकार होय. सूर्यालासुद्धा नाव ठेवणारे लोक जगात आहेतच की नाहीत? कुटाळ जगाचे हे असले आसुरी चाळे चालावयाचेच.

शिवाय आम्ही म्हणतो विनाकारण प्रजेला छळणारा तो राजा कसला, मुलाला निष्कारण वडविणारा तो बाप कसला, विश्वास-घात करणारा तो मित्र कसला आणि शिकवलेली विद्या परत मागणारा तो गुरु कसला? वैशंपायन गुरुजीला तरी हे शोभलें काय? असा काय अक्षम्य अपराध केला होता म्हणून त्यांनीं भाच्याचा असा सूड घ्यावा व दिलेले विद्यादान परत घ्यावें. टीकाकारांना गुरुद्रोह तेवढा दिसावा आणि शिष्यद्रोह मात्र दिसू नये, हे आश्चर्य आहे. जगाची रीतच अशी होऊन बसली आहे की लहानाच्या डोळ्यातील कुसळ तेवढें दिसावें आणि मोठ्याच्या

डोळ्यातील मुसळ मात्र दिसू नये! मोठ्याचे पर्वतप्राय दोष झाकले जातात आणि गरिबागुरिबाचे बारीक सारीक दोष देखील वेशीवर लटकविण्यात यतात! जगाची ही उल्टी रीतच आहे

ज्याअर्थी भगवान श्रीसूर्यनारायणानं याज्ञवल्क्यावर अनुग्रह केला, वाग्देवी सरस्वतीनं वरदहस्त ठेवला आणि श्रीशंकरानी 'योगीश्वर' हा बहुमानाचा किताब दिला व ज्यावर जनमेजयजनकासारखे पुण्यश्लोक राजे प्रमादरभाव दाखवू शकले त्याअर्थी याज्ञवल्क्य हे स्फटीकाप्रमाणे आचारविचारानं स्वच्छ व गंगप्रभाणे निर्मळ होते व असावेत याविषयी पापी व मत्सरी लोकांशिवाय इतरास शंका येणार नाही सूर्य, शंकर व सरस्वती यांच्या कृपाकटाक्षास ते पात्र झाले ही एवढीच गोष्ट लक्षात घतली म्हणजे त्यांच्या असामान्य कर्तृत्वाबद्दल, निर्मलतेबद्दल, आणखी पुरावा हवा कशाला?

सूर्य तो सूर्यच त्याचा दिव्य प्रकाश त्रैलोक्यात भरून राहणार यदाकदाचित् मनुष्य स्वभावास अनुसरून काही किंचित् दोष त्याच्यात कोणाला, दिसले तरी योगीश्वर ते योगीश्वरच! त्यांच्या तेजोमय असाधारण चारित्र्यातच त्यांचे वैशिष्ट्य आहे



# ज्ञान–कर्म–सहयोग

भारतीयाचा प्राचीन इतिहास पाहिला तर तेथें प्रपचात आणि परमार्थात कर्माचे महत्त्व नि प्राबल्य प्रामुख्याने दृष्टोत्पत्तीस येते. वैदिक धर्माची मुख्य इमारत कर्मावरच उभारण्यात आलेली असून मानवी जागतिक जीवनोत्कर्षाचे रहस्य त्या कर्मातच गर्भित आहे मनुष्याचे मनोरथ सत्यसृष्टीत अभिव्यक्त व्हावयाचे झाले तर कर्माला सोडून इतर कोणत्याहि मार्गाने ते शक्य नाही. म्हणून 'कर्मणैव हि संसिद्धि' असे भगवतानी कर्माचे माहात्म्य गाइले आहे याज्ञवल्क्यानी 'कुर्वन्नेवह कर्माणि जीजीविषेच्छतं समा.'। कर्म करीतच शभर वर्षे जगण्याची इच्छा धरावी असा चकचकीत निर्वाळा दिलेला आहे. 'वीर्यं वै कर्म' हे त्याचें पालुपद आहे थोडक्यात सागावयाचे म्हणजे कर्माशिवाय मनुष्याला या जगात दुसरा खरा हितकर्ता व उद्धारकर्ता नाही.

वेदात कर्म याला पारिभाषिक अर्थ असून त्याचा भावार्थ देवोपासना-यज्ञोपासना असा आहे त्याचप्रमाणे ज्ञान म्हणजे आत्मज्ञान–तत्त्वज्ञान–ब्रह्मचिंतन या अर्थी त्याचा उपयोग करण्यात आलेला आहे ज्याला परम पुरुषार्थ साधावयाचा आहे त्याला देवोपासना व आत्मोपासना या दोहोंचीहि आवश्यकता आहे. ज्याप्रमाणे पक्षी हा दोन्ही पखाच्या सहाय्याने आकाशात उडी मारतो तद्वत कर्म व ज्ञान या दोहोंच्या मदतीने परम-पुरुषार्थ'-शाश्वत सुखनिधान प्राप्त करून घेता येते, असा याज्ञवल्क्याचा कटाक्ष आहे ज्ञानरहित केवळ कर्माने अगर कर्मरहित केवळ ज्ञानाने परम पुरुषार्थ साध्य होणे शक्य नाही. म्हणून मुमुक्षूने दोन्ही बाजूहि सांभाळल्या पाहिजेत. याचें कारण असे की, कर्माच्या पोटात

ज्ञान व ज्ञानाच्या पोटात कर्म अशी वस्तुस्थिति असून दोन्हींचा सहयोग हाच परमसुखाचा राजमार्ग आहे

कर्म श्रेष्ठ का ज्ञान श्रेष्ठ याविषयी कोरड्या व पोपटी पंडिता-मध्यें एक मोठा वादाचा विषय होऊन बसलेला आपण पाहतो एक पक्ष असा आहे की, तो कर्माला प्राधान्य देऊन ज्ञानाला गौणत्व देतो अर्थात ज्ञानाच्या डोक्यावर तो कर्माला बसवू पाहतो दुसरा पक्ष आहे तो ज्ञानाचा उदोउदो करून कर्माला वाळीत टाकू पाहतो पण हे दोघेहि याज्ञवल्क्याच्या मते अर्धवटच ठरतात त्याचा शुक्ल यजुर्वेद चकचकीत या वाक्तीत कौल देतो तो असा–'अन्धतमः प्रविशन्ति यऽविद्यामुपासते । ततो भूय एव ते तमो य विद्यायां रताः ॥' शु य ४०–१२ ॥ जे केवळ कर्मानच गुटमळून वसतात ते कट्टर कर्मठ लोक अज्ञानांधकाराने गुरफटलेल्या लोकात जाऊन पडतात व जे कर्म टाकून केवळ कोरड्या ज्ञानानेच मोक्ष मानतात ते तर त्याहूनहि निबिड अशा घोरतर लोकात प्रवेश करतात हे वचन ज्ञानशून्य जहाल कर्मठ व कर्म-हीन पोपटी पंडित या दोघानाहि सारखेच दोषी ठरविण्यास कमी करीत नाही

वैदिक धर्मात कर्मांचा प्रांत वेगळा आणि आणि ज्ञानाचा मार्ग वेगळा अशी वस्तुस्थिति असली तरी कर्माला ज्ञानाची व ज्ञानाला कर्माची अपेक्षा व आवश्यकता असल्यामुळे दोहोंचे यथार्थज्ञान असणे हे पुरुषाच्या परम कल्याणार्थ अपरिहार्यच ठरते आणि याज्ञवल्क्य झाले तरी हेच सागतात ईशावास्यात त्याचा उल्लेख सापडतो तो असा —' विद्यां चाविद्यांच यस्तद्वेदोभय स ह । अविद्यया मृत्यु तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते ॥ (शु य. ४०–१४ ) अविद्या म्हणजे कर्म व विद्या म्हणजे ज्ञान ही दोन्ही जो जाणतो

तो कर्मोपासनेनें दुःखस्वरूप मृत्यूचे अतिक्रमण करून आत्मज्ञानानें अमृतरूपी मोक्ष प्राप्त करून घेतो. याम ज्ञानकर्म समुच्चय वाद असें म्हणतात. ही परम कल्याणकारक शिकवण जेव्हां आर्य विसरले—कर्म व ज्ञान याची फारकत झाली, तेव्हा त्यांचें सगळेंच पारडे फिरलें आणि कोरडचा ज्ञानाचा उदोउदो होऊन सर्वत्र गोंधळ माजून राहिला. तेव्हां ज्ञान व कर्म यांचें हृदयंगम दृश्य याज्ञवल्क्यांनी कसें रेखाटलें आहे याचें येथे थोडक्यांत तात्पर्य रूपानें दाखविण्यात आलें आहे.



# जनक–याज्ञवल्क्य–संवाद

जनक याज्ञवल्क्य संबंध शतपथात अनेक ठिकाणी व अनेक प्रसंगी निरनिराळ्या स्वरूपात आलेला दाखविला आहे. याज्ञवल्क्य विद्यार्थीदशेत असताना श्वेतकेतु, सोमशुष्म व सात्ययज्ञ याच्याबरोबर त्याचा जनकाशी पहिला संबंध आला. त्या पहिल्या भेटीतच राजाने यज्ञवल्क्याचे अग्निहोत्रासंबंधीचे अपूर्व ज्ञान पाहून त्याच्यावर खूप होऊन, त्याच्याकडून 'कामप्रश्न एव मे त्वयि याज्ञवल्क्यासत्। ( श. प ११–६–२–१० )––मला यथेच्छ आपणास प्रश्न विचारण्याची परवानगी असो, असा वर मागून घेतला. त्यानंतर जनकाच्या वडिलांच्या यज्ञात यज्ञसाफल्य करण्याच्या बाबतीत याज्ञवल्क्याशी दुसरा संबंध आला. तिसरा संबंध जनकाला अग्निहोत्राचे काही बाबतीत अडत होते त्याविषयी शंका निरसन करून घेण्यासाठी म्हणून आला असून त्यावेळी याज्ञवल्क्यानी त्याचे संपूर्ण समाधान केल्यावर आनंदित होऊन 'वेत्थाग्निहोत्रं याज्ञवल्क्य धेनुशतं ददामि' ( श. प. ११–३–१–४ ) याज्ञवल्क्य महाराज! आपण खरोखर अग्निहोत्र पूर्ण जाणता आणि म्हणून मी आपणास शंभर गाई बक्षीस देतो ' असे म्हणून त्यास शंभर गाई दान दिल्या. त्यानंतर त्याचा संबंध अमरस्मृति अशा जनक सभेत येऊन, तेथे एक हजार गाई त्यानी जनकाकडून बक्षीस मिळविल्या. शिवाय शतपथात पुढे अनेक वेळी त्या दोघात आत्मविद्येवर गहन व गंभीर चर्चा झालेली आहे (श. प १४–६–१० व ११; १४–७–१ व २ ) शेवटच्या व्याख्यानाच्या प्रसंगी जनक राजे इतके खूप झाले की, अखेर त्यानी त्याना एक हजार गाई तर दिल्याच. पण तेवढ्यावरच न थांबता शेवटी 'सोऽहं भगवते विदेहान्ददामि

मां चापि सह दास्याय – हे भगवन् गुरुदेव, माझे विदेहातील सर्व प्रजाजन व त्यावरोबरच मीहि पण आपले दास्यत्व करण्यासाठी आपल्या सन्निध सिद्ध झालो आहो अशी गंभीर गर्जना केली. याला म्हणावा गुरु–शिष्य भाव. वैदिक राजे व वैदिक ऋषि यांचा हा प्रेमळ व उदात्त संबंध पाहून कोणाहि भाविक भारतीयाचे अंत - करण आदराने व कृतज्ञतेने भरून येईल! हीच गोष्ट महाराष्ट्रात छत्रपति शिवाजी राजे व श्रीसमर्थ रामदास गुरुदेव यांच्यासंबंधी पहावयास मिळते. ते पुण्य महात्मे व तो तेजस्वी काळ आता गूढ भूतकाळात जमा झालेला आहे. तो याज्ञवल्क्यांनी जनकास केलेला शेवटचा उपदेश मार्मिक, विचारसंपन्न व सुंदर अशा व्याख्यान रूपात दिलेला आहे. आम्ही तो संवादरूपाने देत आहोत.

एके समयी याज्ञवल्क्य व जनक यांच्यांत तात्त्विक व पारमार्थिक विषयावर चर्चा चालली असता ओघावरून गोष्ट निघून जनकांनी सहज प्रश्न केला की, गुरुदेव! मनुष्य मरतो म्हणजे काय होते ?

याज्ञवल्क्य–हा देह जरेने अगर रोगाने जर्जर झाला, कृश व बलहीन बनला म्हणजे तो जीवात्म्याच्या व्यवहाराला निरुपयोगी होतो, अर्थात् तो सोडून देऊन जीवात्म्याला दुसरा नवीन धारण करणे भाग पडते नि तो तेथून निघून जातो.

जनक – म्हणजे काय ?

याज्ञवल्क्य – राजा बाहेर जावयास निघाला म्हणजे शिपाई, सेवक, अधिकारी हे जसे प्रथम त्याच्यापुढे चालू लागतात, तद्वत हा शरीरातला राजा – म्हणजे जीवात्मा – देह सोडून बाहेर जाण्यास निघाला म्हणजे इंद्रिये, मन, बुद्धि इत्यादि परिवार पुढे चालू लागतो. हा सर्व लवाजमा बरोबर घेऊन तो हृदयाच्या

ठिकाणी येतो या वेळी चक्षुरादि इंद्रियसमुदाय जीवात्म्याशी तादात्म्य पावलेला असतो

जनक – मला याचा नीट उमज पडत नाहीं, अधिक फोड करून सांगा

याज्ञवल्क्य – हा चाक्षुष पुरुष जेव्हा परत आदित्याकडे जावयास निघतो, तेव्हा सर्व इंद्रियशक्ति त्याच्यात लीन झालेल्या असतात आणि म्हणून देहाला बाहेरचे ज्ञान होऊ शकत नाही उदाहरणार्थ, डोळ्याला रूप ओळखू येत नाही, कानाला शब्द ऐकू येत नाहीत, जिभेला रुचि समजत नाही, नाकाला वास कळत नाही, मनाला मनन करता येत नाही, त्वचेला स्पर्श उमगत नाही कारण ती ती इंद्रियशक्ति आत्म्याने आपल्यात आकर्षून घेतलेली असते म्हणजेच लोक बोलतात की, याला दिसत नाही, वास समजत नाही, रुचि कळत नाही, बोलता येत नाही, ऐकू येत नाही, काही कळत नाही की वळत नाही

जनक – हे असे का होते ?

याज्ञवल्क्य – मरण काळी जीवात्मा हे शरीर सोडून कायमचा निघून जातो म्हणून तो आपला परिवारही सगळा बरोबर नेतो. अंतकाल आला–जीवात्मा देहाला सोडून जाण्याचा क्षण आला–म्हणजे बाहेर पडण्याचे हृदयद्वार प्रकाशित होते त्यातून हा आत्मा बाहेर पडतो. याप्रमाणे तो बाहेर जाऊ लागला म्हणजे त्याच्या मागोमाग प्राण जातो प्राणाच्या मागोमाग सर्व इंद्रियेंहि निघून जातात एक गोष्ट मात्र विशेष असते

जनक – ती कोणती ?

याज्ञवल्क्य – या वेळी जीवात्मा विशेष ज्ञानाने युक्त असतो. म्हणजे बुद्धि, कर्म व वासना ही सर्व त्याबरोबरच असतात

जनक – याला कांहीं दृष्टान्त ?

याज्ञवल्क्य–आहे. गवतावरची जळू गवताच्या शेंड्यापर्यंत जाऊन पोंचली म्हणजे पुढें जाण्यास आधार नसल्यामुळे पुन जशी दुसऱ्या मार्गाचा–त्याच तृणावरून परत जाण्याच्या मार्गाचा–आश्रय करुन आपल्या इंद्रिय–समुदायांचा उपसंहार करते, त्याचप्रमाणे हा आत्मा देखील या शरीराचा व अविद्येचा त्याग करून – नाश करून–दुसऱ्या मार्गाचा अवलंब करण्याकरिता इंद्रियादिकाचा उपसंहार करतो

जनक – पुढें काय होतें ?

याज्ञवल्क्य–सोनार हा जसा सोन्याचा तुकडा घेऊन त्याचा आपणास हवा तसा अलंकार बनवितो, त्याला वाटेल तसलें रूप देऊं शकतो, तद्वत् हा जीवात्मा आपल्या सुकृताप्रमाणे–सत्कर्माप्रमाणें – पितराचें, गधर्वाचे, देवाचें अथवा प्रजापतीचें किंवा ब्रह्मदेवाचे अगर आपणाप हवे तसे रूप धारण करू शकतो.

जनक – एवढें जर त्याचें सामर्थ्य आहे तर मग तो आहे तरी कसा ?

याज्ञवल्क्य–काय सांगू जनकराया हचा आत्म्याचा प्रभाव नि महिमा ? हा आत्मा विज्ञानमय आहे, मनोमय आहे, प्राणमय आहे, चक्षुर्मय आहे, श्रोत्रमय आहे, पृथ्वीमय आहे, तो आपोमय-वायुमय–तेजोमय–आकाशमय आहे तो काममय – अकाममय, क्रोधमय–अक्रोधमय; धर्ममय–अधर्ममय, प्रत्यक्षमय–परोक्षमय आहे आणि असें सांगत गेलो तर सर्वच आयुष्यहि पुरणार नाहीं, म्हणून एकाच शब्दांत सांगून मोकळे व्हावयाचें तर तो सर्वमय आहे.

जनक–मग तो जवळ जवळ ब्रह्मच आहे असे का म्हणाना ?

असें हें कर्मचक्र सारखें चालू असतें. संसारचक्र म्हणतात तें हेंच. ही सकाम कर्माची गोष्ट झाली.

जनक— म्हणजे काय ?

याज्ञवल्क्य— फळाची मनांत इच्छा धरून कर्म करणे याला सकाम कर्म म्हणतात.

जनक— मग निष्काम कर्माची कथा निराळी आहे की काय ?

याज्ञवल्क्य— निष्काम कर्माचें स्थान वेगळें आहे. जे निरिच्छ राहून कर्म करतात, जे निष्काम होऊन ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म करतात अशांची गोष्ट निराळी आहे. जे निष्काम झाले आहेत, निरिच्छ झाले आहेत, फक्त आत्मलोकाची तेवढीच ज्यांना इच्छा असते, अशांचें प्राण उत्क्रमण पावत नाहीत. ते ब्रह्मरूप होऊन ब्रह्मामध्यें विलीन होतात. ' हृदयातील सर्व कामना अगर वासना जेव्हां नाहींशा होतील तेव्हां मनुष्य हा मृत्युरहित होतो आणि या लोकीं याच देहीं तो ब्रह्मत्व पावतो. शरीराहून भिन्न असा हा प्राण असून तो अमर आहे, तोच ब्रह्म नि तोच तेज होय.

जनक— आपल्या या सदुपदेशाबद्दल मी आपणास हजार गाई देतो.

याज्ञवल्क्य— जनकराया जरा थांब मला तुझ्या गाई नकोत. तुला पूर्ण ज्ञान झालें, तुझा सर्व संशय फिटला म्हणजे त्या गाई घेण्याचा मला अधिकार पोहोचेल. तुझ्या मनातील सर्व संशय दूर करून घे. तू निःशंक होऊन पूर्ण ज्ञानी झालास म्हणजे मी त्या गाई घेईन. हा ब्रह्मप्राप्तीचा—मोक्षाचा—मार्ग फार सूक्ष्म आहे. तसाच तो विस्तृत आणि फार प्राचीनहि आहे. जे खरोखर ब्रह्मज्ञानी झाले आहेत ते शरीरपातानंतर मुक्त होऊन या मार्गानें वर स्वर्गास जातात व मोक्ष मिळवितात. हाच एक मार्ग पूर्ण आहे.

याज्ञवल्क्य–जवळ जवळ का, प्रत्यक्ष ब्रह्मच आहे ना.

जनक–मग मरणोत्तर ब्रह्मच होतो की काय?

याज्ञवल्क्य–नाही. तसा प्रकार नाही

जनक–मग त्याची स्थितिगति कोणती ?

याज्ञवल्क्य–ते कर्मावर अवलंबून आहे जसे त्याचे कर्म, तशी त्याची गति !

जनक–म्हणजे ?

याज्ञवल्क्य–इथे, या लोकी जसे तो कर्म करील । जसे त्याचे आचार–विचार असतील, तसे त्यास मरणोतर फल मिळते– म्हणजे गति प्राप्त होते. चागले कर्म करणारा साधु होतो व वाईट कर्म करणारा दुष्ट होतो. पुण्यकर्म करणारा पुण्यवान होतो आणि पाप करणारा पापी होतो. अर्थात् हे सर्व कर्मावर अवलंबून आहे

जनक–हे कर्म कसे घडते ?

याज्ञवल्क्य–कर्माला कारण वासना, इच्छा वा काम होय. मनुष्य हा स्वभावत काममय आहे, वासनामय आहे. त्याची वासना–इच्छा असेल तसा त्याचा निश्चय, जसा निश्चय तसे कर्म व जसे कर्म तसे फळ कर्म चागले असल्यास फळहि चागलेच आणि ते वाईट असल्यास फळहि वाईट असते हा कर्म-सिद्धान्त आहे मनुष्य या लोकी जसे बरेवाईट कर्म करील तशी त्याला मरणोत्तर गति प्राप्त होते. या माझ्या म्हणण्याचा अर्थच असा की, मनुष्याचे कर्म जसे असेल, तसे त्यास फळ मिळते. अर्थात् तशी त्याला गति प्राप्त होते. आणि ते भोगावयास म्हणून तो त्या लोकी जातो. तेथे गेल्यावर कृतकर्मांना फलभोग भोगून ते संपल्यावर, पुन या लोकी कर्म करावयास म्हणून तो परत येतो.

असें हें कर्मचक्र सारें चालू असतें. संसारचक्र म्हणतात तें हेच. ही सकाम कर्मांची गोष्ट झाली.

जनक– म्हणजे काय ?

याज्ञवल्क्य– फळाची मनांत इच्छा धरून कर्म करणे याला सकाम कर्म म्हणतात.

जनक– मग निष्काम कर्मांची कथा निराळी आहे की काय ?

याज्ञवल्क्य– निष्काम कर्मांचे स्थान वेगळें आहे. जे निरिच्छ राहून कर्म करतात, जे निष्काम होऊन ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म करतात अशांची गोष्ट निराळी आहे. जे निष्काम झाले आहेत, निरिच्छ झाले आहेत, फक्त आत्मलोकाची तेवढीच ज्याना इच्छा असते, अशांनें प्राण उत्क्रमण पावत नाहीत. ते ब्रह्मरूप होऊन ब्रह्मामध्यें विलीन होतात. ' हृदयांतील सर्व कामना अगर वासना जेव्हां नाहींशा होतील तेव्हां मनुष्य हा मृत्युरहित होतो आणि या लोकी याच देही तो ब्रह्मत्व पावतो. शरीराहून भिन्न असा हा प्राण असून तो अमर आहे, तोच ब्रह्म नि तोच तेज होय.

जनक– आपल्या या सदुपदेशाबद्दल मी आपणास हजार गाई देतों.

याज्ञवल्क्य– जनकराया जरा थांबा मला तुझ्या गाई नकोत. तुला पूर्ण ज्ञान झाले, तुझा सर्व संशय फिटला म्हणजे त्या गाई घेण्याचा मला अधिकार पोहोंचेल. तुझ्या मनातील सर्व संशय दूर करून घे. तू निःशंक होऊन पूर्ण ज्ञानी झालास म्हणजे मी त्या गाई घेईन. हा ब्रह्मप्राप्तीचा–मोक्षाचा–मार्ग फार सूक्ष्म आहे. तसाच तो विस्तृत आणि फार प्राचीनहि आहे. जे खरोखर ब्रह्मज्ञानी झाले आहेत ते शरीरपातानंतर मुक्त होऊन या मार्गानें वर स्वर्गास जातात व मोक्ष मिळवितात. हाच एक मार्ग पूर्ण आहे.

जनक– ज्ञानी लोकाचा हाच मार्ग असाच ना आपला अभिप्राय ?

याज्ञवल्क्य– होय मोक्षमार्ग तो हाच होय

जनक– मग कर्मठ लोकाचा मार्ग कोणता? त्याची गति काय?

याज्ञवल्क्य– जे केवळ कर्मठ असतात म्हणजे कर्मातच अखंड लुडबुडत असतात ते अत्यंत गाढ अशा अंधकारात प्रवेश करतात ज्ञानी लोकाचे स्थान जसे प्रकाशमय असते तसे या कर्मठाचे स्थान अंधकारमय असते शिवाय येथ हेहि सांगितले पाहिजे की, जे कर्माचा त्याग करून केवळ ज्ञानातच रंगलेले असतात ते तर त्याहिपेक्षा निबिडतर अशा गडद अंधकारात जाऊन पडतात ! आणि जे विद्याहीन व कर्मठ असतात त्याची दशा तर सांगायलाच नको हे विद्याकर्महीन पापी लोक अंधकारात गुरफटलेल्या अशा सुखरहित दुःखमय अशा लोकाप्रत जातात नरकलोक तो हाच होय

जनक– आत्मज्ञानी लोकासाठी ब्रह्मलोक, पुण्यवानासाठी स्वर्गलोक व पापीजनासाठी नरकलोक असाच ना या सांगण्याचा अर्थ ?

याज्ञवल्क्य– अगदी बरोबर ! जनकराजा ! माझ्या म्हणण्याचा रोख तू अगदी बरोबर ताडलास

जनक– मरणकाळी मनुष्याला दुःख होत असते, ज्ञान्यालाहि ते होत असेल काय ?

याज्ञवल्क्य– येथ तू चुकत आहेस ! हा [illegible] से जर पुरुषाला आत्म्याविषयी ज्ञान होईल अर्थात [illegible] मी तो ! विश्वात्मा ब्रह्म व आहे असी ज्याची खात्री [illegible] दृष्ट्याने काय म्हणून [illegible] होईल ? [illegible]

झाले, साक्षात्कार झाला तो प्रत्यक्ष विश्वकर्ताच म्हणून समजावा तो सर्वांचा आत्मा आणि सर्व त्याचा आत्मा होय हेच दुसऱ्या शब्दात सागावयाचे तर या विश्वाचा तो आत्मा व हे विश्व त्याचा आत्मा आहे

जनक-येवढा हा आत्मज्ञानाचा- ब्रह्मज्ञानाचा-प्रभाव आहे पण ते ब्रह्म आपल्याला कोठें प्राप्त होईल आणि कसे प्राप्त होईल ?

याज्ञवल्क्य-ते ब्रह्म येथच जाणले पाहिजे आणि आम्ही ते येथेंच जाणतो आम्ही जर हे येथेंच-या देहीच-जाणले नसते तर मोठा घात, मोठा अनर्थ झाला असता हे ब्रह्म जे जाणतात फक्त तेच अमर होतात आणि जे जाणत नाहीत त्याचें दुःख केव्हाही सरत नाही या श्रेष्ठज्योतिरूप अमर आत्म्याचीच सर्व देव उपासना करतात हे पचजनहि त्याची पूजा करतात हा आत्मा म्हणजे तू काय समजलास ? हा प्राणाचा प्राण चक्षूचा चक्षु, श्रोत्राचे श्रोत्र आणि मनाच मन आहे हे जे जाणतात त्यानाच त्या प्राचीन व आद्य परब्रह्माचे ज्ञान झाले असे समजावे या जगात वस्तुत विविध असे काहीच नाही पण हे (दुसऱ्यानी) सागून समजावयाचे नाही ज्याने त्याने ते फक्त आपल्या मनानेच जाणले पाहिजे

जनक-जगात विविधत्व नाही असे का आपले म्हणणे आहे ? पण मला ते पटत नाही

याज्ञवल्क्य-बाह्य दृष्टीने तू पहातास म्हणून तुला जग तसे दिसते आणि म्हणून तुला माझे म्हणणे पटत नाही पण वस्तुत ज्ञानी मनुष्याला जगात विविधत्व-अनेकत्व-दिसत नाही. पण जोपर्यंत मनुष्य जगात विविधत्व पाहतो तोपर्यंत त्याच्या मागच

संसारचक्र–जन्ममृत्यूचा फेरा–त्याही केल्या चुकत नाही. त्याला पुन पुन संसारात यावेच लागते आणि संसारदुःख भोगावेच लागते मी सांगतो तो हा आत्मा सर्वांत एकजिनसी असून तो मल-रहित आहे तो आकाशाहून सूक्ष्म आहे आणि तसाच ब्रह्मांडा-हूनहि मोठा आहे तो जन्मरहित आहे आणि शाश्वतहि आहे. ब्राह्म-णाने म्हणजे ब्रह्म जाणू इच्छिणाराने याचे ज्ञान–यथार्थ ज्ञान–करून घ्यावयास पाहिजे

जनक–हा आत्मा आहे तरी कसा ? त्याचे थोडक्यात लक्षण सांगून माझे समाधान करा ना ?

याज्ञवल्क्य– हा आत्मा अज आहे म्हणजे जन्मरहित आहे तो सर्वांहून मोठा आहे, तो विज्ञानघन असून सर्वांच्या अंतर्यामी आहे हे सर्व विश्वजात त्याच्याच स्वाधीन आहे, तो सर्वांचा ईश्वर आहे, भूतांचा अधिपति आहे भूपाल आहे. आणि तो लोकांना धारण करणारा सेतु आहे.

जनक– केवढा महिमा त्याचा ? आपले म्हणणे विचाराला पटते. आता मला प्रश्न पडून पडला आहे की, हा जाणावयाचा कसा नि तो मार्ग कोणता ?

याज्ञवल्क्य–तेहि तुला सांगतो ऐक. तो मार्ग म्हणजे हा. ज्याला हे ब्रह्म जाणण्याची इच्छा आहे अशा ब्रह्मजिज्ञासूला वेदाध्ययन अवश्य हवे. त्याबरोबरच यज्ञ, दान, तप, उपवास, व्रत या गोष्टीहि अवश्य आहेत. वरील विधीने जो यथार्थत याला जाणतो तो मुनि होय. या आत्मलोकाची प्राप्ति व्हावी म्हणूनच संन्यासी संन्यास घेतात. हे आत्मतत्त्व–हे ब्रह्म–ज्यांनी ओळखले, ते संत-तीची इच्छा करीत नाहीत. हा आत्माच तो आपला लोक असे ते समजतात आणि म्हणून पुत्रेच्छा, धनेच्छा व लोकिकेच्छा या

सर्वांचा त्याग करून केवळ भिक्षेवर ते आपला उदरनिर्वाह चालवू पाहतात. नेति नेति म्हणतात तो हाच आत्मा

जनक– म्हणजे ?

याज्ञवल्क्य– हा अगृह्य आहे. याला धरता येत नाही. अशीर्य आहे, फाडतां येत नाही. असंग आहे, जोडता येत नाही. असित आहे, व्यथा पावत नाही किंवा नाश पावत नाही. मी पापकर्म केले म्हणून त्याला ताप होत नाही वा पुण्यकर्म केले म्हणून हर्ष शिवत नाही. अर्थात् तो हर्षशोक या पलीकडला आहे म्हणून जो ब्रह्मज्ञ असतो तो पाप व पुण्य अर्थात् शोक व हर्ष दोन्ही तरून पलीकडे जातो. कृताकृताची त्याला बाधा होत नाही आणि हे जो जाणतो तो शांत, दांत, उपरत, सहनशील, समाधानयुक्त होऊन आपल्यामध्येच आत्मरूप पहातो. सर्व पाप भस्म करून टाकतो. असा ब्रह्मज्ञ पापरहित व वासनारहित होतो ब्रह्मलोक तो हाच होय.

जनक– गुरुदेव ! या हजार गाई घ्या ही माझी विदेहराजा व त्याबरोबरच मीहि आपले दास आहोंत

याज्ञवल्क्य– जास्त काय सांगू ? हा आत्मा महान, जन्मरहित, नाशरहित, भयरहित असा असून तो प्रत्यक्ष ब्रह्मच आहे. अभय हेच ब्रह्म नि हें आत्मज्ञान जो जाणतो तो अभयरूपी प्रत्यक्ष ब्रह्मच होतो. जनका ! तूं ब्रह्म झाला आहेस.

वाचकहो ! याज्ञवल्क्याच्या तोंडातून निघालेला हा अमृतबोध ऐकून त्या मुमुक्षु राजर्षि मनाची काय स्थिति झाली असेल ? हे काय सांगितले पाहिजे ? त्याचा हा अमृतबोध वाचून संतृप्त झालेले तुम्हीच कल्पना करा म्हणजे झाले.

(श प १४-७-२-१ ते ३१)

# अहं ब्रह्मास्मि

आता जाता जाता योगीश्वराची एक महत्त्वाची मुख्य गोष्ट सांगावयाची राहिली ती तेवढी सांगून ग्रंथ आटोपता घेतो. ती गोष्ट म्हणजे तत्त्वज्ञान क्षेत्रात 'अहं ब्रह्मास्मि' ची घोषणा करून ज्ञानमेरूचा सर्वोत्कृष्ट व सर्वोच्च गौरिशंकर गाठला ! हा पराक्रम त्यांच्या जगविख्यात शतपथ ग्रंथराजात आढळून येतो. बरोबर त्या ग्रंथाचे वैशिष्ट्य हे काही और च आहे. येथें म्हणजे त्यांच्या विचारवैभवाचा, प्रतिभासौन्दर्याचा, कर्मकौशल्याचा, भाषाप्रभुत्वाचा, विवेचनपद्धतीचा, निरीक्षण व परीक्षण पद्धतीचा मनोहर कळसच झाला आहे. त्यांच्या बृहदारण्यकाच्या तत्त्वज्ञानप्रचुर नंदनवनात शिरल्यावर तेथील दिव्य नि अमर ज्ञानभांडार पाहून मनुष्य आश्चर्याने थक्क होऊन जातो. वैदिक तत्त्वज्ञानाच्या अत्युच्च शिखराचे मंगल दर्शन घडते ते येथच. 'अहं ब्रह्मास्मि' या महावाक्याची जाहीर घोषणा करण्यात आली ती याच ग्रंथात. या विश्वकोशात विविध नामरूपांचा देखावा नि पसारा दृष्टीस पडत असला तरी तो वस्तुतः खरा नसून ज्ञानदृष्टीने तेथें एकच एक सद्वस्तु–ब्रह्मवस्तु–अखंड नांदत असून ती ब्रह्मांडात सर्वत्र घनदाट व ओतप्रोत भरून राहिली आहे. तीच एक सत्य व शाश्वत असून बाकीचे सगळे सांत व विनाशी आहे. 'आत्मैव सत्य, अन्यदार्त' ही घोषणा त्यांनी स्पष्ट करून ठेविली आहे. ब्रह्म व जीव व्यवहारांत भिन्न दिसली तरी वस्तुतः व परमार्थतः एकच आहेत हे अद्वैततत्त्व विस्तार व ठिणगीचा दृष्टान्त देऊन समर्थन सिद्ध करून दाखविण्यात आले आहे. 'अहं ब्रह्मास्मि' याचे सुंदर स्पष्टीकरण श्रीमच्छंकराचार्यांनी 'जीवो ब्रह्मैव नापर', या सूत्रवचनात सविस्तर व समर्पक सिद्ध करून दाखविले आहे. असो योगीश्वर आजपर्यंत जगाच्या स्मृतिमंदिरात कीर्तिरूपाने जिवंत राहिले आहेत, ते त्यांचे दिव्य चरित्र व अमर शिकवण यामुळेंच होय.

# ज्योत निमाली !

याज्ञवल्क्याचे अवतारकार्य आता जवळ जवळ संपल्या-सारखेच झाले होते त्याच्या सर्व आशाआकांक्षा पूर्ण सिद्धीस गेल्या होत्या एकंदर अंगीकृत कार्याला व प्रयत्नाला महद्यश लाभले होते मन सर्वस्वी शांत झाले असून बुद्धीला स्थैर्य प्राप्त झाले होते मनुष्याने जगात जन्मून काय करावयाचे आणि काय पाहावयाचे ते सर्व करून व पाहून त्याचा अंतरात्मा मुक्तरूप व तृप्त झाला होता त्याचा मानवजन्म धन्य व कृतकृत्य झाला होता

चंद्रकांत – त्याचा वडील मुलगा – हा आता मोठा व कर्ता झाला असल्यामुळे व कात्यायनी ही संसारदक्ष असल्या-मुळे त्यांना मागची कशाची म्हणून काळजी राहिली नव्हती शुक्ल यजुर्वेदाचा पुरस्कार व प्रचार करणारे असे त्याचे प्रथित-यश असे पधरा शिष्य असून त्यात कण्व व मध्यंदिन यांनी जनसामान्यावर चांगलीच पकड बसवून स्वीकृत कार्यात करन यश मिळविले होते तत्कालीन राजवृन्दातील बहुतेक नृपतींनी योगीश्वराचे अनुयायी होऊन त्याच्या वेदाचा स्वीकार केला होता त्याचे सर्व हेतु सिद्धीस जाऊन आता करावयाचे असे काहीच उरले नसल्यामुळे संसाराचा सर्व पसारा कात्यायनीवर व शुक्लयजुर्वेदाचा प्रचार व प्रसार शिष्यवृंदावर सोपवून उर्वरित आयुष्य आत्मचिंतनात गतविण्यासाठी म्हणून ते गृहस्थाश्रमातून निवृत्त झाले व पुढे योगसाधन व ब्रह्मचिंतनात ते अखंड रंगून व रमून गेले इहलोकीची याप्रमाणे यात्रा करून काल-क्रमण करीत असता सृष्टिनियमाप्रमाणे यथाकाळ देहविसर्जन करून, नदी जशी समुद्रात विराम पावते तद्वत त्यांची दिव्य आत्मज्योति त्या सच्चिदानंद परमात्म स्वरूपात विलीन झाली

चदनाची राख होऊन गेली तरी त्याचा परिमळ जसा जास्त दरवळून असतो तद्वत योगीश्वर जरी आज पाच हजार वर्षापूर्वीच इहलोकातून अतर्धान पावले असले तरी त्यांच्या सुमगल तत्त्वज्ञानाचा स्वर्गीय परिमळ शारदादेवीच्या पवित्र मंदिरात आजमितीसहि ज्याचा तसाच घुलून व दरवळून आहे ! याला आश्चर्य म्हणू नये तर काय म्हणावे ? इतकेच काय, पण जोपर्यंत चद्रसूर्य या भमडळावर चमकत आहेत तोपर्यंत या गुरुदेवाचे गभीर तत्त्वज्ञान व त्याबरोबरच त्याची पुण्यस्मृति सरप्रमाणे अभग व अखड राहील, या विषयी सदेहच नको

नश्वर जडसृष्टीच्या अतरगाचा ठाव घेण्यात रगलेली व दगलेली ही आधुनिक विज्ञानशास्त्रे काहीहि म्हणोत व देहसुखाला हपापलेली व चटावलेली राष्ट्रे कितीहि नाक मुरडोत, पण या गुरुदेवाच्या सुमधुर उपदेशामृताला त्यापासून किमपिहि बाध यणार नाही किंवा कडवट अगर तुरमट वास येणार नाही इतकेच नव्हे, तर प्रगत पावलेल्या विज्ञान शास्त्राचा नाजूक काटा आता आस्ते आस्ते या गुरुमाउलीच्या तत्त्वज्ञानाकडे झुकत चालला असून त्याप्रमाणे प्रथितयश पाश्चात्य विज्ञान शास्त्रज्ञ सर जेम्स जीन्स सारखे जगन्मित्र शास्त्रज्ञ ' अगृहचो, नहि गृहचने ' या दिव्य घोषणेचा

The river of knowledge has too often turned back on itself

या शब्दानी अनुवाद करण्यास तयार झाले आहेत एकदरीत तात्पर्य काय की या गुरुदेवाची त्रिकालाबाधित शिकवण सूर्याप्रमाणेच अमर आहे ! दिवा गेला तर त्या बरोबरच प्रकाशहि जातो, पण चमत्कार हा की हा ज्ञानदीप शात झाला असला तरी त्याचा ज्ञानोपदेशाचा दिव्य प्रकाश अद्याप आहे तसाच प्रकाशत असून तो लाभला नाही ! श्री योगीश्वर गुरुदेवाचे हे इतके पुण्यस्मरण करून भागलेल्या लेखणीला आता विश्रांति देतो इति शम्

समाप्त